# नवभारत

वर्ष ८ वें ] फेब्रुवारी १९५५ [ अंक ५ वा

## -- भूदान - विशेषांक --

विषय :

भूदान-आंदोलनाचें तत्त्वज्ञान, जीवनदर्शन, कार्यपद्धति; भूदान आणि सर्वोदयाचा आर्थिक कार्यक्रम; भूदान आणि समाजक्रांति; भूदान, ग्रामोद्योग आणि विकेन्द्रीकरण; भूदान, साम्ययोग आणि नियोजन; भूदान व जमीनविषयक धोरण; भूदान आणि सत्याग्रह; भूदान आणि खाजगी मालमत्तेचा प्रश्न; महाराष्ट्रांतील व नागविदर्भांतील भूदान; श्री. शंकरराव देव यांचें जीवन व व्यक्तिमत्त्व.

* * *

लेखक :

रा. कृ. पाटील, एम्. एल्. दांतवाला, ध. रा. गाडगीळ, वैकुंठभाई मेहता; अण्णासाहेब सहस्रबुद्धे, ठाकुरदास बंग, शं. द. जावडेकर, लक्ष्मणशास्त्री जोशी, ना. अ. मावळंकर, मा. दि. कानेटकर, गोवर्धन पारीख दे. ज. हातेकर, एस्. एम्. जोशी, ना. ग. गोरे, दि. के. बेडेकर, वसंत नारगोलकर, दे. अ. दाभोलकर, अप्पासाहेब पटवर्धन, पु. ह. पटवर्धन, ह. कृ. मोहनी, श्री. रा. टिकेकर, भाऊ धर्माधिकारी, गो. बा. देशपांडे, कृ. र. पटवर्धन.

**किंमत २ रुपये**

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

   






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष आठवें
अंक पांचवा

# नवभारत

फेब्रुवारी
१९५५

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख
प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक

## अनुक्रमणिका




**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हें मासिक श्री. **म. शं. साठे** यांनीं **दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई** येथें छापून **प्रा. वि. म. बेडेकर** यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

**पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,**
**९०६ शिवाजी नगर, पुणें ४**
**२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक,**
**C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )**











# 'नवभारत' मासिक, फेब्रुवारी १९५५

## ' भूदान-विशेषांक '

### —लेखक-परिचय—

श्री. रा. कृ. पाटील ( नागपूर ) – बी. एस्‌सी. एलूएल्. बी. मध्यवर्ती सरकारचे माजी फूड कमिशनर. मध्यप्रदेश सरकार यांतील माजी मंत्री. आय्. सी. एस्. चा १९४३ मध्यें राजीनामा दिला.

प्रा. दे. ज. हातेकर – वर्धा येथील कॉमर्स कॉलेजमध्यें प्राध्यापक. ' साम्ययोग ' या वर्धा येथून निघ-णाऱ्या साप्ताहिकाचे संपादक.

प्रा. एम्. एल्. दांतवाला ( दिल्ली ) – मध्यवर्ती सरकारच्या प्लॅनिंग कमिशनच्या रिसर्च प्रोग्राम कमिटीचे सेक्रेटरी.

प्रा. ठाकुरदास बंग – वर्धा येथील कॉमर्स कॉलेजमध्यें प्राध्यापक होते. ' साधनासदन ' अशी एक संस्था काढून त्यांनीं वर्धा तालुक्यांतील स्वयंग्रामांचा प्रयोग केला. त्यांनीं हल्लीं भूदानकार्याला वाहून घेतलें आहे.

श्री. भाऊ धर्माधिकारी – पुणें येथून निघणाऱ्या ' भूदानयज्ञ ' या साप्ताहिकाचे संपादक. ' महाराष्ट्र भूदानसमिती'चे संयोजक.

आचार्य शं. द. जावडेकर ( इस्लामपूर ) – महाराष्ट्रांतील प्रसिद्ध राज्यनीतिशास्त्रज्ञ व ग्रंथकार. महाराष्ट्र साहित्यसंमेलनाचे माजी अध्यक्ष. ' नवभारता'चे एक संपादक.

प्रा. ना. अ. मावळंकर -- पुणें विद्यापीठ व फर्ग्युसन कॉलेज ( पुणें ) यांमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

प्रा. मा. दि. कानेटकर – पुणें विद्यापीठ व वाडिआ कॉलेज ( पुणें ) यांमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

प्रा. दे. अ. दाभोलकर – सांगली येथील विलिंग्डन कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

श्री. ना. ग. गोरे ( पुणें ) – महाराष्ट्रांतील एक समाजवादी नेते. ' जनवाणी'चे संपादक. ' सीतेचे पोहे ' या लघुकथासंग्रहाचे लेखक.

श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे ( गया ) अखिलभारतीय सर्वसेवासंघाचे मंत्री.

प्रा. गोवर्धन पारीख – मुंबई येथील ' रामनारायण रुईया ' कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक. ' म. गांधी ' या पुस्तकाचे लेखक. ' नवभारत ' मासिकाचे एक संपादक.

त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी ( वाई ) – ' धर्मकोशा'चे मुख्य संपादक. महाराष्ट्र साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष, ' हिंदु धर्माची समीक्षा ', ' भारतीय संस्कृतीचा विकास ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

श्री. एस्. एम्. जोशी – बी. ए. एलूएल्. बी. – ( पुणें ) – महाराष्ट्रांतील समाजवादी नेते. मुंबई विधिमंडळाचे सदस्य.

## लेखक-परिचय

**श्री. वसत नारगोलकर** एम्. ए. एल्एल्. बी. – ( कैनाड जि. ठाणे ) आदिवासी-कार्याला वाहून घेतलेले कार्यकर्ते. ' भर दुपारीं अंधार ' या अनुवादात्मक कादंबरीचे लेखक.

**श्री. गो. वा. देशपांडे** ( नागपूर ) – मध्यप्रदेश-भूदान-यज्ञसमितीचे सहसंयोजक.

**डॉ. य. कृ. सोवनी** – वाङ्मय-आयुर्विद्याविशारद ( टि. म. वि. ) संयुक्त-महाराष्ट्र-परिषदे-( मुंबई ४ ) चे कार्यवाह. ' संयुक्तमहाराष्ट्राची माहिती ' या पुस्तकाचे लेखक.

**श्री. ह. कृ. मोहनी** ( नागपूर ) – ' नवभारत ' मासिकाचे एक संपादक. ' तेजस्वी शिक्षण ', ' आमचा सनातन धर्म ', ' आधुनिक कर्मवीर ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. दि. के. बेडेकर** – एम्. ए. ( पुणें ) – प्रसिद्ध मार्क्सवादी विचारवंत व साहित्यसमीक्षणकार. ' संयुक्तमहाराष्ट्र ', 'साहित्यः निर्मिति व समीक्षा' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. वैकुंठभाई ल. मेहता** ( मुंबई ) – ऑल इंडिया खादी ॲन्ड् व्हिलेज इंडस्ट्रीज बोर्डाचे अध्यक्ष. मुंबई राज्याचे माजी अर्थमंत्री.

**श्री. कृ. र. पटवर्धन** बी. ए. ( ऑ. ) – मुंबई येथील ' टाटा इन्स्टिट्यूट ऑफ सोशल सायन्सेस् ' या संस्थेचा 'कोर्स' यांनीं पुरा केला असून सध्या त्या संस्थेंत ' सर दोराबजी टाटा रिसर्च स्कॉलर ' म्हणून अध्ययन करीत आहेत.

**श्री. अप्पासाहेब पटवर्धन** ( गोपुरी ) – महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध सर्वोदयवादी कार्यकर्ते.

**श्री. पु. ह. ऊर्फ रावसाहेब पटवर्धन** ( पुणें ) – ' साधना ' ( मुंबई ) साप्ताहिकाचे एक संपादक.

**श्री. श्री. रा. टिकेकर** ( मुंबई ) – ' मुसलमानी मुलुखांतील मुशाफरी ', ' ब्रह्मी बंडाळीचें ब्रह्मपुराण ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.



* मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.
* या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.
* मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

# 'नवभारत' मासिक

## 'भूदान-विशेषांक'

### संपादकीय

**श्री. शंकरराव देव यांस शुभेच्छा**

**श्री. शंकरराव** देव यांच्या वयाला येत्या माघ शुद्ध पंचमीस – **वसंतपंचमीस** – म्हणजे इंग्रजी तारखे-**प्रमाणें २८ जानेवारी १९५५** रोजीं साठ वर्षे पुरीं होऊन एकसष्टावें वर्ष लागत आहे. त्या निमित्त व त्या दिनीं '**नवभारता**'चा हा '**भूदान-विशेषांक**' प्रसिद्ध होत आहे.

**श्री. शंकरराव** देव यांनीं आजपर्यंत भारताची व महाराष्ट्राची तीन तपांवर केलेली दीर्घकालीन व एकनिष्ठ सेवा, सार्वजनिक जीवनाच्या विविध क्षेत्रांतील त्यांचें संघटनाकुशल कर्तृत्वशाली नेतृत्व, त्यांचें त्यागी, व्रतस्थ चारित्र्यसंपन्न जीवन आणि धैर्यशाली व्यक्ति-मत्त्व इत्यादींचा विचार करतां, त्यांच्या या शुभ षष्ट्यब्दपूर्तिदिनीं त्यांच्या कार्याचें व व्यक्तिमत्त्वाचें दर्शन घडविणारा 'नवभारता'चा '**शंकरराव देव – विशेषांक**' काढणें उचित झालें असतें. परंतु श्री. शंकरराव देव यांना स्वतःला 'नवभारता'चा विशेषांक आपल्या स्वतःच्या भोंवतीं गुंफला जावा हें मान्य झालें नाहीं. त्यापेक्षां, विशेषांक काढणेंच असेलतर या निमित्तानें कांहीं एका महत्त्वाच्या प्रश्नावर लक्ष केन्द्रित करून त्या प्रश्नाची छाननी करणारा विशेषांक काढणें अधिक उचित होय अशी त्यांनीं इच्छा व्यक्त केली. 'नवभारता'चे संचालक श्री. शंकरराव देव यांच्या ह्या व्यक्तिनिरपेक्ष सदभिरुचिसंपन्न इच्छेमागील औचित्य लक्षांत घेऊन, दुसरा पर्याय म्हणून, त्यांनीं अलीकडे ज्या भूदानकार्याला अत्यंत निरलसपणें वाहून घेतलें आहे त्या भूदानावरच त्यांच्या षष्ट्यब्दपूर्तिदिनीं विशेषांक काढावयाचें ठरविलें. त्या संकल्पाचेंच मूर्त स्वरूप म्हणजे हा प्रस्तुत 'भूदान-विशेषांक'होय.

तथापि, श्री. शंकरराव देवांच्या ६० व्या वाढदिवशीं हा 'भूदान-विशेषांक' प्रसिद्ध होत आहे, हा योग लक्षांत घेऊन, श्री. शंकरराव देव यांचें कार्य व व्यक्तित्व यांचें ओझरतें प्रतीकात्मक दर्शन करून देणारे तीन लेख या विशेषांकांत दिले आहेत. या लेखांचे लेखक श्री. शंकररावांचे निरनिराळ्या क्षेत्रांतील सहकारी व स्नेही आहेत. त्यांच्या लेखांतून श्री. शंकररावांचें होणारें दर्शन वाचकांस, श्री. शंकररावांच्या या ६० व्या वाढदिवशीं त्यांच्या जीवनाचा व कार्याचा विचार करतांना उद्बोधक व समयोचित वाटेल. शंकररावांच्या या साठाव्या वाढदिवशीं श्री. शंकररावांना शुभेच्छा अर्पण करून, आचार्य विनोबा यांनीं या विशेषांकाकरि-तां पाठविलेल्या संदेशांत म्हटल्याप्रमाणें, 'शंकररावां-च्या परिणतप्रज्ञेचा लाभ महाराष्ट्रास दीर्घ काल मिळत राहो' अशी अंतःकरणपूर्वक प्रार्थना करतों.

**प्रस्तुत 'भूदान-विशेषांक'**

प्रस्तुत 'भूदान-विशेषांकां'त एका अत्यंत प्रभावी प्रश्नावर विचार केन्द्रीभूत करून अनेक दृष्टींनीं त्याचा वेध घेण्याचा प्रयत्न केलेला आहे हें दिसून येईल. सुमारें चार वर्षांपूर्वी जो 'भूमिदान' विचार 'वामना'-च्या पहिल्या पावलाप्रमाणें अवतीर्ण झाला त्यानें हळूंहळूं 'पदयात्रा' आरंभून 'विराट्' स्वरूप धारण करीत, एका भारतव्यापी आंदोलनाचें महान् स्वरूप धारण केलें आहे. प्रांतानिहाय भूदानयज्ञसमित्या स्थापन झाल्या असून त्यांची संख्या २२ आहे. सुमारें ३६।।। लक्ष एकर जमीन भूदानयज्ञांत मिळाली असून, ११३ समग्र गांवें मिळालीं आहेत. भूदानयज्ञ-आंदोलनानें देशाच्या भूमिविषयक समस्येला हात घातला असून, हळूंहळूं त्यानें संपत्तिदान-जीवनदानाच्या रूपानें समाजाच्या आर्थिक आणि आध्यात्मिक प्रश्न सोडविण्याची दिशा दाखविण्याचा प्रयत्न चालविला आहे. गेल्या सुमारें ४ वर्षांच्या अवधींत भूदान-यज्ञ-विचारानें जें भारतव्यापी स्वरूप धारण केलें आहे त्याकडे निरनिराळ्या विचारसरणींच्या विचारवंतांना दुर्लक्ष करणें अशक्य झालें आहे. भिन्नभिन्न विचार-सरणीचे पक्षनेते, राज्यशास्त्रज्ञ, समाजशास्त्रज्ञ, अर्थ-








शास्त्रज्ञ इत्यादींना या प्रभावी विचाराची दखल घेणें अपरिहार्य झालें आहे. सामाजिक, आर्थिक प्रश्न सोडविण्याचा एक स्फूर्तिदायक, अभिनव, क्रान्तिकारक सर्वोदयी मार्ग या दृष्टीनें कांहीं विचारवंत त्याकडे मोठया आशेनें पहात आहेत. तर इतर कांहीं विचारवंत या आंदोलनामागील तत्त्वज्ञान, त्याची कार्यपद्धति यांच्या मर्यादांकडे बघत असून त्याच्या चिरकालीन यशाविषयीं साशंक आहेत. अशा रीतीनें ' भूदान-आंदोलन ' हें आपल्या नांवाप्रमाणें खरोखरीं विचारांना तात्पुरतें 'आंदोलन'–हेलकावे देणारें ठरणार कीं आचार्य विनोबा म्हणतात त्याप्रमाणें तें ' भूदान-आरोहण ' होऊन क्रान्तिमार्गाची चढती सोपानपरंपरा उजळवून दाखविणार- हा आस्थेवाईक समाजाभ्यासकांपुढें व सामाजिक कार्यकर्त्यांपुढें मोठा प्रश्न आहे. या प्रश्नाचें उत्तर जरी नसलें - आणि अशा सामाजिक प्रश्नांचें समाधानकारक अन्तिम उत्तर मिळणें अशक्यच असतें–तरी त्या प्रश्नाच्या विविध बाजू, भूदान-आंदोलनाचें सामर्थ्य आणि मर्यादा यांची स्थूलमानानें छाननी झालेली प्रस्तुत विशेषांकांत आढळून येईल. भूदानविचार हा प्रतिक्रान्तिकारक आहे काय, यासंबंधीं या अंकांत उद्बोधक चर्चा केलेली आढळून येईल, तर कांहीं लेखांतून, ' भूदान-आंदोलन ' कायमचें नसलें तरी प्रचलित परिस्थितींत कांहीं काळपर्यंतच उपकारक होणारें असें आंदोलन आहे, असें त्याचें मूल्यमापन कांहींनीं केलेलें दिसून येईल. या उलट, भूदानयज्ञामागील तत्त्वज्ञान एक जीवनव्यापी तत्त्वज्ञान आहे, तें समाजक्रान्तीचें, गांधींच्या सर्वोदयी विचारसरणीशीं सुसंगत असें एक अभिनव सामाजिक दर्शन आहे, असें सयुक्तिक प्रतिपादन कांहीं लेखांतून केलेलें वाचकांस आढळेल. अशा रीतीनें 'नवभारता'च्या नेहमींच्या परंपरेस अनुसरून, भूदानासारख्या एका सामाजिक दृष्टीनें अत्यंत महत्त्वाच्या विषयावर सत्य-संशोधनाच्या दृष्टीनें अनेक दृष्टिकोनांचें दर्शन प्रस्तुत अंकांतून होईल व वाचकांस भूदान-आंदोलनाकडे सहानुभूतिर्वक जागरूकपणें पहातां येऊन आपापलें मत बनविण्यास साहाय्य होईल, असा विश्वास वाटतो.

या अंकाकरितां ज्या लेखकांनीं लेख दिले आहेत त्यांचीं विविध कार्यक्षेत्रें, व्यासंग व भूदानसंबद्ध प्रश्नांचा त्यांनीं केलेला विचार हीं पहातां ते आपापल्यापरीनें किती अधिकारी आहेत, याची वाचकांस कल्पना येईल. या सर्व लेखकांनीं आपापल्या कार्यव्यापृततेंतून सवड काढून, आमच्या विनंतीस मान देऊन 'नवभारता'च्या या विशेषांकाला जें तत्परतेनें लेखसाहाय्य केलें त्याबद्दल त्यांना मनःपूर्वक धन्यवाद देणें आमचें कर्तव्य आहे. या विशेषांकाची योजना, विषयांची आखणी वगैरे करण्यांत प्रा. गोवर्धन पारीख यांचें विशेष साहाय्य झालें आहे, त्याचा कृतज्ञतापूर्वक निर्देश करतों. नेहमींच्या अंकापेक्षां हा विशेषांक दुपटीपेक्षांहि मोठा झाला आहे. तो नेहमींच्याच ठराविक वेळांत वेळेवर नीट व्यवस्थित रीतीनें छापून दिल्याबद्दल वाई येथील प्राज्ञ प्रेसचे व्यवस्थापक श्री म. शं. साठे व त्यांचे सहकारी यांचे आभारी आहोंत.

हा विशेषांक 'नवभारता'च्या अंकक्रमांत फेब्रुवारीचा म्हणून गणला आहे. यानंतरचा मार्चचा अंक नेहमीप्रमाणें वाचकांस मिळेल.

## 'नवभारत'निधीकरितां विनंति

'नवभारत' निधीसाठीं काढलेलें विनंतिपत्र 'नवभारता'च्या गेल्या अंकांत प्रसिद्ध केलें होतें. या अंकांत तें पुन्हां प्रसिद्ध केलें आहे. त्याकडे वाचकांचें लक्ष वेधूं इच्छितों. त्या पत्रकाखालीं असलेल्या सह्यांत आणखी दोन सह्यांचीं भर घालून या वेळेला तें पत्रक छापलें आहे. त्या दोन सह्या म्हणजे मुंबईचे श्री. स. का. पाटील व वऱ्हाडांतील संत तुकडोजीमहाराज यांच्या होत. गेल्या अंकांतील छपाई होऊन गेल्यावर त्या सह्या हातीं पडल्या म्हणून त्या त्यावेळीं देतां आल्या नाहींत.

' नवभारत ' निधीसाठीं काढलेल्या विनंतिपत्रकानुसार ' नवभारत ' निधीला ज्या देणग्या आल्या आहेत त्यांचीं नांवें ' नवभारत ' निधीच्या कार्यवाहांनीं दिलेलीं याच अंकांत पत्रकाच्या आरंभीं दिलीं आहेत. प्रत्येक अंकांत 'नवभारत'निधीच्या देणगीदारांचीं नांवें साभार प्रसिद्ध करण्यांत येतील.

'नवभारत'निधीच्या विनंतिपत्रकानुसार 'नवभारत' निधीचा संकल्प पुरा करण्याच्या दृष्टीनें ग्राहकांनीं, वाचकांनीं 'नवभारत'निधीस आपल्या शक्तीनुरूप सढळपणें स्वतः साहाय्य करावें व इतर हितचिंतकांकडून तें मिळवून द्यावें अशी आग्रहाची प्रार्थना आहे.

—कार्यकारी संपादक

प्रा. दे. ज. हातेकर

# भूदान-यज्ञ-आंदोलन : एक समालोचन

भूदान-यज्ञ-आंदोलन हें स्वातंत्र्यप्राप्तीनंतर समाज-जीवनांत आमूलाग्र क्रांति घडवूं पाहणारें पहिलें राष्ट्रीय आंदोलन आहे. श्रीमंतांच्या श्रीमंतीचें आणि गरीबांच्या गरीबीचें बंधुभावनेनें निराकरण करणारी, अहिंसेच्या मार्गानें आर्थिक विषमता दूर करणारी, सत्यनिष्ठेनें सामाजिक न्याय प्रस्थापित करणारी, ग्रामीण जीवनांत चैतन्य खेळविणारी, आणि माणुस-की जागृत ठेवून लोकशाही समाजवादाची प्राण-प्रतिष्ठा करणारी ही नावीन्यपूर्ण क्रांति आहे. या क्रांतीला विनोबांनीं " भूदान-यज्ञ-मूलक ग्रामोद्योग-प्रधान अहिंसक क्रांति " असें स्पष्टीकरणार्थ म्हटलें आहे. या क्रांतिकारी आंदोलनाची सुरुवात कशी झाली आणि गेल्या सुमारें ३¾ वर्षांत या आंदो-लनाचा विकास कसा होत गेला हें पाहणें आंदो-लनाच्या भवितव्याचें मूल्यमापन करण्याच्या दृष्टीनें इष्ट होईल.

## पार्श्वभूमि

महात्मा गांधीजींच्या हत्येनंतर मार्च १९४८ मध्यें सेवाग्रामच्या धीरगंभीर वातावरणांत गांधीजींचे प्रमुख अनुयायी गांधीजींचें उर्वरित कार्य कसें पूर्ण करतां येईल याचा विचार करण्याकरतां एकत्र जमले होते. गांधीजींच्या अचानक हत्येनें साऱ्यां-चीं मनें गोंधळून गेलीं होतीं. नव्या जबाबदारीचा ताण मर्यादित कर्तृत्वशक्तीवर पडला होता. त्यामुळें आचरणांत एक प्रकारची बधिरता उत्पन्न होऊं पहात होती. गांधीजींचे सर्व अतिरथी-महारथी शिष्य " पुढें काय ? " या प्रश्नाचें उत्तर धुंडाळून काढण्याचा प्रयत्न करीत होते.

याच संमेलनांत विनोबांनीं 'सर्वोदय समाजा'-ची व्यापक कल्पना सर्वांपुढें विचाराकरितां प्रथम मांडली. गांधीजींच्या रामराज्याचा विचार, सर्वोदयाचा विधायक आचार आणि गांधीजींच्या लोकनीतीचें स्पष्ट दर्शन आपल्या अभिनव पद्धतीनें मांडण्यांत विनोबांनीं अपूर्व यश मिळविलें. तेव्हां-पासून ' सर्वोदय-समाज ' सुरू होऊन तो दिवसें-दिवस वाढूं लागला.

सेवाग्राम–संमेलनानें 'सर्वोदयसमाजा'च्या रूपानें राष्ट्रव्यापी भ्रातृमंडळ प्रस्थापित करण्याची मुहूर्तमेढ रोंवली. हें भ्रातृमंडळ वाढविण्याच्या दृष्टीनें दरवर्षी सर्वोदयाचें तत्त्वज्ञान मान्य असलेल्या व्यक्तींचें **'सर्वोदय-संमेलन'** भरविण्याची कल्पना निघाली.

तसें पहिलें सर्वोदय-संमेलन १९४९ च्या मार्च मध्यें राऊ (इंदूर) येथें भरलें. या संमेलनांत सर्वो-दयसमाजाचें शोषणरहित नवसमाज-रचनेचें ध्येय स्पष्ट करण्यांत आलें. हें ध्येय कार्यान्वित करण्याच्या दृष्टीनें कांहीं अखिलभारतीय विधायक कार्य करणा-ऱ्या संस्था विलीन होऊन नवा ' सर्व-सेवासंघ ' निर्माण झाला. तेंव्हांपासून सर्व-सेवासंघाचें कार्य जोमानें पुढें जात आहे.

दुसरें सर्वोदय-संमेलन १९५० सालीं अनुगूल (ओरिसा) येथें आणि तिसरें संमेलन १९५१ सालीं शिवरामपल्ली ( हैद्राबाद ) येथें झालें. शिवरामपल्ली-संमेलनाच्यावेळीं जी परिस्थिति होती ती लक्ष्यांत घेतली पाहिजे. तीन वर्षेंपर्यंत सर्वोदयाचें ध्येय व तत्त्वज्ञान निरनिराळ्या लेखांतून व भाषणांतून स्पष्ट करण्यांत आलें. परंतु या तत्त्वज्ञानावर आधारलेलें प्रात्यक्षिक फारसें कोठें दिसत नव्हतें. यावेळीं विनोबा परंधाम येथील आश्रमामध्यें ' साम्ययोगा 'चा प्रयोग करीत होते, कांचन-मुक्ति सिद्ध करण्याकरतां, स्वावलंबी ग्राम-जीवनाचें प्रत्यक्ष दर्शन निर्माण करण्यांत एकाग्रतेनें तपश्चर्या करीत होते. त्यामुळें शिवरामपल्ली-संमेलनाला उपस्थित राहण्याचा त्यांचा प्रथम इरादा नव्हता. परंतु श्री० शंकरराव देवांच्या सूचनेवरून संमेलनाला








येण्याचें विनोबांनीं कबूल केलें.

१९४८ ते १९५१ हीं तीन वर्षें राष्ट्रांत पसरले-ल्या सर्वसाधारण वैफल्याच्या परिस्थितींतून ' गांधीजीं-चा मार्ग ' अचूकपणें शोधून काढण्याच्या दृष्टीनें महत्त्वाचीं आहेत. सर्वसामान्य जनतेला नैराश्यांतून काढून फिरून उत्साहानें कार्यप्रवृत्त करील असा जनव्यापी कार्यक्रम देण्याची आवश्यकता होती. अहिंसा व सत्याग्रह यांवर आधारलेली ' शांति-सेने'ची मूलगामी योजना विनोबांनीं वर्ध्याला समजावून सांगितली. या ' शांतिसेने 'चा फारसा गाजावाजा झाला नाहीं हें खरें. तथापि शांतिसेनेचे विनम्र शिपाई या नात्यानें विनोबांनीं शिव-रामपल्लीसंमेलनाला जाण्याचें निश्चित केलें. चारित्र्य-संपन्न, सत्यनिष्ठ, लोकसेवापरायण व विनम्र सेवकांची उत्साही सेना विनोबांना उभारा-वयाची होती. ही सेना जनता-जनार्दनाच्या भेटींतूनच निर्माण करणें शक्य असल्यानें पांच लाख खेड्यांत वावरणाऱ्या जनतेच्या दर्शनाची विनोबांना उत्कंठा होती. म्हणून आगगाडीनें अथवा मोटारीनें प्रवास न करतां ' शांति-पदयात्रा ' सुरू झाली.

८ मार्च १९५१ रोजीं विनोबांनीं परंधाम-आश्र-माचा भक्तियुक्त अंतःकरणानें निरोप घेतला. ३१५ मैलांचा पायीं प्रवास ३० दिवसांत ३० मुक्काम करून ७ एप्रिल १९५१ रोजीं शिवरामपल्लीला पूर्ण केला. त्यांनीं या प्रवासांत ग्रामराज्याची उभारणी करण्याकरि-तां ग्रामीण जनतेला जागृत होण्याचा आदेश दिला.

शिवरामपल्ली-संमेलनाला विनोबांनीं शांतिसेनेचें स्वरूप दिलें, व शांतिसैनिकांच्या जीवनशुद्धीचा पंच-विध कार्यक्रम पुढील सूत्रांत सुचविला : " अंतः-शुद्धिः, बहिःशुद्धिः, श्रमः, शांतिः, समर्पणम् ". अंतःशुद्धिः म्हणजे शुद्ध व्यवहाराचें आचरण, बहिः-शुद्धि म्हणजे ग्रामसफाई व अंत्योदयाचा कार्यक्रम, श्रम म्हणजे उत्पादक परिश्रमावरील निष्ठा, शांति म्हणजे शांतिसेनेचा विधायक कार्यक्रम आणि सम-र्पणम् म्हणजे सूतांजलि अर्पण करणें. जनसेवेच्या शिक्षणाची ही प्राथमिक तयारी होती.

परंतु प्रश्न हा होता कीं सामान्य जनतेला एवढ्यानें प्रेरणा कशी मिळावी ? सर्वसाधारण जनतेच्या जीवना-शीं निगडित असलेलें सेवेचें प्रभावशाली साधन अजून प्राप्त झालें नव्हतें. तें साधन शिवरामपल्ली-हून वर्ध्याला परत येतांना तेलंगणांत १८ एप्रिल १९५१ रोजीं पोचमपल्लीच्या मुक्कामांत विनोबांना अनायासें मिळालें. त्याच दिवशीं भूदान-यज्ञाचा श्रीगणेशा झाला.

## भूदान-यज्ञ-आंदोलनाची गंगोत्री

विनोबा तेलंगणांत पोहोंचण्यापूर्वींच्या तीन वर्षांत वारंगल व नलगोंडा जिल्ह्यांत जमीनीच्या प्रश्नावर कहर माजलेला होता. सरकारी अहवाला-नुसार या दोन जिल्ह्यांतील जमीनीचा प्रश्न सोड-विण्याकरतां ३००० लोक ठार झाले होते. त्यांत लूट व जाळपोळ मिळून ६ कोट रुपयांच्या मालमत्तेचें नुक-सान झालें होतें. त्या भागांत सतत ३ वर्षें प्रयत्न करून सरकारला शांति व सुव्यवस्था निर्माण करतां आली नव्हती. भयंकर दहशतवाद व भीतीचें वातावरण कायम होतें. इतकेंहि करून जमीनीचा प्रश्न तसाच ताटकळत पडला होता. अशा स्थितींत तेलंगणांतील शांतियात्रा चालली होती, हें लक्षांत घेणें इष्ट आहे.

ता. १८ एप्रील १९५१ रोजीं पोचमपल्लीच्या मुक्कामावर गांवकरी जमले. शांति-संदेश ऐकल्या-नंतर उपस्थित हरिजनांनीं विनोबांजवळ अचानक-पणें जमिनीची मागणी केली. विनोबा जमीन कोठून देणार ? तथापि विनोबा म्हणाले, " तुम्ही सर्व मिळून सामुदायिक शेती कराल काय ? तसें करण्याकरितां तुम्हांला किती जमीन पाहिजे ? " सामुदायिक शेतीकरतां हरिजन-बांधव तयार झाले, व त्यांनीं एकूण ८० एकरांची मागणी केली. आतां ही जमीन सरकारकडून मिळवायची म्हणजे दीर्घ-सूत्री तंत्रपद्धतीनें वेळ लागेल आणि कदाचित् सर-








कारकडून येथें जमीन देणें शक्यहि होणार नाहीं. म्हणून विनोबा किंचित् सचिंत झाले आणि तात्काल म्हणाले: " या गांवकरी-मंडळीतील कोणी भूमिवान् मनुष्य एवढी जमीन हरिजनबंधूंना देईल काय ? " निरपेक्ष भावनेनें व उत्कटतेनें उच्चारलेले विनोबांचे शब्द श्री. रामचंद्र रेड्डीच्या अंतःकरणाला जाऊन भिडले. श्री. रेड्डी उठून उभे राहिले आणि म्हणाले: " माझ्या जमीनींतील १०० एकर जमीन या बांधवांकरतां मी देत आहे. " ही साधी घटना भूदान-यज्ञ-आंदोलनाची गंगोत्री ठरली ! येथून भूदानाची गंगा प्रवाहित झाली. आपल्यापेक्षां हीनावस्थेंत असलेल्या बांधवांना त्यांचा हक्क आपल्या संपत्तींतून अर्पण करण्याच्या प्रक्रियेला विनोबांनीं ' यज्ञ ' म्हटलें. " संविभागः सम्यक् विभजनम् दानम् " अशी दानाची व्याख्या केली. तेव्हांपासून ' भूदान-यज्ञ ' निर्माण झाला. पुढें तेलंगणांतील ५१ दिवसांच्या मुक्कामांत ठिकठिकाणीं यज्ञ सफल होण्याचीं सुचिन्हें दिसून आलीं. जमीनीचा प्रश्न शांतीच्या मार्गानें व बंधुभावनेच्या आश्रयानें सोडविण्याची शक्यता दिसूं लागली.

१५ एप्रिल ते ६ जून १९५१ या ५१ दिवसांच्या अवधींत ५१ मुक्काम करून, सुमारें २०० गांवांतील २ लाख जनतेला शांतिसंदेश ऐकवीत, भूदान-यज्ञांत १२२०१ एकर जमीन भूमिहीनांना वांटण्याकरतां विनोबांनीं मिळविली. शेवटचा मुक्काम मंचरियाल येथें झाला. त्या ठिकाणीं कार्यकर्त्यांचें छोटेसें संमेलन झालें. जमीनीचें वांटप करण्याकरतां व भूदान-यज्ञ चालूं ठेवण्याकरतां श्री. यू. केशवराव, श्री. कोदंडराव व श्रीमती लक्ष्मीबाई संगम यांची पहिली ' भूदान-यज्ञ-समिति ' कायम झाली. तेलंगणांत विनोबांनीं केवळ भूदानयज्ञाचेंच कार्य केलें असें नाहीं. ठिकठिकाणच्या ५०० ग्रामीण भांडणांचा निवाडा केला. भीतिग्रस्त वातावरणाचा छेद करून शांतीच्या व परस्पर-विश्वासाच्या वातावरणाचीं बीजें तेलंगणांत रोंवलीं. तेलंगणांत सरकारी सैन्याला ३ वर्षांत जें साधलें नाहीं तें शांतिसेनेच्या या थोर चारित्र्यशुद्ध शिपायानें ५१ दिवसांच्या अवधींत साधण्याचा यशस्वी प्रयत्न केला. त्यामुळें अखिल भारताचें लक्ष भूदान-यज्ञाकडे आकर्षित झालें. एवढें महनीय कार्य करून विनोबा वर्धाला परतले आणि परंधाम-आश्रमाच्या ' साम्ययोग '-साधनेंत पुन्हां ताबडतोब मग्न झाले. 'साम्ययोगा'चा प्रभाव ' साम्यवादा'ला जाणवला. त्यांतून डांगेविनोबा पत्रव्यवहार झाला. तो स्वतंत्र इतिहास आहे.

### दिल्लीचें निमंत्रण

सरकारीं-दरबारीं विनोबांच्या कार्याचें कौतुक होऊं लागलें. पं. जवाहरलाजींनीं विनोबांचा विचार समजून घेण्याची इच्छा प्रगट केली. पंचवार्षिक योजनेवर चर्चा करावयाला पं. जवाहरलालजींचें दिल्लीहून विनोबांना आमंत्रण आलें.

११ सप्टेंबर १९५१ रोजीं परंधाम-आश्रमापासून दिल्लीकडे फिरून विनोबांची पदयात्रा सुरूं झाली. १५ सप्टेंबर रोजीं नागपूरच्या सभेंत विनोबांनीं शरीरांत शक्ति असेतोंवर देशभर फिरून भूदानयज्ञ चालविण्याचें जाहीर केलें. तेव्हांपासून भूदानयज्ञ तेलंगणापुरता राहिला नसून प्रत्येक प्रांतांत सुरूं करण्याचें विनोबांनीं ठरविलें. ठिकठिकाणीं भूदान प्राप्त करीत विनोबा पुढें चालले.

२ आक्टोबर १९५१ रोजीं सागर मुक्कामीं मध्यप्रदेशांतील कार्यकर्त्यांचें महत्त्वाचें सम्मेलन झालें. या सम्मेलनांत विनोबांनीं भूदानाची पंचवार्षिक योजना निश्चित केली. १९५७ पर्यंत अखिल भारतांतून ५ कोटी एकर भूदान प्राप्त करण्याचा पवित्र संकल्प जाहीर झाला. तेव्हांपासून दरिद्रीनारायणाचा प्रतिनिधि या नात्यानें जमीनीचा $\frac{1}{6}$ हिस्सा हक्कानें विनोबा मागूं लागले. " तुम्हांला ५ मुलें असतील तर दरिद्रीनारायणाला सहावा पुत्र मानून त्याचा हिस्सा द्या. " – असा भूदानाचा अभिनव प्रचार








सुरू झाला. ७ आक्टोबरपर्यंत मध्यप्रदेशांतील पद-यात्रा चालली. पुढें विंध्यप्रदेश, मध्यभारत, राजस्थान व उत्तरप्रदेश यांतून दिल्लीपर्यंत भूदान-यज्ञाचा जयघोष झाला. या प्रवासांत मध्यप्रदेशांतून ६७०० एकर, विंध्यप्रदेशांतून १००० एकर, मध्यभारतांतून ५०० एकर, राजस्थानमध्यें ४०० एकर व उत्तर-प्रदेशांतून १०८०६ एकर भूदान मिळालें. या अवधींत हैदराबाद-भूदान-समितीनें नवें ३००० एकर भूदान मिळविलें होतें. अशा रीतीनें दिल्लींत प्रवेश केला तेव्हां भारतांतून एकूण ३५ हजार एकर भूदान मिळालें होतें. विनोबांनीं १३ नोव्हेंबरला दिल्लींत प्रवेश केला.

राजघाटच्या प्रेरक वातावरणांत विनोबांची झोपडी उभारलेली होती. १४ नोव्हेंबर रोजीं पं. जवाहरलालजींनीं विनोबांची भेट घेतली. ही भेट अपूर्व होती. गांधीजींचे आध्यात्मिक वारस आपल्या ५६ व्या वाढदिवशीं (११ सप्टें.' ५१) परंधाम आश्रमांतून निघून व ६२ दिवसांची वैभवशाली भूदान-पदयात्रा आटोपून, गांधीजींच्या राजकीय वारसाशीं त्यांच्या ६२ व्या वाढदिवशीं ( १४ नोव्हें ' ५१) राष्ट्रीय योजनेसंबंधीं चर्चा करीत आहेत, हा योगायोग अपूर्व होता.

पंचवार्षिक योजनेवरील विनोबांची टीका हा वेगळा विषय आहे. विनोबा दिल्लींत ११ दिवस राहिले. राष्ट्राध्यक्ष डॉ० राजेंद्रप्रसाद विनोबांना त्यांच्या झोंपडींत भेटावयाला आले होते. भूदानयज्ञाचा विचार दिल्लींतील थोरामोठ्यांना समजून घेण्याची आवश्यकता वाटूं लागली.

ता. १४ नोव्हेंबर १९५१ रोजीं विनोबांनीं दिल्लीहून उत्तरप्रदेशाकडे कूच केलें. या पूर्वी वर्धा–दिल्ली वाटेवर मथुरा येथें उत्तर प्रदेशांतील कार्यकर्त्यांचें संमेलन विनोबांनीं घेतलें होतें. त्या संमेलनांत इतर प्रदेशांतून १९५७ पर्यंत १ कोट एकर भूदान आणि विनोबांच्या उत्तरप्रदेशांतील मुक्कामांत पहिली किश्त किंवा हप्ता म्हणून ५ लाख एकर भूदान प्राप्त करण्याचा संकल्प कार्यकर्त्यांनीं केला होता. आर्थिक क्रांति घडवून आणण्याच्या कृतनिश्चयानें भूदान-पदयात्रा उत्तरप्रदेशांत गांवोगांव फिरूं लागली.

उत्तर प्रदेशांत भूदान-यज्ञाला चांगलें बाळसें चढलें. या यज्ञाला विनोबांनीं ' प्रजासूय–यज्ञ ' असें दुसरेंहि नांव सुचविलें. शोषित व पीडित प्रजेला त्यागाच्या अभिषेकानें शांतवावयाचें होतें. प्रजा ही आराध्यदेवता मानून तिच्या म्हणजेच समाजाच्या आराधनेचें व्यापक आयोजन विनोबा भूदान-यज्ञांतून निर्माण करीत होते. सूर्याच्या नियमिततेनें आणि गंगेच्या पवित्र भावनेनें विनोबांची भूदान–पदयात्रा उत्तर प्रदेशांत दरमुक्काम दर कूच करीत चालू होती.

ठिकठिकाणीं विनोबांची ज्ञानगंगा भूदान-यज्ञाची सांगता करीत उत्तरप्रदेशांतून प्रसन्नतेनें वाहत होती. ' सख्यभक्तीचें युग ', ' साम्ययोगाचा आदर्श ', ' साहित्यशक्ति ', ' लोकशक्तीची आराधना ', ' वागीश्वराकडून वाग्दानाची मागणी ' इत्यादि मूल्यवान् विचार या वेळीं प्रगट झाले.

विनोबांची पदयात्रा ता. १२ एप्रिल १९५२ रोजीं सेवापुरी ( बनारस ) येथें पोहोंचली. चौथें सर्वोदय-संमेलन ता. १३, १४, १५ व १६ रोजीं तेथेंच भरलें. पोचमपल्लीपासून तों सेवापुरीपर्यंत एक वर्षाच्या अवधींत ४९३६ दात्यांकडून १,०२, ३६१ एकर भूदान मिळालें होतें.

### सेवापुरी-संमेलन

सेवापुरीचें संमेलन भूदानयज्ञाला नवीन कलाटणी देणारें ठरलें. या संमेलनांत भूदान-यज्ञ गाजला. एक वर्षाच्या भूदान–यज्ञानें राष्ट्रांत एक चमत्कार घडवून दाखविला होता. समाजाचें आर्थिक परिवर्तन भूदान–यज्ञाच्या मार्गानें करून दाखविण्याची शक्यता उघड दिसूं लागली. भूदान–यज्ञाची हवा राष्ट्राला मानवूं लागली होती. म्हणून










भूदान-यज्ञाचें आंदोलन संपूर्ण राष्ट्रांत चालूं करण्याच्या दृष्टीनें 'सर्व-सेवा-संघा'चें मंत्री श्री. शंकरराव देव यांनीं १९५२ ते १९५४ या दोन वर्षांत भारतांतील ५ लाख खेड्यांतून निदान २५ लाख एकर भूदान सर्व-सेवा-संघानें मिळवावें या अर्थाचा ठराव मांडला व तो मंजूर झाला. त्याप्रमाणें प्रांतीय भूदान-यज्ञ-समित्या स्थापन होऊन प्रांतांचे भूदान-आंकडे निश्चित करण्यांत आले. तेव्हांपासून भूदान-यज्ञाला आंदोलनाचें स्वरूप प्राप्त झालें. प्रांतोंप्रांती प्रांतीय भाषांतून भूदान-प्रचाराचें वाङ्मय निर्माण झालें. भूदानकार्याला वाहिलेलीं वर्तमानपत्रें निघूं लागलीं. ठिकठिकाणीं भूदान-यज्ञाच्या सभा व मिरवणुकी निघूं लागल्या. भूदान-यज्ञाला राष्ट्रीय स्वरूप प्राप्त झालें.

सेवापुरी-सम्मेलनानें नवसमाजनिर्मितीचें ध्येय आणखी स्पष्ट केलें. ग्रामोद्योगप्रधान अर्थरचना करावयाची असल्यानें यंत्रोद्योगबहिष्काराच्या आंदोलनाची सुरुवात तेव्हांपासूनच झाली. तसेंच सूतांजलीच्या कार्यक्रमाचें महत्त्व कार्यकर्त्यांना समजावून सांगण्यांत आलें. सेवापुरी-संमेलनांतील कार्यकर्ते भूदान-यज्ञाचें लोण घेऊन उत्साहानें घरीं परतले. आपापल्या प्रांतांतील भूदान-यज्ञ अधिकाधिक चिकाटीनें यशस्वी करण्याच्या कार्याला कार्यकर्ते भिडले. श्री. शंकरराव देव, श्री. वल्लभस्वामी, आचार्य धर्माधिकारी, कु. विमल ठकार, श्री. श्रीकृष्णदासजी जाजू इत्यादि पुढाऱ्यांचे भिन्न प्रांतांतून दौरे निघाले. भूदान-यज्ञाची दुंदुभि राष्ट्रभर वाजूं लागली.

## 'सर्वै भूमि गोपालकी'

संमेलनानंतर विनोबांची भूदान-पदयात्रा फिरून सुरू झाली. मे महिन्यांत बुद्ध-जयंतीच्या दिवशीं लखनौ येथें बुद्धाच्या 'धर्मचक्रप्रवर्तना'चें कार्य भूदान-यज्ञांतून होत आहे असा विनोबांनीं निर्वाळा दिला. भूदानाचा उत्साह व प्रगति दिवसेंदिवस वर्धिष्णु होत गेली.

या दिवसांत विनोबांच्या भाषेला आत्मविश्वासाच व आत्मप्रत्ययाचें तेज प्रकर्षानें आलेलें दिसून येतें. त्यांचीं सर्व भाषणें देवदूतासारखी अत्यंत प्रभावशाली झालीं. "सबै भूमि गोपालकी" या त्यांच्या एकदाच्या उच्चाराचा परिणाम मंगरोठच्या दिवाण शत्रुघ्नसिंहावर होऊन त्यांच्या प्रयत्नानें मंगरोठच्या ६५ भूमिवानांपैकीं ६४ भूमिवानांनीं आपली सर्व जमीन भूदान-यज्ञांत अर्पण केलीं व त्यांचीं दानपत्रें विनोबांच्या मुक्कामावर नेऊन पोहोंचविलीं. व्यक्तिगत स्वामित्वाचें विसर्जन करून जमीनीच्या बाबतींत सार्वजनिक मालकी प्रस्थापित करण्याचें श्रेय मंगरोठनें सर्वांत प्रथम घेतलें. तेव्हांपासून त्या गांवांत ग्रामराज्याचें स्वप्न साकार करण्याचा प्रयत्न चालू आहे. ग्रामराज्याचा श्रीगणेशा अशा रीतीनें सुरू झाला.

भूदानयज्ञाचें वाढतें यश पाहून निरनिराळे राजकीय पुढारी आंदोलनाकडे आकर्षित झाले. बहुतेक राजकीय पक्षांनीं भूदानयज्ञाच्या समर्थनार्थ प्रस्ताव पास केले. ३० मे १९५२ रोजीं बांदा मुक्कामावर श्री. जयप्रकाशजींनीं भूदानाच्या प्रश्नावर विनोबांची भेट घेतली. त्या दिवशीं प्रार्थनोत्तर सभेंत श्री. जयप्रकाश बोलले: "गांधीजींच्या हत्येनंतर राष्ट्रांतील त्यागवृत्ति आणि निःस्वार्थतेची भावना नष्ट झाल्यासारखें वाटत होतें. परंतु भूदान-यज्ञानें फिरून त्याग व निःस्वार्थवृत्ति जागृत केली आहे. गांधीजींचा मार्ग व समाजवादाचा मार्ग गंगा-यमुनांच्या संगमाप्रमाणें भूदान-यज्ञांत विलीन झालेला दिसत आहे. भूदानयज्ञानें निश्चितपणें आर्थिक व सामाजिक क्रांति होऊन राष्ट्राचें भवितव्य उज्ज्वल झाल्याशिवाय राहणार नाहीं." श्री. जयप्रकाशांसारख्या कसलेल्या क्रांतिकारकाच्या तोंडचें भूदानयज्ञासंबंधींचे उद्गार खरें ठरविण्याची वेळ वेगानें येत आहे.

विनोबांची भूदानपदयात्रा निरनिराळ्या जिल्ह्यांतून ४ जुलै १९५२ रोजी बनारसला पोहोंचली. पावसाळा सुरू झाला होता. पुढील दोन महिने विनोबांचा काशी-विद्यापीठांत मुक्काम होता. या मुक्कामांत विनोबांनीं 'स्वच्छ भारत' आंदोलन आरंभिलें, भूदान-आंदोलनाचा तटस्थतेनें विचार करून राष्ट्रांतील एकंदर आंदोलनाचें मार्गदर्शन केलें.

११ सेप्टेंबर १९५२ रोजीं आपल्या ५७ व्या वाढदिवशीं विनोबांनीं उत्तर प्रदेशांतून बिहारकडे कूच करण्याचा निर्णय घेतला. या दिवशीं त्यांनीं प्रतिज्ञा केली कीं जोंपर्यंत भूमीचा प्रश्न समाधानकारकपणें सुटत नाहीं तोंपर्यंत वर्धेच्या परंधाम–आश्रमाला परतावयाचें नाहीं. उग्र तपश्चर्येची नांदी वाजली. नवें चैतन्य निर्माण झालें. उत्तरप्रदेशांतील कार्यकर्त्यांनीं विनोबांजवळ आपापले निश्चय जाहीर केले. विनोबा बिहारच्या वाटेनें भूदानयज्ञाचा उद्‌घोष करीत चालूं लागले.

## बिहारमध्यें भूदानाचें सखोल कार्य

आरंभाला बिहारमध्यें भूदानयज्ञाची गति अत्यंत मंद होती. त्यामुळें विनोबा अधिक उत्साहानें कार्याला लागले. त्यांना अधिक तपश्चर्येची प्रेरणा बिहारनें दिली. भूदानयज्ञाचें तत्त्वज्ञान शाखोपशाखांनीं विस्तार पावत होतें. यज्ञाच्या प्रवर्तकाचें आचरण विशुद्ध भावनेनें भारावलेलें होतें. ता. २३ आक्टोबर रोजीं पाटणा येथील सभेंत 'संपत्तिदान–यज्ञा'चा श्रीगणेशा विनोबांनीं केला. "सब संपत्ति रघुपति कै आही" या तुलसीदासाच्या वचनाचा हवाला देऊन राष्ट्रांतील सर्व प्रकारच्या संपत्तीच्या स्वामित्वविसर्जनाची मागणी केली. याच सभेंत बिहारमधील भूमीचा प्रश्न सोडविल्यावांचून बिहार न सोडण्याचा निर्धार विनोबांनीं जाहीर केला. कॉंग्रेस व समाजवादी पक्षाच्या कार्यकर्त्यांनीं आपापले संकल्प जाहीर केले. बिहारमध्यें भूदानानें नवें चैतन्य निर्माण केलें.

३१ आक्टोबर रोजीं विनोबांचा मुक्काम गया जिल्ह्यांत होता. भगवान् बुद्धांना अहिंसेच्या जीवन-तत्त्वज्ञानाचा प्रथम साक्षात्कार याच जिल्ह्यांत झाला होता. येथूनच पुढें धर्मचक्रप्रवर्तनाचें महान् कार्य भगवान् बुद्धांनीं आरंभिलें होतें. या पावन स्मृतीनें प्रेरणा मिळवून गया-जिल्ह्याला अहिंसक क्रांतिकार्याचें प्रयोग-क्षेत्र निवडण्यांत विनोबांनीं औचित्य दाखविलें. त्या जिल्ह्यांत पहिली किश्त म्हणून १ लक्ष एकर भूदान मिळविण्याचें स्थानीय कार्यकर्त्यांनी कबूल केलें. त्यांच्या मदतीला विनोबांनीं आपले प्रतिनिधि म्हणून श्री. दामोदरदासजी मूंदडा यांना गया जिल्ह्यांत ठेवलें. गया जिल्हा भूदानयज्ञाची प्रयोगशाळा आहे. भूदानप्राप्ति, भूवितरण, नवनिर्माणकार्य आणि सर्वोदयाचा समन्वयविचार त्या ठिकाणीं उत्कटतेनें दिसून यावा या दृष्टीनें सर्वसेवासंघ प्रयत्न करीत आहे.

बिहारमध्यें विनोबांची भूदान-पदयात्रा अविरत चालूं होती. डिसेंबर १९५२ च्या दुसऱ्या आठवड्यांत विषारी मलेरियानें विनोबांच्या शरीरावर हल्ला चढविला. १४ डिसेंबरला त्यांचा मुक्काम चांडिल येथें होता. पदयात्रा खोळंबली. ईश्वरी कृपेनें विनोबा मृत्यूच्या दाढेंतून परतले. या आजारानेंहि भूदानयज्ञाला गति मिळाली. श्री. जयप्रकाश नारायण यांनीं एक वर्ष केवल भूदान–कार्याला दिल्याचें याच सुमाराला जाहीर केलें. भूदानयज्ञाच्या व्यासपीठावर परस्परविरोधी राजकीय पक्ष एकत्र येऊन भूदानयज्ञाचा जयघोष करूं लागले. मार्च महिन्याच्या ता. ७,८ व ९ रोजीं पांचवें सर्वोदयसंमेलन चांडिल येथें भरविण्याचें निश्चित झालें. चांडिलसंमेलनाच्या वेळीं म्हणजे भूदान–यज्ञ सुरू झाल्यापासून दोन वर्षांत एकूण ११,५३,३५६ एकर भूदान मिळालें होतें.








### चांडिल–संमेलन

भूदान-यज्ञ-आंदोलनाच्या दृष्टीनें चांडिल-संमेलन ऐतिहासिक म्हटलें पाहिजे. भूदानयज्ञाचें लोण प्रांतोंप्रांतीं पोहोंचलें होतें. या वेळेला भूदानयज्ञ केवळ कुतूहलाचा विषय राहिला नसून अनेक विचारवंताचें लक्ष आंदोलनानें आकर्षित केलें होतें. देशविदेशचे पत्रपंडित विनोबांचा भूदानयज्ञविचार आकलन करूं लागले होते. राजकीय पुढाऱ्यांना भूदानाचा विचार करणें अनिवार्य झालें होतें. भूदानयज्ञ म्हणजे गांधीजींच्या मार्गानें आर्थिक समता आणि न्याय निर्माण करण्याचा अचूक मार्ग आहे अशी अनेकांची खात्री झाली.

चांडिल-संमेलनांत विनोबांनीं ' सर्वोदयाचें घोषणापत्र ' जाहीर केलें. " विचारशासन " आणि " कर्तृत्वविभाजना"चें तत्वज्ञान मार्मिकपणें स्पष्ट केलें. स्वतंत्र लोकशक्ति निर्माण करण्याचा आदेश या संमेलनानें दिला. या संमेलनांत विनोबांनीं सर्व विधायक कार्यकर्त्यांना " सर्वधर्मान् परित्यज्य " या न्यायानें आपली विधायक कार्यें बाजूला ठेवून भूदान-यज्ञ-आंदोलनांत कार्य करण्याची विनंति केली. त्यामुळें दुप्पट नेटानें आंदोलन पुढें नेण्याची आशा वाटूं लागली.

चांडिल-संमेलन आटोपल्यावर विनोबांनीं १२ मार्च '५३ रोजीं फिरून पदयात्रा सुरूं केली. बिहारमध्यें एकूण ३२ लाख एकर भूदान प्राप्त करावयाचें होतें. त्याकरतां मोठमोठे जमिनदार व राजेमहाराजे यांचेकडून भूदान मिळविणें आवश्यक होतें.

२९ मे १९५३ रोजीं रांकाच्या महाराजाकडून विनोबांनीं १,०२००१ एकराचें भूदान मिळविलें. पालकोटच्या राजानें १४ जून रोजीं आपल्या स्वतःची ४४५०० एकर व इतरांची मिळून एकूण ४५,१३२ एकरांचीं दानपत्रें भूदान-यज्ञांत अर्पण केलीं. रामगडच्या राजांनीं विनोबासोबत पदयात्रा आरंभिली. आपल्या नातेवाईकांकडून व स्वतःचें मिळून २ लाख एकर भूदान अर्पण केलें. पुढें दरभंगाच्या महाराजांनीं १,१८,८०० एकरांचें भूदान दिलें. जशीं मोठ्यांचीं दानपत्रें भरलीं जात होतीं तशींच लहान भूमिवानांकडून हजारों दानपत्रें भरलीं जात होतीं. भूदानयज्ञाचा प्रवाह प्रांतव्यापी झाला होता. जमीन ही कसणारांची आहे, ही भावना बिहारमध्यें वेगानें पसरूं लागली.

याच सुमारास विनोबांनीं स्वत: रोज श्रमदान देऊन " श्रमदान-यज्ञ " सुरूं केला. त्यामुळें या क्रांतींतून उत्पन्न होणाऱ्या नवनिर्मितीची कल्पना दिवसेंदिवस स्पष्ट होत गेली.

बिहारमध्यें जसें भूदानयज्ञाचें आंदोलन खेडोंपाडीं पसरलें होतें तसेंच भारतांतील भिन्न प्रदेशांत आंदोलनानें गति निर्माण केली होती. सहावें सर्वोदयसंमेलन १८ एप्रिल १९५४ रोजीं बोधगया येथें भरण्याचें निश्चित झालें होतें. त्या संमेलनापर्यंत सेवापुरीचा संकल्प पूर्ण करावयाचा होता. भूदान-यज्ञाचा सर्वत्र जोर होता. शेवटीं संमेलनापर्यंत संपूर्ण राष्ट्रांतून एकूण २,३७,०९७ दात्यांकडून २८,१५,१०१ एकर भूदान मिळालें. त्यापैकीं ५५,८९९ एकर जमिनीचें १३, ७३८ भूमिहीन कुटुंबांत भूमिवितरणहि झालें होतें. अशा थाटांत बोधगया-संमेलन भरलें.

### बोधगयासंमेलन

भूदान-यज्ञ-आंदोलनाला ३ वर्षे झालीं होतीं. भारताच्या २२ प्रदेशांत भूदान-यज्ञ-समित्या संघटित झाल्या होत्या. हजारों एकरांचें भूदान प्रत्येक प्रदेशांत मिळालें होतें. सर्व-सेवा-संघानें केलेला सेवापुरीचा संकल्प पूर्ण झाला होता. तथापि , १९५७ पर्यंत ५ कोट एकर भूदान प्राप्त करण्याच्या दृष्टीनें कार्याचा वेग वाढविणें आवश्यक होतें. म्हणून उपायसंशोधनाची गरज होती. बोधगया-संमेलनानें तो उपाय सुचविला हें या संमेलनाचें वैशिष्ट्य होय.

आतांपर्यंत एकूण लक्षावधि एकर भूदान मिळालें








हें खरें. तथापि समाज-परिवर्तनाच्या क्रांतिकार्याला एवढ्यानें समाधान मानून चालणारें नव्हतें. म्हणून या संमेलनानें प्राप्त भूदान अधिकाधिक वेगानें भूमिहीनांना वांटून देण्याचा आदेश दिला. तसेंच जेथें जमीनीचा मोठा तुकडा असेल अथवा संपूर्ण गांव मिळालें असेल तेथें नव-रचनेचें कार्य सुरूं करावयाचें होतें. या कार्याला निष्ठावंत, कुशल, विनम्र आणि उत्साही कार्यकर्त्यांची आवश्यकता होती. भूदानाचें कार्य व्यापक झालें होतें. कार्यकर्त्यांची उणीव भरून काढण्याचा उपाय या संमेलनांत अचानकपणें सांपडला. समाज बदलविण्याच्या क्रांतिकार्याला कोठून तरी प्रेरणा मिळावी तसाच प्रकार श्री. जयप्रकाशजींच्या मुखांतून 'जीवनदान-यज्ञा'चा प्रथमोच्चार होऊन शेंकडों व्यक्तींनीं या कार्याला जीवन अर्पण केल्याचा निश्चय जाहीर केला. या संमेलनाचें हें उपायसंशोधन परिणामकारक ठरलें.

या संमेलनानें भूमिवितरणाचा संदेश देऊन नवसमाजनिर्मितीच्या 'आरोहण'-कार्याचा श्रीगणेशा सुरूं केलेला आहे. त्यामुळें भूमिप्राप्तीचें कार्य किंचित् मंदावल्यासारखें भासतें. परंतु भूवितरण होऊन भूमिहीनांना प्रत्यक्ष फायदा जसा दिसून येईल तसा या आंदोलनाचा जोर फिरून वाढणार आहे.

या संमेलनांत विनोबांनीं थोरामोठ्या राजकीय पुढाऱ्यांसमोर '**अपक्ष राजनीतीचा सिद्धान्त**' मांडून ज्ञानांत अत्यंत मोलाची भर घातली. तसेंच बुद्ध आणि शंकराचार्य यांचा अहिंसा व वेदान्त यांच्या '**समन्वयाचें तत्त्वज्ञान**' सुगम भाषेंत समजावून दिलें. डॉ. राधाकृष्णन्‌सारखे आन्तरराष्ट्रीय कीर्तीचे तत्त्वज्ञ, डॉ. राजेंद्रप्रसादांसारखे विशाल हृदयाचे राजनीतिज्ञ आणि आचार्य कृपलानींसारखे विलक्षण चिकित्सक या संमेलनानें प्रभावित होऊन परतले. श्री. जयप्रकाशजींसारखे क्रांतिकारी नेते या आंदोलनाशीं तद्रूप झाले. आणि हजारों कार्यकर्ते उत्साहित होऊन फिरून आपापल्या कार्याला लागले.

विनोबांनीं या वेळेपर्यंत बिहारमध्यें सखोल कार्याची मर्यादा गांठली. १० डिसेंबरपर्यंत सुमारें २½ लाख दात्यांकडून २२ लाख एकर भूदान व सुमारें १७ संपूर्ण गांवें बिहारमध्यें मिळालीं. पुढील कार्य बिहारच्या निष्ठावंत कार्यकर्त्यांकडे सोंपवून, १ जानेवारी १९५५ रोजीं विनोबांनीं बिहार सोडून, पश्चिम बंगालमध्यें प्रवेश केला. तेथें २६ दिवसांची भूदान-पदयात्रा संपवून ओरिसामध्यें प्रवेश करणार आहेत.

आज ओरिसामध्यें भूदानयज्ञाचें वेगवान् आंदोलन सुरूं आहे. या प्रांतांत १० डिसेंबरपर्यंत ७४ संपूर्ण गांवें भूदानांत मिळालीं आहेत; ८९ जीवनदानी आहेत; १½ लाख एकर भूदान मिळालें आहे. बिहारला जें करून दाखविणें शक्य झालें नाहीं तें कदाचित् ओरिसा करून दाखवील असें दिसतें.

सौराष्ट्र व गुजराथमध्यें आंदोलनानें भरीव कार्य केलें आहे. मध्यप्रदेश व हैद्राबाद प्रगतिपथावर आहेत. आपला संकल्पित किमान वांटा ('कोटा') पूर्ण करून राजस्थाननें आघाडी जिंकली आहे. संपत्तिदानयज्ञांत मुंबईनें पुढाकार घेतला आहे. प्रत्येक प्रदेशांत थोड्याफार फरकानें परंतु नेटानें भूदानयज्ञाचें कार्य प्रगति करीत आहे.

### आंदोलनाचें यशापयश

या आंदोलनाला आतां उणीपुरीं ३¾ वर्षें झालीं आहेत. अगदीं शून्यापासून सुरुवात करून या आंदोलनानें १० डिसेंबर १९५४ पर्यंत सुमारें ४ लाख दात्यांकडून ३६ लाख एकर भूदान व ९४ संपूर्ण गांवें मिळविलीं असून नवसमाजनिर्मितीच्या कार्याला सुमारें १५०० व्यक्तींनीं जीवनदान देऊन वाहून घेतलेलें आहे. जीवनदात्यांव्यतिरिक्त इतर कसलेल्या शेंकडों कार्यकर्त्यांची जोड या क्रांतिकार्याच्या सिद्धतेकरितां मिळालेली आहे.

श्रीमंतांचें जसें दान मिळालें, तसेंच गरीबांचेंहि दान मोठ्या प्रमाणावर मिळालें. — हा सर्वांत मह-

स्वाचा भाग आहे. गरीबांच्या दानप्रक्रियेंतून क्रांतीची आशा दिवसेंदिवस बळावत असलेली दिसत आहे. श्रीमंत व गरीब दोघेहि समाजपरिवर्तनाला तयार होत आहेत. ४ लाख दात्यांनीं आम्ही आपल्या कृतीनें उत्पादनाच्या साधनांवरील स्वामित्वाचें स्वेच्छेनें विसर्जन करीत आहोंत असेंच दाखवून दिलें आहे.

त्याचप्रमाणें भूमिवितरणसमारंभ ठिकठिकाणीं सुरूं झालेले आहेत. त्यावरून प्रत्येक गांवांत जमीनीचें वांटप होणारच आहे असा विश्वास दूरवर पसरला आहे. १० डिसेंबर १९५४ पर्यंत भूमिहीनांच्या ३१,७७६ कुटुंबांना १,०४,९६८ एकर जमीन वांटलेली आहे. ही भूमिपुत्रांची सेना सर्वोदयसमाजरचनेची पाईक झाल्याशिवाय राहणार नाहीं. त्याहि दृष्टीनें खेडोंपाडीं बल वाढत आहे. भूमिवितरणाच्या प्रक्रियेंतून नवशक्ति निर्माण होण्याची शक्यता निर्माण झाली आहे.

९४ गांवांत सामुदायिक व सहकारी उत्पादनपद्धतीचें प्रात्यक्षिक सुरूं होत आहे. ग्रामराज्याचें स्वप्न साकार करून दाखविण्याच्या खटाटोपाला कार्यकर्ते लागले आहेत.

या आंदोलनापासून ही सर्व किमान दृश्य-प्राप्ति झाली. परंतु त्याहिपेक्षां **"उत्पादनाच्या साधनांवरील खाजगी मालकी विचारप्रचारानें नष्ट करण्याच्या भावने"** चें प्राबल्य दिवसेंदिवस वाढत असून या राष्ट्रांतील दलित व शोषित जनतेची जागृति विशाल प्रमाणावर होत आहे ही महत्त्वाची प्राप्ति होय. अशीच जागृति होत राहिल्यास १९५७ पर्यंत **"भूदान-यज्ञ-मूलक ग्रामोद्योग-प्रधान अहिंसक क्रांति"** यशस्वी झालेली पाहण्याचें भाग्य तुम्हाआम्हा सर्वांना लाभेल एवढी जनशक्ति आज आंदोलनांत निर्माण झालेली दिसते.

---

## विचारशासन व कर्तृत्वविभाजन

आमच्या कार्यपद्धतीचे दोन भाग आहेत. एक भाग आहे विचारशासन, दुसरा भाग आहे कर्तृत्वविभाजन. विचारशासन म्हणजे विचार समजावून सांगणें, विचार समजून घेणें, विचार समजल्याशिवाय कोणतीहि गोष्ट कबूल न करणें, विचार समजून घेतल्याशिवाय जर कोणी म्हणणें कबूल करूं लागला तर दुःखी होणें, आपली इच्छा दुसऱ्यांवर न लादणें, उलट, विचार समजावून सांगून केवळ त्यावरच संतुष्ट रहाणें ...... निरंतर, अखंड वहाणाऱ्या झऱ्यांप्रमाणें नेहमीं हिंडणारे, लोकांच्यापाशीं सतत विचार पोहोंचविणारे असे लोकांनीं बनलें पाहिजे. त्याशिवाय सर्वोदय-समाज कार्य करूं शकणार नाहीं. लोकांजवळ जाण्याची जेवढी जेवढी म्हणून संधि मिळेल, तेवढी घेतली पाहिजे. लोक एक वेळ सांगून ऐकत नाहींत तर त्यायोगें दुसऱ्या वेळीं त्यांच्याकडे जाण्याची व त्यांना सांगण्याची संधि मिळणार यामुळें आनंद वाटला पाहिजे. इतका विचार-प्रचाराविषयीं उत्साह, इतकी विचारावर श्रद्धा, इतकी विचारनिष्ठा आपल्यांत असली पाहिजे. ही विचाराची सत्ता, हें विचारशासन आमचें एक हत्यार किंवा साधन आहे.

आमचें दुसरें हत्यार आहे कर्तृत्वविभाजन. सारें कर्तृत्व, सारी कर्मशक्ति, एकाच केंद्रस्थानीं केन्द्रित होतां कामा नये, तर उलट, गांवांगांवांतून कर्मशक्ति, कर्मसत्ता निर्माण झाली पाहिजे. सत्तेचें, कर्तृत्वाचें विभाजन जर आपण केलें नाहीं, तर सेनाबल अनिवार्यच, अटळच समजावें. आपणांस राज्य असें चालवावयाचें आहे कीं येथें राज्यसत्ताच आहे कीं नाहीं याबद्दल शंका यावी ! हिंदुस्थानांत राज्यसत्ताच नाहीं असें जर कधींकाळीं लोक म्हणूं लागले, तर समजावें कीं आपलें राज्य अहिंसक झालें. म्हणूनच आम्ही ग्रामराज्यांचा उद्घोष करीत असतों. याकरितांच आम्हांला नियंत्रणाची सत्ता ग्रामाच्या ठिकाणीं हवी आहे. म्हणूनच 'नॅशनल प्लॅनिंग' ऐवजीं 'व्हिलेज प्लॅनिंग' व्हावयास पाहिजे.

—आचार्य विनोबा

[ चांडिल येथील भाषणांतून 'सर्वोदय' (७-३-१९५३) ]







श्री. रा. कृ. पाटील

# भूदान, भूवितरण आणि ग्रामोद्योग

### संपत्ति ही समाजनिर्मित

भूदानयज्ञाची भूमिका व तत्त्वज्ञान सोपें व विचाराला एकदम पटण्यासारखें आहे. संपत्ति ही समाजनिर्मित असल्यामुळें तिचें योग्य वितरण समाजांत असलें पाहिजे हा विचार आतां रूढ झालेला आहे. मध्ययुगांत युरोपमध्यें तेथील राजांनीं आपल्या अस्तित्वाबाबत एक नवीन विचार प्रवर्तित केला होता. याला 'The Divine Right of Kings' असें म्हणत. राजेलोकांना वंशपरंपरागत राज्य करण्याचा हक्क ईश्वरदत्त आहे असा त्यांचा समज होता. आपल्याकडेसुद्धां असा समज होता असें 'ना विष्णुः पृथिवीपतिः' या म्हणीवरून दिसतें. आज असा विचार आपण हास्यास्पद समजतों. कोणत्याहि देशाच्या राजाला तेथील प्रजेच्या मताविरुद्ध राज्य करण्याचा हक्क नाहीं ही आजची विचारसरणी आहे. तसेंच संपत्तीच्याहि बाबत आज विचार बदललेला आहे. स्वकष्टार्जित जरी संपत्ति असली तरी समाजापासूनच ती मिळविली आहे म्हणून समाजाचा तिजवर हक्क आहे ही आजची विचारसरणी आहे. मग आनुवंशिक संपत्तीबाबत तर बोलावयालाच नको. मृत्यु-कर, इनकम-टॅक्स, कॅपिटल लेव्ही हे आधुनिक आर्थिक विचार याच विचारसरणीवर आधारलेले आहेत. म्हणून आपल्याजवळ असलेल्या संपत्तीचा उपभोग समाजाच्या सुखदुःखाची कल्पना न करतां आपणांस घेण्याचा अधिकार नाहीं. सामाजिक जीवनाच्या यज्ञांत आपल्या संपत्तीची आहुति दिल्यावरच आपणांस तिच्या उपभोगाचा हक्क आहे हा विचार स्वाभाविकच पुढें यतो. 'तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव सः' असें भगवंतांनींच गीतेंत म्हटलें आहे. आणि उपभोग सुद्धां विश्वस्त या नात्यानें. सामाजिक संपत्तीचे विश्वस्त म्हणून तिचा उपयोग करावयाचा. ओघानेंच आपण स्वतःवर जो खर्च करूं त्याचा दृष्टिकोन 'या खर्चामुळें आपण समाजाची जास्त चांगली सेवा करूं शकूं' असाच असला पाहिजे. यालाच ट्रस्टीशिपची कल्पना म्हणतात.

ह्या कल्पना मान्य झाल्याबरोबर, भूदान-आंदोलनाचें प्रात्यक्षिक सुरू होतें. 'बाप दाखव नाहींतर श्राद्ध कर' अशा तऱ्हेचेंच हें प्रात्यक्षिक आहे. 'तुला जर ह्या कल्पना मान्य आहेत तर आपल्या वैयक्तिक जीवनांत त्याप्रमाणें वागावयाला लाग' अशी भूदान-यज्ञ-आंदोलनाची शिकवणूक आहे. तुझ्याजवळ जर जमीन असेल तर जमीन दे, संपत्ति असेल तर ती दे, बुद्धि दे, श्रम दे, जें कांहीं तुजजवळ देण्यासारखें आहे तें समाजाला देऊन मग त्याचा तूं उपभोग घे, व ही गोष्ट प्रत्यक्ष कृतींत आणून इतरांकडूनहि अशा आहुतीची मागणी कर अशी त्याची विचार-परंपरा आहे. पू० विनोबांच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे 'आधीं विचारपरिवर्तन, नंतर आचारपरिवर्तन व त्यानंतर समाजपरिवर्तन' अशी ही प्रणाली आहे.

### विश्वस्ताची कल्पना

भूमिदानाची भूमिका स्पष्ट झाल्यानंतर ती आचरणांत कशी आणावयाची हा साधारण गृहस्थापुढें प्रश्न येतो. संन्यस्तांबाबत तर बोलायलाच नको. आज पुष्कळ संन्यस्तांचा 'संसार' गृहस्थालाहि लाजवील असा चाललेला आहे. पण दान किती करावयाचें हा प्रश्न उभा राहतो. आंदोलनाचे पुरस्कर्ते आज जमिनीचा किंवा उत्पन्नाचा फक्त सहावा हिस्सा मागतात. व प्रत्येक मनुष्यापेक्षां कुणी ना कुणीतरी जास्त गरीब असल्यामुळें, प्रत्येकानें या यज्ञांत आपला हविर्भाग द्यावा अशी अपेक्षा बाळगण्यांत येते. 'पण, सहावा हिस्सा दिल्यावर आपलें कर्तव्य संपलें काय ? सहावा हिस्सा दिल्यावरसुद्धां लक्षावधि नव्हे कोट्यवधी लोक आपल्यापेक्षां वाईट स्थितींत आहेत, तेव्हां आपली जबाबदारी पार कशी पडली ? बरें, आणखी द्यावें तर त्याची मर्यादा काय ? आदर्शाला तर कांहींच मर्यादा नसते.' अशा प्रकारचे प्रश्न विचारी माणसापुढें उभे राहतात. अशा वेळीं एकच विचार मनाचें समाधान करूं शकतो व तो म्हणजे आपली विश्वस्ताची वैयक्तिक कल्पना. 'मला एवढ्याची जरूर आहे, त्याशिवाय माझें भागत नाहीं,









वैयक्तिक गरजा कमींतकमी करण्याचा भाव पूर्णपणें बाळगून सुद्धां मला एवढ्याची जरूरी आहे' हाच विचार मनाचें समाधान करूं शकतो.

## ' गरीबीचें विभाजन ' ?

भूमिदानाच्या कल्पनेमागें ' आर्थिक समानते'ची नैतिक कल्पनाच आहे कीं तिच्यांत आर्थिक विकास घडवून आणण्याची सुद्धां शक्ति आहे ? संपत्तीचें विभाजन हें समतेच्या दृष्टीनें स्वागतार्ह आहे, परंतु हें निव्वळ गरीबीचेंच विभाजन नाहीं काय ? यांतून तुम्ही गरीबी वाटत आहां, यांत उत्पादन वाढविण्याची कांहीं शक्ति आहे काय ?—असें विचारण्यांत येतें. ' गरीबीचें विभाजन ' हा शब्दप्रयोग थोडासा गैर-समज पसरविणारा वाटतो. ज्याला भूदानांत जमीन मिळते, त्याचे बाबतींत तरी गरीबीचें विभाजन हा शब्दप्रयोग खचित लागूं पडत नाहीं. कारण, निव्वळ शेतमजुरापासून त्याचा दर्जा शेत कसणाऱ्यापर्यंत होतो. जरी त्याला मिळालेली जमीन विक्री, गहाण, ठेका इत्यादि तऱ्हेनें दूर करतां येत नसली तरी जीवनांत पहिल्याप्रथम त्याला स्वतःची जमीन मिळाली असल्या-मुळें त्याची आर्थिक परिस्थिति सुधारणारच. पुष्कळांना शंका वाटते कीं पांच-सहा एकरांचा शेतकरी-मजूर, वर्षभर शेतीवर निव्वळ मजूरी करणाऱ्या मजुरापेक्षां तुलनेनें चांगल्या परिस्थितींत राहील काय ? याचें खरें उत्तर खेड्यांतच मिळूं शकतें. जर जमीन कसण्या-सारखी असली तर कोणीहि मजूर पांच एकरच का होईना पण जमीन पसंत करील. माझ्याजवळ हक्काचें कांहीं असल्यावर पडत्या भावांत मला माझी मजूरी विकण्याची गरज पडणार नाहीं अशी त्याची विचार-सरणी असते. असे शेतकरी-मजूर खेड्यांत पुष्कळ असतात व त्यांची परिस्थिति निव्वळ मजुरापेक्षां बरी असते. आणि जमीन जर चांगली—म्हणजे साधारण पीक येण्याजोगी असली-तर लोक तवढीहि जमीन मागतात. यावरून हें स्पष्ट होतें कीं जमीन घेणाऱ्याच्या बाबतींत तरी हें ' गरीबीचें विभाजन ' होत नाहीं. जो जमीन देतो, त्याचे बाबतींत जर हे शब्द लागूंच होत नाहींत. जमीन देणारा साधारणपणें गरीब नसतो व असल्यास आंदोलनाला सहानुभूति म्हणूनच त्याचें दान स्वीकारण्यांत येते. अशी दान मिळालेली अल्प जमीन सामान्यपणें वाटली जात नसून जुन्याच शेतकऱ्याजवळच राहते व तिच्या मोबदल्यांत तिचा मालक कांहीं नियमित रक्कम गांवाच्या सार्वजनिक कामास देत असतो.

यावरून हें स्पष्ट होईल कीं भूदानांतून जमिनीचें होणारें वितरण हें जमीन घेणाऱ्याच्या दृष्टीनें अगर देणाऱ्याच्या दृष्टीनें ' गरीबीचें विभाजन ' होत नाहीं. वितरण करीत असतांना, नवीन बनविण्यांत येणाऱ्या भूमिवानाला ती जमीन कसतां येण्यासारखी सोय करतां येईल याची खात्री करूनच जमीन देण्यांत येते. व जमीन कसण्याचा पूर्ण अनुभव त्याला असल्यामुळें पूर्वीपेक्षां त्या जमिनींत पीक कमी येईल अशी भीति बाळगण्याचें कोणतेंच कारण नाहीं. याचे उलट, स्वतःच्या कष्टाचें पूर्ण फळ आपल्यास मिळेल ही भावना असल्यामुळें तो ' नवीन भूमिवान् ' त्या जमिनीवर जास्ती मेहनत करोल व पूर्वीपेक्षां जास्तच पीक निघण्याचा संभव जास्त. अशी काळजी घेऊन जर जमिनीचें वाटप झालें तर उत्पादन कमी होण्याची भीति बाळगण्याचें बिलकूल कारण नाहीं. ' Peasant proprietorship has the capacity to turn dust into gold ' (' कसणारा जर मालक झाला तर मातीचें सोनें होऊं शकेल ') या म्हणीचाहि हाच अर्थ आहे. कसणाऱ्याला मात्र कसण्याचीं साधनें देण्याची पूर्ण खबरदारी घेतली पाहिजे.

परंतु एका निराळ्या अर्थानें हें गरीबीचेंच 'विभा-जन ' आहे. या लहान शेतकऱ्याचें जीवनमान फारच कमी राहणार. व तें जर वाढावयाचें असेल तर त्याच्या जवळ जास्त जमीन व्हावयास पाहिजे. इतर उद्योगधंदे करून तो आपल्या उत्पन्नांत थोडीशी भर टाकूं शकेल. पण चांगली शेती करून असें होण्याची शक्यता जरा कमीच. कारण शेती असल्यावर इतर उत्पादक धंदे करण्याची सोय जरा कमीच असते. आणि ते धंदे शेतीशीं आनुषंगिकच राहणार : जसें, दुग्धव्यवसाय, कोंबड्या पाळणें इत्यादि. तेव्हां हिंदुस्थानच्या शेतकऱ्याचें उत्पन्नहि वाढविण्याची खरी शक्यता त्याचेजवळ कसण्याकरितां जास्त जमीन मिळण्यावरच आहे. आणि हें तेव्हांच होईल जेव्हां आज शेतीवर जे आपला उदरनिर्वाह करीत आहेत त्यांची संख्या कमी होऊन इतर उद्योग-धंद्यांत त्यांचा समावेश होईल. असें होण्याची कांहीं शक्यता जर भूदानयज्ञांत नसेल तर त्यांतून खरोखरच







' गरीबीचेंच विभाजन ' होईल. सुरवातीला जे बरेचसे आक्षेप भूदानयज्ञाच्या कल्पनेच्या विरुद्ध घेण्यांत आले होते त्यापैकीं एक हा होता.

### स्वामित्वनिरसनाची कल्पना

परंतु स्वामित्व-निरसनाची कल्पना मांडल्यानंतर ह्या आक्षेपाचा मूळ पायाच ढांसळतो. शेतीवरच्या लोकसंख्येचा भार कमी होऊनच जर हिंदुस्थानच्या शेतकऱ्याची स्थिति सुधारावयाची असेल, तर शेती करण्याच्या पद्धती-( organisation of agriculture ) मध्यें अशी सुधारणा घडवून आणली पाहिजे. त्यामुळें हें शक्य होईल; व हें शेतीच्या ग्रामीकरणांतूनच होऊं शकेल. शतीचें ग्रामीकरण म्हणजे गांवाच्या संपूर्ण जमिनीवर, प्रत्यक्ष शेती करणाऱ्या गांवकऱ्यांचाच अधिकार. हा अधिकार एखाद्या समितीमार्फत वागवितां येईल. या समितीला, शेतीची सुधारणा (Land development), पिकाचें नियोजन (crop-planning) व राबणाऱ्याला भरपूर काम मिळूं शकेल इतकें शेतीवरील कामाचें वांटप या बाबतींत सर्व अधिकार राहतील. यामुळें शेतीवर राबणाऱ्यांना एका मोठ्या क्षेत्रफळावर राबणाऱ्याचा सर्व फायदा मिळून ते उत्पादनवाढींत जास्तींत जास्त भर टाकूं शकतील. हें सर्व भूदानयज्ञांतून, जी स्वामित्व-निरसनाची कल्पना आहे त्यांतूनच होणें शक्य आहे. हजारों वर्षें व्यक्तिगत मालकीच्या पद्धतीनें शेती करीत असलेल्या देशांत जर शेतीचें ग्रामीकरण व्हावयाचें असेल तर तें ' स्वामित्व-निरसना'च्याच कल्पनेंतून होईल. मोठ्या आणि लहान दोन्हीहि शेतकऱ्यांनीं 'इदं न मम ' असेंच म्हणावयाला पाहिजे. आणि म्हणूनच सर्व शेतकऱ्यांकडून दान घेण्याचा आग्रह ठेवण्यांत येतो. ग्रामीकरणाची कल्पना स्वीकारण्याचा मार्ग स्वामित्वनिरसनाच्या कल्पनेंतूनच आहे. म्हणून भूदान-यज्ञाच्या आंदोलनांत भावी उत्कर्षाचीं बीजें वास करतात असें म्हणणें सयुक्तिक व यथार्थ होईल. या दृष्टीनें विचार केल्यास आधुनिक समाजवादी विचारसरणीशीं भूमिदानाची विचारसरणी बरीच जुळते असेंच म्हणावें लागेल. स्वामित्वनिरसनांत सपत्तीचें उत्पादन, विभजन व विनिमय हीं समाजाच्या मालकीचीं होणें (' Socialisation of the means of production, distribution and exchange ') ही कल्पना पूर्णपणें येते व हाच आधुनिक समाजवादाचा मूलभूत सिद्धांत आहे.

'भूदानयज्ञमूलक ग्रामोद्योगप्रधान अहिंसक क्रांति ' हें भूदान-आंदोलनाचें ध्येयसूत्र आहे. या क्रांतीचें भविष्यांतील संपूर्ण चित्र काय आहे याची पूर्ण कल्पना यज्ञाच्या प्रवर्तकांना असली पाहिजे. विशेषतः स्वयं-पूर्णते-( Self-sufficiency ) चा आग्रह, श्रम-विभाजनापासून जी आधिभौतिक विपुलता उत्पन्न होते, तिला धोक्यांत घालण्यापर्यंत जाईल कीं काय याचें स्पष्टीकरण झालें पाहिजें. त्याचबरोबर आजकालच्या शास्त्रीय व यांत्रिक संशोधनाचा फायदा घेऊन उत्पादनाची विविधता व प्रचुरता वाढविण्याकडे समाजाचें लक्ष राहील किंवा नाहीं याहिबाबत स्पष्टीकरण हवें. या दृष्टीनें विचार केल्यास भूदानाची चळवळ, ही आधुनिक अर्थशास्त्राच्या दृष्टीनें सुद्धां उत्पादनवाढीला पोषक आहे हें सिद्ध करतां येईल. ज्या ज्या राष्ट्रांत जमिनीचें पुनर्वितरण झालें आहे त्यांच्या उत्पादनांत वाढच झाली आहे. याचें मुख्य कारण असें कीं उत्पादनाच्या पद्धतीनुसार व्यक्तिगत काळजी व देखरेख याच्यावर उत्पादनाचें प्रमाण जर पुष्कळसें अवलंबून असेल तर पुनर्वितरणानें उत्पादन वाढणारच. कारण तितक्या ज्यास्त माणसांकडून देखरेख होणार. अर्थात् उत्पादनाकरतां लागणारीं इतर साधनें – बैल, अवजार, बीं, खावटी इत्यादि – त्यांच्याजवळ असतील हें गृहीत धरून चालावयाचें. तीं नसल्यास तीं मिळविण्याची सोय पाहिजे. जमीन गेल्यानंतर या बाबींची जरूरी, जमीन-मालकास सुद्धां नसावयाचीच. तेव्हां ज्या तत्त्वावर जमीन मालकाकडून घेऊन तिचें वांटप आपण करतों, नेमकें त्याच तत्त्वावर याहि बाबींचें वांटप करतां येईल. अर्थात् मोबदला देण्यांत जमिनीबाबत जी नीति राहील तीच नीति याहिबाबत लावतां येईल. त्यामुळें हिंदुस्थानांत जमीन-वितरणानें पीक कमी येईल हा विचार ग्राह्य मानतां येणार नाहीं. नेहमींचा अनुभव सुद्धां असाच आहे कीं फार मोठ्या शेतकऱ्यांचें सरासरी दर एकरी उत्पन्न लहान शेतकऱ्यापेक्षां कमीच असतें.

### ग्रामस्वयंपूर्णतेचें तत्त्व व आधुनिक विज्ञान

परंतु हाच युक्तिवाद ग्रामोद्योगांना लावतां येणार नाहीं. आर्थिक दृष्ट्या विचार केल्यास ज्या कारणांमुळें इतर राष्ट्रांतून ग्रामोद्योगांचें उच्चाटन झालें, त्याच










कारणांमुळें हिंदुस्थानांतूनहि त्यांचें उच्चाटन होणार. याचा अर्थ असा नव्हे कीं आज त्यांची जरूरी नाहीं. ज्या लोकांना दुसरें जास्त उत्पादक काम देतां येत नाहीं, त्यांनीं उपाशी राहण्यापेक्षां ग्रामोद्योग पत्करणेंच योग्य. मात्र त्यांचा माल खपेल याची जबाबदारी सरकारनें घेतली पाहिजे. जरूर पडल्यास असा माल विकण्याकरतां त्याला सूट सुद्धां दिली पाहिजे. आज खादीच्या बाबतींत खादी व ग्रामोद्योग तसें बोर्ड करीतच आहे. परंतु काम असूनसुद्धां व्यक्तिगत किंवा ग्राम-स्वयंपूर्णतेच्या दृष्टीनें चरखा चालविण्याची निष्ठा बाळगणें ही एका दुसऱ्या कोटींतलीच बाब होऊन बसते. तें एक निराळेंच तत्त्वज्ञान आहे. त्या तत्त्वज्ञानाच्या इतर बाबींचा विचार– जागतिक शांति, आत्मोन्नति इत्यादींचा विचार येथें करणें प्रस्तुत होणार नाहीं. परंतु येवढी गोष्ट स्पष्ट केली पाहिजे कीं या तत्त्वज्ञानानुसार जी आर्थिक व्यवस्था होईल तींत श्रम जास्त व उत्पादन कमी असें व्यस्त प्रमाण राहील. याबाबत बर्ट्रंड रसेल यांचा पुढील उतारा मननीय आहे : "A peasant in an unindustrialized country may produce all his own food by means of very inexpensive tools. These tools, some of his clothes, and a few things, such as salt, are all that he needs to buy. His relations with the outer world are thus reduced to minimum. So long, as he produces, with the help of his wife and children, a little more food than the family requires, he can enjoy almost complete independence though at the cost of hard-ship and poverty ... His liberty is so dearly bought that few civilised men would change places with him. This was the lot of most of the population of civilised countries till the rise of Industrialisation ".

–( "The Impact of Science on Society ", page 44 ).

याचा तात्पर्यार्थ असा : ' औद्योगीकरण न झालेल्या देशांत एक शतकरी स्वतःचें अन्न अगदीं कमी खर्चाच्या उपकरणांनीं उत्पन्न करूं शकेल. हीं उपकरणें, कांहीं कपडालत्ता, आणि मिठासारख्या जुजबी वस्तू ह्याच त्याला विकत घ्याव्या लागतील. बाहेरील जगाशीं त्याचे संबंध अगदींच कमी राहतील. जेथपर्यंत, आपल्या कुटुंबाच्या मदतीनें, आपल्या गरजेपेक्षां तो थोडें जास्त अन्न उत्पन्न करूं शकतो, तोंपर्यंत मेहनत व गरीबी यांसहित तो जवळजवळ संपूर्ण स्वातंत्र्याचा अनुभव घेऊं शकतो. परंतु त्याचें हें स्वातंत्र्य येवढें महाग असतें कीं, आधुनिक सुधारलेल्या जगांतील फार थोडे लोक त्याचा हेवा करतील. औद्योगीकरणापूर्वी सुधारलेलें जग याच स्थितींत होतें. "

याउलट, वैज्ञानिक तंत्राचा अवलंब करणाऱ्या आधुनिक समाजाचें वर्णन बर्ट्रंड रसेल यांनीं पुढीलप्रमाणें केलें आहे :

" The most obvious and inevitable effect of scientific technique is that it makes society more organic in the sense of increasing the interdependence of its various parts. In the sphere of production, this has two forms. There is, first, the very intimate interconnection of individuals in a common enterprise e. g. in a single factory, and secondly, there is the relation less intimate but still essential, between one enterprise and another. Each of these becomes more important with every advance in scientific technique". ( Ibid. page 44 ).

या उताऱ्याचा आशय असा : "उत्पादनांत वैज्ञानिक तंत्राचा उपयोग केल्याचे उघड व टाळतां न येणारे परिणाम म्हणजे त्यामुळें समाज एकजिनसी बनतो. अशा अर्थानें कीं त्याचे निरनिराळे भाग एकमेकांवर जास्त परस्परावलंबी बनतात. दोन तऱ्हेनें हें होत असतें. एकाच कार्यांत कामावर असलेल्या बऱ्याच लोकांत जो

अत्यंत निकटचा संबंध येतो. उदाहरणार्थ, कारखान्यांत आणि निरनिराळ्या उद्योगांत जी परस्परावलंबिता येते ती. जसजसा वैज्ञानिक तंत्राचा जास्तीत जास्त उपयोग करण्यांत येईल, तसतशा या दोन्ही बाबी जास्त महत्त्व पावतील. ''

हीच परिस्थिति सर्व जगांत क्रमाक्रमानें आलेली आहे. 'स्पिनिंग जेनीं'च्या आविष्कारापूर्वी सर्व जगतांत चरख्याचें साम्राज्य होतें. आज तें कां नाहीं याचा विचार केला पाहिजे. हिंदुस्थानासारखी गुलामगिरीची परिस्थिति इतर राष्ट्रांची नव्हती त्यामुळें ते आपल्या ग्रामोद्योगांचें रक्षण करूं शकले नांहींत. उत्पादनाची नवीन प्रक्रिया कमी श्रमाची असल्यामुळें अगदीं स्वाभाविकपणें तिचा प्रसार झाला. व यांतच समाजाच्या सुखाचें बीज आहे. भूदानयज्ञाच्या क्रांतींतून जी शोषणरहित समाजरचना निर्माण होईल त्यांतून आर्थिक गुलामींतून मुक्त झालेला स्वतंत्र शेतकरी जमिनीचें उत्पादन वाढवूं शकेल व त्यामुळें देशांतील बाजारपेठ वाढून औद्योगिक प्रगतीचा पाया घातला जाईल ही अपेक्षा आहे. शेतींतून उद्योगाला लागणारा कच्चा माल मिळेल; नवीन कारखाने आपला माल भरभराटींत येत असलेल्या शेतकऱ्यांना विकूं शकतील, आणि देशाचें औद्योगीकरण ही स्वप्नांतली बाब राहणार नाहीं. हिंदुस्थान आपला मागासलेपणा सोडून देऊन एक विशाल राष्ट्र बनेल. क्षेत्रफळ व जनसंख्या यांतच नव्हे तर संपत्तींत आणि शक्तींत सुद्धां हें चित्र सार्थ करून दाखविण्याची शक्ति भूदानयज्ञांत आहे.

---

## भूदानयज्ञ आणि समाजवाद

पंडित नेहरू यांनीं नुकतेंच म्हटलें आहे : " माझ्यासमोर जो भावी हिंदुस्थानचा नकाशा आहे, तो समाजवादी तऱ्हेचा आहे ". हें ठीक आहे. परंतु आपल्या देशांत जो समाजवाद येईल, तो निराळाच असेल. जगांत आज जो समाजवाद प्रचलित आहे, तो ' विधानवादी ' आहे. आम्ही जो समाजवाद आणूं इच्छितों तो क्रान्तिकारक आहे. तो आम्ही शांति, अहिंसा, परस्पर-सहकार्य यांच्या आधारें उभारूं इच्छितों. त्याच्या द्वारें साऱ्या हिंदुस्थानचें वैशिष्ट्य आम्ही प्रकट करूं इच्छितों. असा समाजवाद प्रस्थापित करायचा तर त्याकरितां प्रत्येक व्यक्तीनें आपली शक्ति समाजाला स्वेच्छापूर्वक अर्पण केली पाहिजे.

आम्ही असा समाज बनवूं इच्छितों कीं प्रत्येक घर प्रत्येकाचें असेल. ज्याला जेथें भूक लागेल, त्याला तेथें जवळच्या घरांत जातां यावें व अन्न मागून खातां यावें. कोणाहि शेतकऱ्याला, रस्त्यानें जाणाऱ्या माणसाला बोलावून त्याच्याकरवीं व त्याच्याबरोबर काम करतां यावें. प्रत्येक घर आमचें. प्रत्येक भाऊ आमचा. हाच समाजवाद आहे. असा समाजवाद कोणतें सरकार अमलांत आणूं शकेल ? इंग्लंडमधील समाजवाद्यांकडे बघा. ते आणि कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष यांत काय फरक आहे ? तत्त्वज्ञानी सांगतात कीं, दुर्बिणींतून पाहिलें तर तो सूक्ष्म फरक दिसूं शकेल. असेलहि कांहीं फरक. पण दोन्हीहि पक्ष सत्तापरायणच आहेत ना ! जनशक्तीचें स्वतंत्र काम ते करूं शकत नाहींत. आपणांस जर येथें समाजवाद आणावयाचा असेल तर तो केवळ कायद्यानेंच, वैधानिक उपायांनींच येईल का ? तो तेव्हांच येईल, जेव्हां मूल्यांमध्यें परिवर्तन होईल.

म्हणून जे भूदानयज्ञाला केवळ दयेचें काम मानतात, त्यांना तो समजलाच नाहीं. भूदानयज्ञांत भूतदया किंवा प्रेम आहेच आहे, पण नुसतें प्रेम नाहीं. तें प्रेमशक्तीचें काम आहे. म्हणूनच यांत राजनीति किंवा राजकारण खऱ्या अर्थानें आहे. ही खरी राजनीति किंवा राजकारण इतर सर्व राजनीतींना शेवटीं उखडून फेंकून लावणार आहे. या खऱ्या राजनीतीला मी ' लोकनीति ' हें नांव देतों. अशी स्वतंत्र लोकनीति आम्हांला बनवावयाची आहे.

—आचार्य विनोबा

' सर्वोदय ' ( १५।१२।५४ ) वरून

---












प्रा. एम्. एल्. दांतवाला

# एक महान् प्रयोग

भूदान–आंदोलनाचें महत्त्व, त्या आंदोलनाचे गुण-विशेष व सामर्थ्य सिद्ध करण्याची आवश्यकता आतां उरलेली नाहीं. आतांपर्यंत तीन लाखांवर लोकांनीं ३५ लाख एकरांवर जमीन दान दिली आहे आणि तीहि दुसऱ्या कोणत्याहि साधनानें नव्हे तर केवळ तोंडांतून बाहेर पडलेल्या शब्दांना मान देऊन, ही एकच गोष्ट भूदान-आंदोलनाच्या महान् प्रभावाचा अत्यंत बोलका पुरावा आहे. तथापि, माझ्यासारख्याला जर या भूदान-आंदोलनाचें विशेष आकर्षण वाटत असेल तर तें आपल्या देशांतील जमिनीचा प्रश्न सोडविण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं आहे म्हणून इतकें नव्हे, तर या आंदोलनानें सामाजिक परिवर्तन घडवून आणायचा जो अद्वितीय उपाय, जी अपूर्व दृष्टि उपलब्ध करून दिली आहे त्यामुळें मला या आंदोलनाचें विशेषच कौतुक वाटतें. भूदान-आंदोलनांत जी महत्त्वाची सामाजिक क्रान्ति गर्भित आहे, ती शासनसत्तेच्या कायद्या-खेरीज-म्हणजेच त्या कायद्याच्या मागें असलेल्या दंडुक्या-शिवाय–जर घडून येणार असेल, तर एका नवीनच सामाजिक संस्कृतीकडे नेणारा मार्ग भूदानानें उजळला गेला, असें होईल. अर्थात् प्रस्तुत लहानशा लेखांत या व्यापक प्रश्नाचा विचार न करतां, जमीन-सुधारणेचा प्रश्न सोडविण्यास भूदान-आंदोलनाचा काय उपयोग होऊं शकेल एवढ्याच मर्यादित गोष्टीसंबंधीं विचार करा-वयाचें योजिलें आहे. भूदान-आंदोलन जर पूर्ण होऊन यशस्वी व्हावयाचें असेल तर त्याला तीन टप्प्यांतून किंवा अवस्थांतून जावें लागेल. त्या तीन अवस्था म्हणजे भूमिप्राप्ति, भूमिवितरण, आणि त्या भूमींतून ( यशस्वी शेतीचें ) उत्पादन या होत.

## भूदान-आंदोलनाचा त्रिविध कार्यक्रम

भूदान-आंदोलनाच्या वरील तीन अवस्थांतील पहिली अवस्था किंवा टप्पा हा तात्त्विक दृष्टीनें पहातां, अत्यंत महत्त्वाचा आहे. त्यापुढील दोन टप्पे–विशेषतः तिसरा टप्पा तर प्रत्यक्ष व्यवहाराशीं, शेतीच्या तंत्राशींच निगडित आहे. भूदान–आंदोलनाचें वैचारिक महत्त्व कितीहि असो; पण व्यावहारिक दृष्ट्या विचार करावया-चा तर, भूदान–आंदोलनानें आपल्या देशाच्या कृषिप्रधान अर्थव्यवस्थेवर कोणता प्रभावी परिणाम घडवून आणला या गोष्टीवरच शेवटीं त्या आंदोलना-च्या यशाचें मूल्यमापन करतां येईल. या आंदोलनाचें ध्येय 'सर्वोदय' आहे असें या आंदोलनाच्या नेत्यांकडून सांगितलें जातें. त्यांच्याकडून प्रतिपादिलें जाणारें हें सर्वोदयाचें ध्येय आणि कॉलेजमधील क्रमिक पुस्तकांतून वर्णिलेलें किंवा सरकारच्या पंचवार्षिक योजनेपुढें असलेलें सर्वोदयाचें ध्येय हीं एकमेकांपासून भिन्न असणें शक्य आहे. अर्थात तो भेद कोणता असणें शक्य आहे त्याचें विवेचन हा एक स्वतंत्रच विषय होऊं शकेल. प्रस्तुत स्थळीं, सर्वोदयवाद्यांचें जें सामाजिक–आर्थिक ध्येय म्हणून प्रतिपादिलें जातें त्या ध्येयाच्या दृष्टीनें भूदान–आंदोलनाचा विचार कर्तव्य आहे.

## किमान वैयक्तिक व सामाजिक गरजा

पहिला प्रश्न असा उत्पन्न होतो कीं आपली शेती व शेतीप्रधान अर्थव्यवस्था यांमधून आपणांस आर्थिक लाभ किती व्हावा अशी आपली अपेक्षा असावी ?–आमची पहिली व अग्रगण्य सर्वश्रेष्ठ अपेक्षा अशी कीं आमच्या शेतीनें व शेतीप्रधान अर्थव्यवस्थेनें, जे श्रम करतील त्यांना, माणुसकीला उचित असें राहणीचें मान उपलब्ध करून दिलें पाहिजे. पुरेसें अन्नधान्यादि तर त्यांना मिळालेंच पाहिजे. पण त्यापेक्षांहि इतकें अधिक उत्पन्न शेतींतून झालें पाहिजे कीं त्यांतून कांहीं अतिरिक्त मूल्य शेतकऱ्यांजवळ शिल्लक राहिलें पाहिजे; ज्या योगानें या शिलकी अतिरिक्त मूल्यांतूनच कापड, घर, शिक्षण, वैद्यकीय इलाज इत्यादि वैयक्तिक गरजा, तसेंच भूमीची उत्पादनक्षमता टिकविण्याकरितां करावी लागणारी भूमीची जतन, खतपाणी, त्याच-

'नवभारता'करितां मूळ इंग्रजींतून लिहिलेल्या लेखाचा हा अनुवाद आहे.–का. सं.

प्रमाणें गुरें व शेतीचीं अवजारें इत्यादि गोष्टी यांकरितां लागणारा सर्व खर्च नीट भागविला गेला पाहिजे यांशिवाय समाजोपयोगी अशा ज्या सामाजिक योजना–उदा० संशोधनकेंन्द्रें, रस्ते, गटार-योजना, पिण्याचें पाणी, समाजविकासकेन्द्र, एखादें देऊळ–यांसारख्या ज्या सामाजिक गोष्टी समाजाला आवश्यक आहेत त्यांना जें सामाजिक भांडवल लागतें तें भांडवल उभारण्याइतकी शिल्लक शेतीच्या उत्पन्नांतून उपलब्ध झाली पाहिजे. ही शेवटची गोष्ट मुद्दाम आवर्जून सांगण्याची आवश्यकता आहे. कारण, आर्थिकदृष्ट्या एका कुटुंबाच्या चरितार्थाला पुरेसा शेतीचा तुकडा केवढा असावा हें ठरवितांना, त्या कुटुंबांतील व्यक्तींना उद्योग व साधारण बरें जीवनमान मिळेल एवढा तो शेतजमीनीचा तुकडा असावा एवढीच एकमेव कसोटी लाविली जाते. आर्थिक दृष्ट्या व्यक्तीला पुरेसा चरितार्थक्षम शेतीचा तुकडा ठरवितांना किंबहुना अशा शेतीच्या अनेक तुकड्यांचा एक विभाग ठरवितांना त्या सर्व शेतजमीनीच्या उत्पन्नांतून त्या शेतजमीनीची नीट निगा राखण्याकरितां, त्या जमीनीची उत्पादनक्षमता वाढविण्याकरितां जो खर्च लागेल तो तर भागलाच पाहिजे, पण त्याशिवायहि सबंध समाजाला उपयोगी अशा ज्या रस्ते, कालवे अशांसारख्या योजना त्यांच्या भांडवली खर्चाकरतांहि त्या शेती उत्पन्नांतून कांहीं भाग मिळाला पाहिजे, ही गोष्ट महत्त्वाची आहे. सर्वोदयी अर्थव्यवस्था केवळ सुधारणावादी ( ameliorative ) न रहातां जर क्रान्तिकारक व्हायची असेल तर तिचा भर केवळ बेकारांना काम देऊन त्यांचा चरितार्थ भागविणें एवढ्या मर्यादित उद्दिष्टावरच असून चालणार नाहीं; एकंदर सुसंस्कृत समाजाच्या कार्यक्षम अर्थव्यवस्थेच्या ज्या आवश्यक गरजा म्हणजे उत्पादनक्षमता व भांडवलसंचय त्या देखील सर्वोदयी अर्थव्यवस्थेनें चांगल्या रीतीनें पुरविल्या पाहिजेत.

### यशस्वी शेतीची कसोटी

या वरील विवेचनाचा भूदानाशीं संबंध काय, अशी शंका येथें उत्पन्न होणें शक्य आहे. पण भूदान–आंदोलनाच्या उद्दिष्टांचा विचार केल्यास ही शंका अस्थानीं आहे, हें लक्षांत येईल. भूदानाचा कटाक्ष जसा भूतदयेवर व समतेवर आहे, तसाच त्याचा भर सर्वोदयी अर्थशास्त्राप्रमाणें बेकारांना काम देण्यावर-(employment)हि आहे. अर्थात् या उद्दिष्टाचा तसा विचार केला तर यांत आक्षेप घेण्यासारखें कांहीं नाहीं. पण बेकाराला नुसतें काम देऊनच भागत नाहीं. त्यापुढेंहि दृष्टि ठेविली पाहिजे. काम करायचें तर त्या कामानें 'संपत्ति' निर्माण झाली पाहिजे. नाहींतर तें काम म्हणजे केवळ शुद्ध काबाडकष्ट किंवा हमालीच होय. कामांतून संपत्ति तर निर्माण झालीच पाहिजे. व ती संपत्ति इतकी निर्माण झाली पाहिजे कीं माणुसकीच्या सुसंस्कृत जीवनाच्या गरजा तींतून भागल्या पाहिजेत. काम करणारी एक व्यक्ति म्हणून काम करणाऱ्याच्या वैयक्तिक गरजा भागविणें आणि तो समाजाचा एक घटक म्हणून त्याच्या सामाजिक जबाबदाऱ्या पार पाडणें या दोन्हींहि उद्दिष्टांना पुरेल एवढी किमान संपत्ति निर्माण करण्याचें सामर्थ्य त्या कामांत असलें पाहिजे.

भूदान–आंदोलनाचे तीन टप्पे म्हणून वर जे सांगितले, त्यांपैकीं जो तिसरा टप्पा यशस्वी शेती करून दाखविण्याचा तो म्हणूनच विशेष महत्त्वाचा आहे. मला तर विनयपूर्वक पण कळकळीनें व आग्रहानें असें सांगावेसें वाटतें कीं वरील त्रिविध कार्यक्रमांतील पहिलें जें कार्य जमीन गोळा करण्याचें तें कांहीं काळ स्थगित ठेवून ( –फार तर विनोबांनींच तेवढें हें कार्य चालू ठेवावें –) जमीनवितरणाचें व यशस्वी उत्पादनाचें द्विविध कार्य आधीं पुरें करावें. तें पुरें झाल्यावर मगच नवीन जमीन मिळवावी. नुकतेंच मी असें ऐकलें कीं उत्तर प्रदेशामध्यें मार्च १९५५ पर्यंत व बिहारमध्यें मार्च १९५६ पर्यंत जमीन-वांटप पुरें करून टाकावें असा निर्णय भूदान-आंदोलनाच्या कार्यकर्त्यांनीं घेतला आहे. हें ऐकून मला बरें वाटलें. माझ्या दृष्टीनें तर यशस्वी शेती करून दाखविण्याचा भूदान-आंदोलनांतील तिसरा टप्पा अत्यंत कठिण आहे.

### संभाव्य धोके टाळण्याची गरज

जमीनवांटपाची जी योजना आहे तिचें स्वरूपच असें आहे कीं, त्यामुळें जमीनीचे तुकडे लहान लहान पडणार. आपल्या अर्थव्यवस्थेच्या मर्यादा आणि सर्वोदयाचें समतेचें ध्येय यांचा विचार करतां हें अपरिहार्य म्हणून त्याला आपण तयार राहिलें पाहिजे हें खरें. पण म्हणून आहे त्यांतच संतुष्ट राहून त्यांतून जे संभाव्य धोके निर्माण होणें शक्य आहे त्यांकडे आपण डोळेझांक करतां कामा नये. जमीनीचें दान मिळालें



अनुक्रमणिका






यामुळें आपल्या जनतेच्या माणुसकीची कसोटी कळून आली. पण जमिनीचें वितरण झाल्यावर त्या जमिनीची यशस्वी लागवड करून दाखविणें यांतच आपल्या व्यवहारविषयक, तंत्रविषयक व संघटनाविषयक कर्तबगारीची खरी कसोटी लागणार आहे. भूदान-आंदोलनाचें अंतिम यश म्हणजेच भूदानाला ज्यांनीं वाहून घेतलें आहे त्या कार्यकर्त्यांचें यश शेवटीं या तिसऱ्या टप्प्यांतील कार्यांत किती यश मिळतें यानेंच ठरणार आहे. ज्यांना जमीन वांटली जाणार, त्यांच्या शेतींतून व्यक्ति व समाज यांच्या गरजा भागविण्यापुरतें जर उत्पादन झालें नाहीं, जर हें छोटे शेत-मालक कर्जबाजारी होत जाऊन त्यांच्या जमिनी प्रकट-अप्रकटपणें गहाण पडत गेल्या तर हा भूदान-आंदोलनाचा महान् प्रयोग अपेशी ठरेल. या धोक्याचा इषारा देणाऱ्या माझ्यासारख्या लोकांवर 'हे कच्च्या दिलाचे' असा आरोप येणें संभवनीय आहे, याची जाणीव ठेवूनहि मला असें आवर्जून सांगावेसें वाटतें कीं, या प्रश्नाचा भूदानकार्यकर्त्यांकडून अधिक जागरूकपणें जर विचार झाला नाहीं आणि भूदान-कार्यकर्त्यांनीं आतांपर्यंत दाखविली त्यापेक्षां अगदीं निराळीच दृष्टि व कर्तबगारी जर दाखविली नाहीं, तर आपण बाळगलेल्या मोठ-मोठ्या आशा फलद्रूप होणार नाहींत.

### शासनशक्ति व जनशक्ति

वर ज्या संभाव्य धोक्याचा इशारा दिला आहे, तो धोका टाळण्याकरितां मग निश्चित उपाय कोणता, असा प्रश्न कोणी विचारील. या प्रश्नाबाबत माझें तर असें मत आहे कीं भूदान-आंदोलनांतून निर्माण होणारी जबाबदारी जर संपूर्णतया पार पाडावयाची असेल तर त्याकरितां सरकारशीं या ना त्या स्वरूपाचें सहकार्य होणें आवश्यक आहे. कोणत्यातरी स्वरूपांतील सरकारी सहकार्याशिवाय तें शक्य नाहीं. एखादी साधी सहकारी क्रेडिट सोसायटी जरी काढायचें म्हटलें तरी त्याकरितां भूदान-कार्यकर्ते आणि सरकारी यंत्रणा यांच्या संयुक्त सहकार्याची जरूरी आहेच. भूमिवितरणानंतर पुढचा कार्यक्रम तपशीलवारपणें सांगतांहि येईल. पण सरकारशीं सहकार्य करणें हें मुळीं भूदान-आंदोलनाच्या मूळ तत्त्वज्ञानाशींच विसंगत आहे अशी विचारसरणी भूदानकार्यकर्त्यांमध्यें प्रचलित आहे. त्या विचारसरणीचा पगडा आज भूदान-आंदोलनावर असल्यामुळें, तसा कार्यक्रम तपशीलवार सांगण्यांत आज हंशील नाहीं. जनशक्तीचें अपरंपार महत्त्व मला संपूर्णपणें मान्य आहे व तें मला पटतें. परंतु शासनशक्ति व जनशक्ति यांमध्यें नेहमीं विरोधच असला पाहिजे हें मात्र मला पटत नाहीं. अशी आशा आहे कीं, पुढेंमागें शासनशक्ति व जनशक्ति यांमधील हा गृहीत धरलेला विरोध मिटेल. असा विरोध नाहींसा झाल्यानंतरच, भूदान-आंदोलनाच्या तिसऱ्या टप्प्यांतील उद्दिष्टाच्या तपशिलाचें किंवा कार्यपद्धतीचें तंत्र स्पष्ट होऊं लागेल. भूदान-आंदोलनाच्या पहिल्या दोन टप्प्यांतील कार्यक्रम — भूमिप्राप्ति आणि भूमिवितरण हे खरोखरींच अहिंसामय मार्गानें पार पडले आहेत व पडत आहेत. आतां यापुढें, जी जमीन वांटली गेली त्या जमीनींतून जर यशस्वी शेती — वर जी यशस्वी शेतीची कसोटी मानली आहे त्या कसोटीवर जर यशस्वी शेती सरकारी यंत्रणेवर न विसंबतां होऊं शकली तर खरोखरींच अहिंसक, शासनमुक्त समाजाचा पाया अपेक्षेच्या पलीकडे खूपच लवकर घातला गेला असें म्हणतां येईल.

---

## आपल्यापुढील काम

थोडी आग इथें थोडी तिथें असें करण्यानें देशांत खरी आग पेटत नसते. घरोघर चुली पेटवून देशांत अग्नि प्रगट होत नाहीं. आंतूनच जेव्हां अग्नि प्रगट होतो, तेव्हांच समाज बदलतो. या दृष्टीनें जर कार्यकर्त्यांनीं पाहिलें तर त्यांच्या लक्षांत येईल कीं, भूदान घेणें हा तर त्या कामाचा फारच थोडा भाग आहे ! खरें काम हें आहे कीं, स्वतंत्र जनशक्तीच्या जोरावर भूमिहीन वसवले गेले पाहिजेत, त्यांना शेतीचीं साधनें मिळालीं पाहिजेत, गांवोगांव कच्च्या मालाचा पक्का माल बनला पाहिजे आणि गांवोगांव शिक्षणाची संपूर्ण व्यवस्था झाली पाहिजे. आम्हांला तर ग्रामराज्य उभें करावयाचें आहे. हें कार्य आपल्यासमोर आहे. जे विचार करतील त्यांना असें स्पष्ट दिसून येईल कीं आपणांपुढें कामच काम पडलें आहे. आणि मग असा विचार करणारे तरुण लोक या यज्ञांत स्फूर्तीनें भाग घेतील.

— आचार्य विनोबा

'सर्वोदय' ( १५।१२।५४ ) वरून










प्रा. ठाकुरदास बंग

# भूदान आणि शिक्षितवर्ग

विनोबाजींनीं प्रसृत केलेल्या भूदानयज्ञ-आंदोलनास आतां जवळजवळ चार वर्षे होतील. या आंदोलनांत जमीनहि अपेक्षेबाहेर मिळाली. संपत्तिदानासहि आरंभ झाला आहे. यज्ञाच्या साहित्यासहि प्रचंड प्रमाणांत मागणी आहे. विनोबाजींच्या १५००० मैलांहून अधिक झालेल्या पदयात्रेनें गरीबांत व खेडुतांत यज्ञाचा बराच प्रचार झाला आहे. श्रीमंतांनाहि आपली जमीन व अन्य मालमत्ता जाणार म्हणून कळून चुकलें आहे. पण अजूनहि या आंदोलनांत पुरेशा प्रमाणांत कार्यकर्ते पडले नाहींत. विशेषतः कोणत्याहि आंदोलनाचा प्राण जो शिक्षितवर्ग तो या आंदोलनांत अभावानेंच दृष्टोत्पत्तीस येईल. याचें कारण काय ? आपलें तन-मन-धन समतेच्या या आंदोलनाकरितां अर्पण करण्याची शिक्षितांत कां प्रेरणा होत नाहीं ?

कारण ही क्रांति नवीन आहे. या क्रांतीची पद्धतीहि अजब आहे. शिक्षित विचारतातः " तीसपसतीस लाख एकर जमीन मिळणें व त्यांतील हजारों एकर वांटणें म्हणजेच क्रांति आहे काय ? मागण्यानें कोठें क्रांति झाली आहे ? दान मागण्याची पद्धति पुरातन काळापासून चालू आहे. 'दानं संविभागः' असा एखादा जुना शास्त्राधार धुंडाळून काढल्यानें कां कोठें दान क्रांतिकारी होऊन जाईल ? येऊनजाऊन विनोबाजी किंवा त्यांचे सहकारी एकच गोष्ट सांगतात ना कीं 'पदयात्रा काढा, लोकांना विचार समजावून सांगा, दान मागा.' पण लोकांना काय विचार समजावणार ? आम्हांलाच जर भीक मागण्याची प्रक्रिया पटत नाहीं तर इतरेजनांस आम्ही काय समजावणार ? एक वेळ मागण्यानें जमीन न मिळाली तर विनोबाजी म्हणतात : 'पुन्हा जा, आणखी एकवेळ जा, त्यांच्याकडे पुन्हा-पुन्हा जा.' आजच्या विमानांच्या जमान्यांत नुसत्या पायपिटीनें व भीक मागत बसण्यानें देशासमोर 'आ' वासून उभा असलेला दारिद्र्याचा व विषमतेचा प्रश्न काय कधीं सुटला आहे ? 'पुन्हां पुन्हां जा' या ठरीव चाकोरीच्या सांचेबंद उत्तराशिवाय दुसरें उत्तर जोपर्यंत या यज्ञाच्या आचार्यांजवळ नाहीं तोंपर्यंत लोचटपणें नुसतेंच मागत राहणें आजकालच्या कोणत्या स्वाभिमानी शिक्षितास पसंत पडेल ? असे किती लोक निराश न होतां निष्काम वृत्तीनें मागत सुटणार आहेत ? अशा 'जो दे उसका भी भला और न दे उसका भी भला' अशा तऱ्हेच्या साधुसंन्याश्यास योग्य आंदोलनांत मूठभर लोकांशिवाय कोण येणार ? मूठभर लोकांच्या इकडून तिकडे भटकण्याला व तीच ती ठराविक चाकोरींतील बडबड करण्याला चळवळ म्हणतात कीं ही कांहीं अंधश्रद्धाळु लोकांची शुभ हेतूनें प्रेरित झालेली वळवळ आहे ? तरुणांच्या मुसमुसणाऱ्या तारुण्यास व पुरुषार्थास यांत वाव कोठें आहे ?" वरील विचार आजच्या शिक्षितांचे व तरुणांचे आहेत म्हणून ते या आंदोलनांत प्रचंड प्रमाणांत पडलेले दिसत नाहींत.

## क्रान्तीची नवीन प्रक्रिया

म्हणून आपण क्रांति कशास म्हणतात तें पाहिलें पाहिजे, म्हणजे आजची ही भूदानयज्ञाची प्रक्रिया क्रांति आहे कीं नाहीं हें ठरवितां येईल. क्रांति म्हणजे समाजांतील प्रचलित मूल्यांत व तदनुकूल असणाऱ्या बाह्य आचारांत व संस्थांत मूलगामी व शीघ्र परिवर्तन. मला वाटतें क्रांतीची ही परिभाषा सर्वमान्य होईल. भूदानयज्ञाच्या द्वारें कांहीं जमीन भूमिवानांजवळून घेऊन ती भूमिहीनांस देणें हें कांहीं भूदानाचें लक्ष्य नाहीं. विनोबाजी आज जमिनीचा वा उत्पन्नाचा एक हिस्सा मागतात. व्यक्तिगत स्वामित्वाच्या आजच्या दृढमूल झालेल्या कल्पनेस – भारतीय घटनेंतहि मान्यता मिळालेल्या संस्थेस– ते मुळींच मानीत नाहींत. उलट, जमीन व संपत्ति सर्वच ईश्वरनिर्मित वा समाजनिर्मित आहे असें ते मानतात. ही कल्पना ज्यास पटेल त्यानें आरंभ म्हणून आपल्या जमिनीचा किंवा उत्पन्नाचा एक हिस्सा समाजास परत करावा, हा भूदानयज्ञामागील तत्त्वज्ञानाचा ताबडतोब आचरण करण्यायोग्य व्यावहारिक भाग. जमीनीचें ग्रामीकरण, लहान लहान उद्योगधंदे विश्वस्ताच्या भावनेनें चालविणें व मोठमोठ्या धंद्यांचें राष्ट्रीयीकरण हें या यज्ञाचें शेवटचें लक्ष्य. आजच्या कल्पनेंत व संस्थांत हा मूलगामी बदल नाहीं काय ?

ही कल्पना क्रांतिकारी असल्यामुळें विनोबाजी








विचारप्रचारावर एवढा जोर देतात. शंकराचार्यांनंतर नुसत्या विचारप्रचारावर इतकी श्रद्धा ठेवणारा मनुष्य भारतांत तरी क्वचितच झाला असेल! प्रथम विचार-परिवर्तन, मग ( व्यक्तिगत ) आचारपरिवर्तन व नंतर याचा परिणाम म्हणून समाजपरिवर्तन ही या क्रांतीची थोडक्यांत प्रक्रिया. विनोबाजी म्हणतात कीं विचार-परिवर्तनाबरोबर आजच आचारपरिवर्तनासहि सुरुवात करावी. कायद्यावर विश्वास ठेवणाऱ्या लोकांना बहुमतानें कायदा पास करण्याकरितां मतांची जरूर भासते. ज्यास ज्यास पटतें त्यानें आजपासूनच तसें आचरण केलें पाहिजे हा दंडक कडकपणें पाळावा असें ज्यास वाटत नाहीं त्यांच्यांत कायद्यांतून पळवाटा काढण्याची बुद्धि निर्माण होते. हिंसक प्रक्रियेंत – साम्यवादांत वा समाज-वादांत – स्वतः आचरण केलेंच पाहिजे अशी सक्ती नाहीं. विनोबाजींच्या प्रक्रियेंत नुसतें मतपरिवर्तनच पुरेसें नाहीं. आचारपरिवर्तनासहि आरंभ करावयाचा आहे. त्यामुळें विचारपरिवर्तन स्थिर व बलवान् होईल व समाजपरिवर्तनाकरितां प्रबळ लोकमत तयार होईल. वातावरण पालटेल, परिस्थिति बदलेल. बरेंचसें करावयाचें कामहि– जमीनीच्या व संपत्तीच्या न्याय्य वितरणाचें कामहि– उरकून जाईल. भावी समाजरचनें-त तर नुसतीं उत्पादनाचीं साधनेंच काय, पण खाजगी उपभोगांच्या वस्तू, आपलें शरीर, मन, ज्ञान— सर्वच समाजाचें समजून विश्वस्तभावनेनें त्यांचा वापर करावयाचा आहे. म्हणूनच भंग्याचें व राष्ट्रपतीचें वेतन समान असावें व दोघांचेंहि कामें समाजोपयोगी असल्यामुळें दोघांचाहि दर्जा सारखा असावा असे विनोबाजी चाहतात. हे सर्व बदल लवकरांत लवकर व्हावेत म्हणून आरंभींच्या एका कामाच्या कालमर्या-देचाहि त्यांनी निर्देश केला आहे. १९५७ पर्यंत जमीनीवर मेहनत करणाऱ्या सर्व भूमिहीनांना वाटण्या-इतकी जमीन भूदानयज्ञांत मिळाली पाहिजे ही त्यांची मनीषा.

## ' याचि देहीं याचि डोळां ' – !

अशा रीतीनें हळूहळू रेंगाळत चालणारा हा सुधार-णेचा कार्यक्रम नाहीं. हे सर्व मूलगामी बदल अत्यंत द्रुतगतीनें घडवून आणावयाचे आहेत. आज हिंदु-स्थानांत कित्येक दशकांपासून श्रमिकांच्या संघटना काम करीत आहेत व संप-आदि हत्यारांनीं त्या मालकां-शीं झगडतात. या संघटना किंवा संपासारखे प्रकार क्रांतीस जवळ आणणारे मानले जातात. हिंदुस्थानांत तरी कोठेंहि व केव्हांहि उद्योगांच्या राष्ट्रीयीकरणाकरितां संप झालेला नाहीं. लहानसहान अंतर्गत सुधारणा घडवून आणण्याकरितां किंवा तात्कालिक अन्यायनिवा-रणाकरितां–जसे कामाचे तास, सुट्ट्या, पगार-आदी-करितां–संप होतात. याउलट, भूदानयज्ञानें सर्व जमीनी-चें ग्रामीकरण करावयाचें आहे, अन्य मोठीं उत्पा-दनाचीं साधनें सहकारी किंवा राष्ट्राच्या मालकीचीं करावयाचीं आहेत, ठोक, व्याज व नफा हीं उत्पन्नाचीं अंगें समूळ काढून टाकून श्रमावर आधारलेली अर्थ-व्यवस्था आणावयाची आहे. याकरितां ' जमीनीच्या क्षेत्रांत खंड कमी करा, कुळांना संरक्षित कुळें करा ' इत्यादि ज्या लहानसहान हक्कांकरितां किसानसंघटना लढतात ते अधिकार विनोबाजी उच्चारीत सुद्धां नाहींत. त्यांनीं मुळांतच हात घातला आहे. जमीन घेऊन त्यांनीं ती वाटण्यास सुरुवातहि केली आहे. ग्रामी-करणाकरितां न मागतांहि त्यांना ६०–७० गांवें मिळालीं आहेत. इतक्या थोड्या अवधींत इतकी मूल-गामी गोष्ट करण्याची भाषा बोलणें व तदनुसार पाऊलें उचलणें ही जर क्रांति नसेल तर मग क्रांति कशास म्हणावें? आपण कालावधीच्या दृष्टीनें अन्य रीतीनें या प्रश्नाकडे पाहूं या. रूसो, व्हॉल्टेर, मार्क्स आदि विचारकांनी तपेंच्या तपें नुसत्या नवीन विचारप्रचारांतच घालविलीं. सत्ता ताब्यांत घेण्याच्या हेतूनें आवश्यक संघटन करण्यांत लेनिनची व माओची कांहीं दशकें गेलीं. क्रांति झाल्यानंतर प्रतिक्रांतीची भीति दूर करण्यांत आणखी कांहीं वर्षें वायां जाऊं द्यावीं लागलीं. म्हणूनच चीनमध्यें १९१० मध्यें राणीस बाजूस सारलें. पण चीनमध्यें क्रांतिकारी बदल सत्ताग्रहणानंतरच म्हणजे १९४९ नंतर सुरू झाले. आपणांस स्वराज्य १९४७ वर्षीं मिळालें व १९५१ पासूनच भूदानयज्ञाचा म्हणजेच जमीनवांटणीचा कार्यक्रम सुरू झाला. विनोबाजी तर विचारपरिवर्तनाचा, आचारपरिवर्तनाचा व समाजपरिवर्तनाचा कार्यक्रम ' याचि देहीं याचि डोळां ' पाहूं इच्छितात व १९५७ पर्यंत त्यांना जमीनीच्या क्षेत्रांत एक टप्पा गांठावयाचा आहे. पंधरावीस वर्षांत इतर क्षेत्रांतहि क्रांति पूर्ण करावयाची आहे. प्रतिक्रांतीची तर गोष्टच नको, कारण मतपरि-

वर्तनानें व वातावरणपरिवर्तनानेंच ही अहिंसक प्रक्रिया सुरू होते. ज्या उत्कटतेनें व विद्युद्वेगानें त्यांनें काम चाललेलें आहे, ज्या तीव्रतेनें आर्थिक विषमतेच्या मागें ते हात धुवून लागलेले आहेत, गोरखपुरमध्यें दुष्काळ असो कीं उत्तर बिहारांत पूर असो ज्यांना त्यांतूनहि भूदानयज्ञास पुष्ट करणाऱ्या संदेशाचेंच दर्शन होतें व आपलें भूदानाचें काम बाजूस सारून क्षणभर संकटनिवारणाचें काम हातीं घ्यावें असें वाटत नाहीं, त्या तीव्रतेनें हा सर्व कार्यक्रम पंधरावीस वर्षांत बव्हंशीं पूर्ण होणार नाहीं असें म्हणण्याचें धाष्ट्र्य कोण करील ? जगांतील अनेक क्रांत्यांचा इतिहास पाहिला म्हणजे इतका क्रांतीचा कार्यक्रम कधींकाळीं कोणी अवलंबिला कीं नाहीं याचेंच कोडें पडतें !

## १९२० आणि १९५१

विनोबाजींची इच्छा खाजगी संपत्तीच्या आजच्या कल्पनेंत आमूलाग्र बदल करण्याची आहे व लवकरांत लवकर ते हें करूं इच्छितात हें टीकाकारांस पटतेंहि. पण ते मग म्हणतात : " नुसत्या समजावण्यानें, नुसत्या सामोपचारानें व उपदेशानें हें सर्व होईल काय ? हें सर्व करविण्याकरितां विनोबाजींजवळ लढाऊ संघटना कोठें आहे ? " गांधीजींनीं ज्यावेळीं १९२० मध्यें असहयोगाचा कार्यक्रम पुढें मांडला, १९३० मध्यें मिठाचा सत्याग्रह सुरूं केला त्या वेळेलाहि संशयात्मे असेंच म्हणत होते कीं यानें काय ब्रिटिश साम्राज्य नष्ट होणार आहे, यानें काय समुद्र आटून जाणार आहे ? १९२० च्या पहिल्या तडाख्यानें जरी साम्राज्याचा डोलारा कोसळून जमीनदोस्त झाला नाहीं तरी त्यास प्रचंड प्रमाणांत हादरा बसला हें ब्रिटिश राज्यकर्तेदेखील कबूल करीत होते. मीठसत्याग्रहाची तर फलश्रुतिच गांधी-इर्विन पॅक्टनें झाली. ह्याच गांधीयुगांतील चमत्काराची आज पुनरावृत्ति झाली आहे. विनोबांच्या हांकेस देशानें जें उत्तर दिलें त्यामुळें अर्थशास्त्राचे अंदाज पार चुकले आहेत. कोण साडेतीन वर्षांपूर्वी जाणत होता कीं विनोबास ३६ लाख एकर जमीन मागून मिळेल ? कोणास स्वप्न पडलें होतें कीं जमीनीचा सहावा हिस्सा मागत असतां ६०-७० गांवांची संपूर्ण जमीन भूदानांत मिळणार आहे ?—तसेंच अनेकांनीं जर समजूनउमजून जोर लावला तर ही क्रांति ठरलेल्या वेळेपेक्षांहि लवकर पूर्ण होणें काय अशक्य गोष्ट आहे ? शेवटीं, कोणत्याहि क्रांतींत रक्तपात अनिवार्य नसतो. उलट, रक्तपातानें घडवून आणलेलें परिवर्तन स्थायी नसतें. जनमन त्यामुळें बदलत नाहीं. त्यामुळें प्रतिक्रांतीची शक्यता निर्माण होते व पांचदहा वर्षें प्रतिक्रांतीचा बीमोड करण्यांत जातात. त्यांतून हुकूमशाही निर्माण होते. अहिंसक क्रांति अमोघ असते. कारण यांत जबरदस्तीनें कांहींच करावयाचें नसतें.

आपण दुसऱ्या एका दृष्टीनें अहिंसेच्या या अभिनव प्रयोगाकडे पाहूं या. शेवटीं क्रांतीचा अर्थ परिवर्तन आहे ना ? मग क्रांति करण्याच्या पद्धतींत परिवर्तन करावयास नको काय ? कीं मार्क्स, लेनिन व माओ यांनीं ज्या मार्गानें क्रान्ति केली त्याच मार्गानें क्रांति होणार आहे ? त्याच त्याच जुन्या धोपट मार्गानें जग गेलें तर तो मार्ग क्रांतिकारक होईल काय ? तो तर सनातनी रुळलेला मार्ग झाला. तें तर जीर्णमतवाल्यांचें भांडवल झालें. क्रांति या शब्दांतच नित्यनावीन्य अनुस्यूत नाहीं काय ? गांधीजींनीं अहिंसेचा जो प्रयोग केला त्यांत बहिष्कार, पिकेटिंग, कायदेभंग आदि प्रकार प्रमुख होते. मग तेच प्रकार विनोबाजींनीं प्रथमपासूनच आचरावयास पाहिजेत काय ? १९२० पेक्षां १९५४ चा काळ हा पुढचा काळ आहे ना ? १९२० ची परिस्थितीहि आज नाहीं. त्यावेळेस एका सैतानी साम्राज्याविरुद्ध युद्ध करावयाचें होतें. आज प्रौढमताधिकारानें निवडलेलें जनतेचें सरकार आहे. आज नागरिकस्वातंत्र्य आहे. मग परिस्थिति बदलल्यावर त्याच जुन्या अस्त्रांचा कोण कुशल सेनानीं उपयोग करील ? अहिंसेच्या शास्त्रांत मानवाची प्रगति व्हावयास नको काय ? जें काम १९२० मध्यें स्थूल सत्याग्रहानें झालें तेंच काम किंवा त्यांपैकीं बरेंचसें काम समजावण्यानें आज कां होऊं नये ? पुढें चालणारा खड्ड्यांत पडला तर मागाहून येणाऱ्यानेंहि खड्ड्यांत पडूनच शहाणपण शिकलें पाहिजे इतका मानव मूर्ख नेहमींच राहणार आहे काय ? सर्व जाणतात कीं विनोबास सत्याग्रहादि अस्त्रें पूर्णपणें माहीत आहेत. गांधीजींनीं त्यानांच १९४० च्या सत्याग्रहांत प्रथम सत्याग्रही निवडलें होतें याचें विस्मरण लोकांस झालेलें नाहीं. मग सत्याग्रहाचा उपयोग सफलतापूर्वक करण्याचें ज्ञान व कौशल्य सेनापतींत आहे या जाणिवेनेंच सत्याग्रहाची अनावश्यकता वाटूं नये काय ?









कमींत कमी योग्य संधि श्रीमंतांस देणें शहाणपणाचें ठरणार नाहीं काय ?

१९२० च्या व १९५१ च्या परिस्थितींत दुसराहि एक फरक होता. आजहि तो कांहीं अंशीं कायम आहे. १९२० मध्यें ब्रिटिश सरकार आपणांस नको ही भावना मॉंटफर्ड सुधारणांच्या तोकडेपणामुळें व जालियन-वाला बागेसारख्या घटनांमुळें बहुसंख्य देशवासीयांची झाली होती. पण तशी परिस्थिति आर्थिक विषमते-बाबत नाहीं. प्रत्येकास वाटतें कीं त्याच्याहून अधिक श्रीमंतानें चालविलेलें शोषण बंद व्हावयास पाहिजे. पण स्वतः करीत असलेल्या शोषणाकडे कोणाचें-च लक्ष नाहीं. १९५१ सालीं शंभर-दोनशें एकर जमीन बाळगण्यांत आपण फारसा अन्याय करीत आहोंत असें जमीनदारांना वाटत नव्हतें. हजार दोन हजार रुपये मासिक पगार घेण्यांत त्यागी जन-सेवकांनाहि आपण अन्याय करीत आहोंत असें आजहि वाटत नाहीं. अशा परिस्थितींत देशांतील जमीनीचें व राष्ट्रीय उत्पन्नाचें गणित देशवासीयांस समजावयास नको काय ? भारतांत संपत्तीचें विभाजन म्हणजे गरीबीचें विभाजन आहे असें देशांतील मोठ-मोठे पुढारी म्हणत असतांना गरीबीमुळेंच न्याय्य वितरणाची अधिक तीव्र आवश्यकता असते हें सर्वांस सांगावयास व पटवावयास नको काय ? प्रथम विचार-परिवर्तन झाल्याशिवाय कोणता सेनापति पुढचें पाऊल टाकील ? समाजास योग्य अवकाश दिल्याशिवाय तीव्र शस्त्रांचा वापर करण्याबद्दल विचार सुद्धां करणें धर्म्य होईल काय ?

## गरीबांची प्रभावी संघटना

पण विनोबाजी नुसता आज विचारप्रचारच करीत नाहींत. पुढें लढाईची आवश्यकताच भासली तर दान मागून ते आज रिक्रूटभरतीहि करीत आहेत. म्हणून ते गरीबांजवळूनहि दान मागतात. शिवाय गरीबांचीहि चित्तशुद्धि व्हावयास हवी. कारण गरीबहि खाजगी मालमत्तेच्या शृंखलांनीं बद्ध आहे. त्यासहि श्रीमंती हवी आहे. यासाठीं त्याची अहर्निश धडपडहि चालू आहे. या प्रतिस्पर्धेंत सफल माणसास श्रीमंत म्हणतात, असफल माणसास गरीब म्हणतात. बाकी दोघांच्याहि मनोवृत्तींत वा आचरणांत मोठासा फरक नाहीं. म्हणून विनोबाजींस गरीबांजवळूनहि–प्रतीकात्मकच कां होईना–दान हवें आहे. हिंसक फौजेंत सैन्यभरती करतांना छाती, वजन, उंची आदि पाहतात कीं नाहीं ? मग खाजगी मालमत्तेच्या विरुद्धच जेथें लढाई आहे तेथें खाजगी मालमत्तेचा त्याग जर सैनिकानें करण्यास आरंभहि केला नसेल तर असे ‘ हो ’ ला ‘ हो ’ लावणारे व लोभाकरितां जमा झालेले बाजारबुणगे संग्रामाच्या प्रथम तडाख्यांत-च रणांतून पळ काढतील कीं नाहीं ? व अशा रिक्रुटां-चा नैतिक प्रभावहि इतरांवर काय पडेल ? म्हणून-च विनोबाजी गरीबांजवळूनहि थोडीशी जमीन किंवा महिन्यांतून एका दिवसाची कमाई मागतात. लाखों गरीबांच्या दानानें आजचें लोभाचें वातावरण बदलेल. आवश्यक नैतिक शक्ति निर्माण होईल. शेवटीं समाजां-त गरीबच जास्त आहेत. गरीबांनीं दान दिल्यावर श्रीमंत आपली संपत्ति न सोडण्याचें दुःसाहस करूं शकणार नाहींत. विनोबाजी गरीबाजवळून दान घेऊन आपली सेना अमोघ करीत आहेत. अत्यंत प्रभावी संघटना निर्माण करण्याचा असा हा अद्भुत कार्यक्रम आहे.

पण मग शिक्षित विचारतात : “गरीबांच्या कल्याणा-करितां चाललेल्या या लढाईंत गरीबांजवळून दान घेऊन त्यांस अधिकच गरीब कां करतां ?” उत्तर सोपें आहे. गरीबांच्या कल्याणाकरितां जी लढाइ आहे तींत गरीब भरती होणार नाहींत तर कोण भरती होतील ? अन्यथा, हें आंदोलन गरीबांचें होणार नाहीं. गरीबांकरितां होईल. यांतून दये-(patronage) ची मनोवृत्ती निर्माण होईल, हक्काची चळवळ निर्माण होणार नाहीं. आणि शेवटीं गरीबांनीं त्याग न करावा तर कोणीं करावा ? गांधीजींनीं इंग्रजी राज्याविरुद्ध युद्ध पुकारलें. हिंदी लोक तर आधींच शोषित होते, पीडित होते. पण त्यांनींच मुख्यतः गांधीजींच्या सत्याग्रहांत भरती होऊन अधिक यातनांस निमंत्रण दिलें कीं नाहीं ? अँड्र्यूजसारखे मूठभर इंग्रजहि आले. तसेच श्रीमंतहि येत आहेत. पण या लढाईचा मुख्य भार गरीबांनींच उचलावयाचा आहे. रशियांमध्यें व चीनमध्यें लेनिनच्या व माओच्या लढाईंत गरीब लोक भरती झाले कीं श्रीमंत ? शहरांत मजूर संप करतात त्यावेळेस त्याग कोण करतात ?

म्हणून विनोबाजींनीं अत्यंत शास्त्रशुद्ध अशी ही







लढाई अभिनव मार्गानें आरंभलेली आहे. जगाच्या इतिहासांत यास तोड नाहीं असा हा नवीन मार्ग आहे. जुन्या सत्याग्रहाचींहि बीजें यांत दिसतील. कोणीं शंभरदोनशें एकरांतून दोनचार एकर जमीन देऊं लागला तर विनोबाजी ती स्वीकारीत नाहींत. विनोबाजीच काय – एखादा लहानसहान कार्यकर्ताहि इतक्या तोकड्या दानास स्पर्श करत नाहीं. हा सत्याग्रह नाहीं तर काय आहे ? १९४२ मध्यें क्रिप्स-प्रस्तावाचा अस्वीकार करण्यांत जशी राष्ट्राची स्वातंत्र्याची भूक वाढली तसेंच अल्प दान परत करून विनोबाजी भूदान-यज्ञाचा वन्हि जास्त प्रज्वलित करीत आहेत.

## ' मोँहि कहाँ विश्राम '

शेवटीं समजावण्याच्या मार्गानें काम पूर्ण न झालें तर मी रूढ अर्थानें सत्याग्रह करणारच नाहीं अशी शपथ त्यांनीं घेतलेली नाहीं. उलट " लवकरांत लवकर–१९५७ पर्यंत एकहि भूमिहीन राहूं न देणें हें काम मी पूर्ण करूं इच्छितों व काम पूर्ण झाल्याशिवाय मी माझ्या पवनारच्या आश्रमांत परत जाणार नाहीं " ही प्रतिज्ञा मात्र त्यांनीं घेतलेली आहे. 'रामकाज कीन्हे बिना मोहि कहां विश्राम ' हा तुलसी-रामायणांतील हनुमंताच्या तोंडचा प्रसिद्ध दोहा त्यांच्या ओठांवर असतो. ' कायद्याच्या विरुद्ध मी नाहीं व कायद्याकरितां अनुकूल वातावरणच यानें निर्माण होत आहे ' असेंहि त्यांनीं अनेकदां म्हटलें आहे. पण आज मातृभावनेनें रोगी मुलाची शुश्रूषा करीत असतांनाच, तो दगावल्यास लांकडें आजच आणून ठेवूं काय असा प्रश्न ते विचारतात. 'गांधीजींचा प्रथम सत्याग्रही म्हणून मिळविलेली प्रतिष्ठा मी विसरलों नाहीं ' असें त्यांनीं वारंवार सांगितलें होतें. पण सत्याग्रहास अनुकूल काळवेळ लागतो. म्हणून तत्पूर्वी देशभर नवीन विचारांचा झंझावात वाहावयास लागला पाहिजे व समजावण्यानें पूर्ण होण्यायोग्य कामहि उरकून गेलें पाहिजे. अशानें पुढील लढाई जर करावीच लागली तर जास्त सुकर होईल व त्याकरितां आजच्या भूदान-यज्ञाच्या प्रक्रियेंतून सैन्यभरतीहि होऊन जाईल. कारण आज लढाई पुकारून अपयश घेऊन त्यांत यशाचीं बीजें पाहात बसणारे सेनानी विनोबा नाहींत. ते लहान यज्ञांतून मोठ्या यज्ञाकडे जाऊं इच्छितात.

## शिक्षितांची पोपटपंची

पण मग शिक्षित तरुण म्हणतात—" आम्हांस यांत पुरुषार्थ दिसत नाहीं, यांत संघर्ष नाहीं, खळबळ नाहीं, आमच्या शौर्यास यांत वाव नाहीं. " गांधीजींस १९२० मध्यें पुस्तकशिक्षित व वृद्ध लोक असेंच म्हणत होते. पण त्या काळचे तरुण समजूतदार व शहाण्या लोकांच्या म्हणण्याकडें फारसें लक्ष न देतां असहकार–आंदोलनांत सामील झाले. परिणाम सर्वांच्या डोळ्यासमोर आहे. तेंच कालचे तरुण आज म्हातारे झाले आहेत. म्हणून त्यांनीं तसें म्हटलें तर एक वेळ चालेलहि. पण जी नवीन पिढी आहे तिनें या यज्ञाकडे नवीन दृष्टीनें–पूर्वग्रहरहित बुद्धीनें–पहावयास पाहिजे. रुळलेल्या मार्गानें क्रांति केव्हां होईल, केव्हां सत्ता हातीं येईल व केव्हां जमिनी वांटल्या जातील हें एकट्या परमेश्वरासच माहीत. या पद्धतीनें तर आजच लाखों एकर जमीन मिळाली आहे. व हजारों एकर वांटली गेली आहे, लाखों एकरहि वांटण्याची तयारी सुरूं आहे. घरोघर या क्रांतिकारी कल्पनेचा संदेश नेणें, कोणत्याहि प्रकारची सत्ता हातीं नसतांना लक्षावधि एकर जमीन मिळविणें व वांटणें, या घोर कलियुगांत हात-हातभर जमिनीकरितां कोर्टकचेऱ्या करणाऱ्या लोकांकडून हरिश्चंद्र व सुदामा कसे भूदानयज्ञाच्या किमयेनें निर्माण होत आहेत याचा अनुभव घेणें याहून अधिक पुरुषार्थाचें काम कोणतें असूं शकेल म्हणून तरुणांनीं व बुद्धिमंतांनीं या क्रांतीबद्दल विचार करावा. हा साठ वर्षांचा चिरतरुण आपल्या अलौकिक बुद्धीनें व अश्रुतपूर्व दीर्घ पदयात्रेनें सर्वांच्या पुरुषार्थास आवाहन करीत आहे. सर्व तरुणांना त्यानें लाजविलें आहे. क्रांतीची भाषा बोलणाऱ्या शिक्षितांना प्रत्यक्ष क्रांतीचें काम करून ह्यानें शेंकडों मैल मागें टाकलें आहे. जर आजचा तरुण वर्ग व शिक्षितवर्ग यांत सामील झाला नाहीं तर तेच नेमके मागें राहतील. जसे 'रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळालें ' गुणगुणणारे व सदान्कदा आंतरराष्ट्रीय क्रान्ति ओठावर असणारे लोक बाजूला फेंकले गेले व भारतीय स्वातंत्र्यसंग्राम पुढें गेला व सफलहि झाला. तद्वत् या यज्ञाचा अग्नि अधिकाअधिक प्रज्वलित होत जाईल. आर्थिक विषमतेचें निराकरण होऊनहि जाईल व आजचे शिक्षित क्रांतिकारी लोक ' दानानें, भीक मागण्यानें कोठें क्रांति होत असतें ? ' अशी पुस्तकांतील पोपटपंची करीतच राहतील !








श्री. भाऊ धर्माधिकारी

# भूदान-आंदोलन आणि महाराष्ट्र

## श्री. शंकरराव देवांचा भारतभर दौरा

उत्तर प्रदेशांत सेवापुरी येथें सर्वोदय-समाजाचें संमेलन १९५२ च्या एप्रिलमध्यें भरलें होतें. आत्मस्फूर्तींतून प्रकट झालेला भूदानाचा लहानसा गंगौघ एक वर्षभर आपल्या पायांत घोळवून विनोबांनीं त्याला सेवापुरी येथें जेव्हां मुक्त केलें तेव्हां त्या गंगेचा भार शंकरराव देव यांनीं सर्वोदयसमाजापुढें एक प्रस्ताव मांडून जणूं आपल्या मस्तकीं घेतला आणि १९५४ एप्रिलच्या सर्वोदय-संमेलनापर्यंत २ वर्षांत २५ लाख एकर जमीन समग्र भारतांतून मिळवायची असा संकल्प आपल्या सर्व सहकाऱ्यांच्या वतीनें सोडला. हीं २ वर्षें आपल्या ढांसळत्या प्रकृतीची तमा न करतां शंकरराव उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत साऱ्या भारतभर हिंडले आणि, विनोबांनीं विहारप्रांतांत प्रतिज्ञापूर्वक एकाग्र प्रयोग सुरूं केला असतांना, भूदानयज्ञाचा प्रचार व्यापक प्रमाणावर करण्याचें काम त्यांनीं केलें. महाराष्ट्रांतसुद्धां भूदान-यज्ञाचा प्रारंभ शंकररावांच्याच पदयात्रेनें झाला. भारताचा २५ लाख एकरांचा संकल्प १९५४ मध्यें पूर्ण झाल्यानंतर, महाराष्ट्राचा अपुरा राहिलेला १ लाख एकरांचा संकल्प पुरा करण्याची जबाबदारी एक प्रकारें आपली मानून १९५४ एप्रिलनंतर पदयात्रा करायची ती महाराष्ट्रांतच असें त्यांनीं ठरविलें. आणि पुनः १९५४ च्या ऑगस्टपासून 'महाराष्ट्राची अखंड पदयात्रा' आरंभिली आहे.

काम हें जड स्वरूपाचें असतें, त्या कामाच्या मागें जो संकल्प, जो निश्चय, जी तीव्रता असते तीच चैतन्यमय असते आणि तीच कामाला गति आणि आकार देत असते. महाराष्ट्रांतील भूदानयज्ञाच्या कामाला अनेक निष्ठावंत कार्यकर्त्यांची शक्ति-बुद्धि लागत आहे. पण याच्या मागचें संकल्पबळ शंकररावांचें आहे, हें जाणत्यांना माहीत आहे.

## सर्वोदयी महाराष्ट्राचें ध्येय

हा संकल्प, हा निश्चय, ही तीव्रता कोणत्या विचारांतून निर्माण झाली आहे ? शंकरराव एकदां म्हणाले कीं "१९२२ ते १९३७ या १५ वर्षांत महाराष्ट्राला गांधीप्रणीत कॉंग्रेसच्या नेतृत्वाखालीं आणण्यासाठीं मी जीवाचें रान केलें; ईश्वराच्या कृपेनें महाराष्ट्रांत गांधीनेतृत्वाखालील कॉंग्रेस स्थिर झाली. आतां १९५२ सालीं आयुष्याच्या ढळत्या काळांत 'पुनश्च हरिः ॐ' म्हणून मी कामाला लागत आहे, पण आतां महाराष्ट्राला सर्वोदयी महाराष्ट्र बनलेला पहावा या इच्छेनें लागत आहें."

भूदान-आंदोलनाचें साधन घेऊन शंकरराव आपला हा नवा संकल्प सिद्ध करण्याच्या प्रयत्नाला आज लागले आहेत. सर्वोदयाचा विचार या सर्व प्रयत्नांच्या मागें आहे. 'महाराष्ट्रांतील लोकजीवन अधिकाधिक सुसंस्कारी व समतानिष्ठ व्हावें, त्यांत भ्रातृभाव वाढावा' असें थोडक्यांत आपल्या ध्येयाचें वर्णन शंकररावांनींच एके ठिकाणीं केलें आहे. समता आणि संस्कारिता यांचें वावडें कोणालाच असणें शक्य नाहीं. म्हणून महाराष्ट्रांतील शक्य त्या सर्व पक्षांच्या आणि मतप्रणालींच्या लोकांना समतेच्या व संस्कारितेच्या कार्यक्रमांतील कोणत्या एकएका कार्यांत एकत्र आणतां येतें याचा प्रयोग शंकररावांनीं आज महाराष्ट्रांतील जमीनीचा प्रश्न हातीं घेऊन चालविला आहे व त्यांत त्यांनीं थोडी प्रगतीहि साधली आहे.

संस्कारी जीवन अहिंसापालनानेंच शक्य आहे किंबहुना सुसंस्कारिता हें अहिंसक वृत्तीचेंच फलित आहे. फ्रेंच क्रांतिकारकांनीं जगाला 'स्वातंत्र्य-समता-बंधुता' ही त्रयी दिली. पण ती खरोखर समाजांत अवतीर्ण व्हायची असेल तर तिचा क्रम त्या क्रांतिकारकांनीं मांडला त्याहून उलटा, म्हणजे 'बंधुता-समता-स्वातंत्र्य' असा मांडला पाहिजे असा एक विचार शंकररावांनीं आपल्या एका व्याख्यानांत मांडला होता.








त्याचें तात्पर्य हें कीं माणसाच्या हृदयांत मुळांत एकमेकांविषयीं आणि सबंध समाजाविषयीं सद्‌भाव नसेल तर समता समाजजीवनांत ओतप्रोत होणें शक्य नाहीं, ती टिकणार नाहीं, आणि समताविहीन स्वातंत्र्य म्हणजे स्वातंत्र्याचें सोंग होईल. म्हणून माणसांच्या अंतःकरणांत बंधुता निर्माण करण्याचा प्रयत्न समानता-स्थापनेच्या प्रयत्नाबरोबरच चालणें जरूरीचें आहे. भूदान–यज्ञ याच विचारावर अधिष्ठित असल्यामुळें, महाराष्ट्राचे प्रश्न भूदानयज्ञानें निर्माण होणाऱ्या वातावरणामुळें सुटत जाण्याला अधिक अनुकूलता होत जाणार आहे.

## महाराष्ट्रांतील जमीनमालकींतील विषमता

महाराष्ट्रांतील खुद्द जमीनीच्या प्रश्नाचें स्वरूप काय आहे ? या प्रश्नाचें उत्तर थोडक्यांत देणें शक्य होणार नाहीं. येथें फक्त जमीनमालकीविषयक प्रश्नांचा संक्षिप्त ऊहापोह करण्याचें योजिलें आहे. जमीनमालकीच्या बाबतींत भारतांतल्याप्रमाणेंच महाराष्ट्रांतसुद्धां अराजक आहे. न्याय्य वांटणी नाहीं. महाराष्ट्रांत रयतवारी पद्धति असल्यामुळें येथें शेतकरीच जमीन-मालक ( Peasant-proprietor ) आहेत म्हणून जमीनीची फेरवांटणी करायला येथें फारसा वाव नाहीं, कारण नाहीं, असें मानणारे पुष्कळ शिक्षित लोक महाराष्ट्रांत आहेत. येथें शेतकरी जमीनमालक मोठ्या प्रमाणांत आहेत, ही गोष्ट खरी आहे. परंतु ' शेतकरी ' ही इतकी व्यापक संज्ञा करून ठेवली आहे, कीं ५०० एकरांची कसणूक शेकडों मजुरांकडून करवून घेणारे एखादे ' आबासाहेब देशमुख ' सुद्धां शेतकरीच समजले जातात. रयतवारी धारापद्धतींत जमिनीच्या मालकीची विक्री होऊं शकत असल्यामुळें महाराष्ट्रांत जमीन ही क्रय-विक्रयाची वस्तु बनून शेत स्वतः न कसणाऱ्या वर्गांच्या हातांत पुष्कळ प्रमाणांत गेली आहे. महाराष्ट्रांत ५० लाख एकर जमीन कुळांकडे लावलेली आहे. आणि हे गैरहजर मालक ३ लक्ष २ हजार आहेत.

महाराष्ट्रांत जमीनीच्या विभागणीचें चित्र कसें आहे तें खालीं [१]दिलें आहे. त्यावरुन असें दिसून येईल कीं, १०० एकरांवरील जमीन-मालक सर्व जमीनमालकांच्या अर्धा टक्का आहेत पण त्यांच्याकडे जमीन मात्र जवळ जवळ १०॥ टक्के आहे; आणि ५ एकरहून कमी जमीनवाल्यांची संख्या ५२ टक्के असून त्यांच्याकडे जमीन एकूण जमीनीच्या १४ टक्के आहे. यावरूनहि गैरहजर जमीनमालकीचें प्रमाण केवढें मोठें आहे आणि जमीनमालकींत विषमता किती आहे हें उघड दिसून येतें.

याशिवाय केवळ शेतीवरच राबणूक करून जगणारे निव्वळ शेतमजूर महाराष्ट्रांत जवळजवळ १६ लाख आहेत. महाराष्ट्राची जमीन कनिष्ठ, मध्यम आणि उत्तम अशा तीन प्रतींची आहे आणि शेती पावसाच्या कृपेवर अवलंबून आहे. हें लक्षांत घेतां ५ एकरांपर्यंतचे जमीनमालक हे सुद्धां शेतमजुरांहून फारशा बऱ्या परिस्थितींत आहेत असें म्हणतां येणार नाहीं. तेव्हां वरील १६ लाख शेतमजूर आणि ९ लाख गरीब खातेदार यांची अगोदर सोय लावणें निकडीचें आहे. ती न लावतां समतेच्या गोष्टी बोलणें अवास्तव आहे. त्या दृष्टीनें जवळजवळ २० ते २५ लाख एकर जमीन फेरवांटणीसाठीं निघाली पाहिजे. गैरहजर मालकांच्या मनांत जर पालट घडून आला तर ही मागणी सहज साध्य होण्याजोगी आहे हें वरील आंकड्यांवरून दिसतें.

## विचारांचें बीजगणित

पण ही आंकड्यांच्या गणितांत बसणारी गोष्ट नाहीं. विनोबांच्या भाषेंत हें ' बीजगणित ' आहे. कारण, जमिनीची ही फेरवांटणी आम्हांला मतपरिवर्तनानें करायची आहे. मतपरिवर्तनाकरितां विचार समजावून दिला पाहिजे, तो वातावरणांत फैलावला पाहिजे. विचारांचें बीज टाकण्याला आणि रुजण्याला जेवढा अवकाश तेवढाच क्रांतीला अवकाश. युगधर्म अनुकूल

| १ क्षेत्रप्रमाण | जमीन–मालक-टक्केवारी | जमिनीचा वांटा : टक्केवारी |
|---|---|---|
| ५ एकरांपर्यंत | ५२·३ | १४ |
| ५ ते १५ एकर | २८·२ | २५ |
| १५ ते २५ एकर | १०·९ | १९·६ |
| २५ ते १०० एकर | ८ | ३१ |
| १०० एकरांवर | ०·६ | १०·४ |

असल्यामुळें त्याच्या वाढीला वेळ लागणारच नाहीं.

हा विचार कोणता ? विचार हा कीं सारी जमीन देवाची. त्यानें ती निर्माण केली. नंतर माणसांनीं सर्वांनीं एकमेकांच्या बळावर तिला माणसाळविली. म्हणून शेतीसंबंधित जमीन सारी (अर्थात् देवाच्या कृपेवर) माणसांच्या समाजाची, गांवाची आणि या जमिनीवर जें पीक आलें त्यावर सत्ता राबणारांची. हा न्यायाचा विचार आहे, कारण त्यांत सत्य स्थिति आहे.

अर्थात् या विचाराचें स्वरूप असें आहे कीं तो केवळ गैरहजर जमीन-मालकांनाच समजावून देऊन त्यांना मालकी सोडायला लावायची असें नाहीं. जे म्हणून लहानमोठे जमीनमालक म्हणविणारे आहेत त्या सर्वांना हा विचार सांगितला पाहिजे, पटविण्याचा प्रयत्न केला पाहिजे आणि त्यांच्याकडे असलेली मालकी गांवसमाजांत प्रविष्ट करायला लावली पाहिजे. यालाच विनोबांनीं एक काव्यमय पण समर्पक नांव दिलें आहे. 'धर्मचक्रप्रवर्तन'! म्हणून भूदान-यज्ञाच आंदोलन कोणत्याहि एका वर्गाशीं संबंधित नाहीं, तें साऱ्या समाजाशीं संबंधित आहे. इतकेंच काय पण याच मुख्य विचारांतून दुसरा तितक्याच महत्त्वाचा उप-विचारहि विनोबांनीं प्रचलित केला आहे कीं आपली धनसंपत्ति, बुद्धि, श्रमशक्ति ही सुद्धां समाजाच्या बळावरच आपल्याला लाभलेली आहे, ती समाजाच्या कामीं अर्पण झाली पाहिजे. 'एवं प्रवर्तितं चक्रं नानु-वर्तयतीह यः। अघायुः इंद्रियारामः मोघं पार्थ स जीवति ॥'

हा विचार पसरविणारे धर्मदूत महाराष्ट्रांत पाहिजे आहेत. ज्यांनीं आपली सारी हयात अपरिग्रही राहून समाजहितार्थ खर्च केली असे अप्पासाहेब पटवर्धन, अण्णासाहेब सहस्रबुद्धे, शंकरराव देव, बाळूभाई मेहेता, आचार्य भिसे अशी थोर मंडळी या कामांत आज आहेत. म्हणूनच महाराष्ट्रांत भूदान-यज्ञाचें बीज रुजत आहे. तपश्चर्येवांचून या कामाला तेज नाहीं. या थोर कार्यकर्त्यांनीं आपलें तपःसामर्थ्य या कामीं खर्चे घालण्याचें ठरविलें आहे.

परंतु तेवढ्यानें भागणार नाहीं. सर्वस्वीं या कामाला वाहिलेल्या सेवकांची मोठी सेना उभी राहिल्याशिवाय महाराष्ट्राचें सबंध रूप पालटण्याचें हें काम शक्य कसें होणार ? समाजांत खालवर व खोलवर पसरलेले लहान-लहान पण या विचारानें भारलेले कार्यकर्ते जितक्या संख्येनें मिळतील तितकी या कामाची गति वाढणार आहे. विनोबांनीं बिहारमधील प्रयोगांत कार्यकर्त्यांची संख्या वाढविण्याचा कसून प्रयत्न केला म्हणून बिहारचा प्रश्न डिसेंबरअखेर जवळजवळ निकालांत काढून ते बंगालांत प्रवेश करूं शकले आहेत. महाराष्ट्रांत भूदानाचें काम बळावत आहे हें निःसंशय. पण त्याला भरधांव गति येण्याकरितां कार्यकर्त्यांची वाण भरून निघाली पाहिजे. आज महाराष्ट्रांत अशा प्रकारच्या चळवळींत येऊं शकणारे कार्यकर्ते निरनिराळ्या राजकीय पक्षांत विभागले गेले आहेत. जमीनीचा प्रश्न हा जसा आर्थिक किंवा सामाजिक प्रश्न आहे, तसा तो राजकीय प्रश्नहि आहे. किंबहुना, राज्यक्रांतीकरितां पुरेसें इंधन देण्याची शक्ति या प्रश्नांत आहे. त्यामुळें अनेक राजकीय पक्षांच्या कार्यक्रमांतील हें एक प्रमुख अंग (plank) बनलें आहे. परंतु या सर्वच राजकीय पक्षांची भिस्त कायद्यावर आहे. आजचे सत्ताधारीहि कायद्यानेंच जमिनीच्या बाबतींतला अन्याय आणि विषमता नष्ट करूं असें म्हणतात, सत्ताकांक्षीसुद्धां कायद्यानें हा प्रश्न सोडविला जात नाहीं म्हणून असंतुष्ट असतात. मिळून सत्ताविरहित उपायाचा अवलंब करण्याच्या मनःस्थितींत राजकीय पक्षवादी जवळजवळ कोणीच नाहींत. त्यांच्यापैकीं फार थोड्यांचा विश्वास लोकशक्तीच्या साधनावर आहे.

महाराष्ट्रांत गांधीयुगांत विधायक कार्यकर्त्यांचा एक वर्ग तयार झाला होता. आजहि तो आहे. परंतु विनोबांनीं म्हटल्याप्रमाणें 'अनेक कामांपैकीं एक' असें या कामाचें स्वरूप ते मानीत असल्यामुळें त्यांच्या कामाला धार चढत नाहीं, वातावरणावर परिणाम करण्याची ताकद त्यांच्या हालचालींतून निष्पन्न होत नाहीं. तथापि जर कोणी आज भूदानाचें काम महाराष्ट्रांत प्रगत केलें असेल तर ते या विधायक कार्यकर्त्यांनींच असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं.

## महाराष्ट्रांतील भूदानकार्य

महाराष्ट्रांत भूदानांत जमीन मिळण्याचें प्रमाण कमी आहे यासंबंधीं बोलतांना एकदां विनोबा म्हणाले कीं 'आज जमीन न मिळूं द्या, विचारबीज रुजूं द्या. एकदां भूदानाच्या मागचा विचार स्थिरावला कीं जमीन मिळण्याला उशीर लागणार नाहीं.'

आणि हें खरें आहे – महाराष्ट्रांतच नव्हे तर सर्वत्र. त्यांतल्या त्यांत इतर ठिकाणच्या मानानें महाराष्ट्रांतील जनसमाज ( केवळ शिक्षित पांढरपेशे नव्हेत, सर्व-साधारण समाज देखील ) अधिक चौकस, अधिक जागरूक, अधिक कस लावून पाहणारा आहे. एखादी गोष्ट तो सहसा उचलून घेत नाहीं. पण विचारानें पटलेली गोष्ट तो सहसा सोडीतहि नाहीं हाहि महाराष्ट्राचा स्वभाव आहे. अनेक संतांच्या परंपरेनें भूमींत रुजविलेली विठ्ठलभक्ति आजवर महाराष्ट्र जागवीत आणि गाजवीत आला आहे ही गोष्ट दृष्टीआड करून चालणार नाहीं.

भूदानाच्या मागचा विचार असाच महाराष्ट्र-हृदयाला पटला तर तो त्याला आपलासा केल्यावांचून राहणार नाहीं. तो आतां हळूंहळूं रुजत जाण्याचीं लक्षणें दिसत आहेत. साडेतीन वर्षांपूर्वी विनोबांनीं हें काम आपल्या-पुरतें सुरूं केलें तेव्हां श्री. शंकरराव देवांसकट महाराष्ट्रांतील सर्व कार्यकर्त्यांना त्यानें एक धक्का दिला होता. अव्यवहार्यतेचा शिक्काहि आमच्याच मनानें त्या कामावर मारला होता. परंतु विनोबांचें पाऊल न डगमगतां पुढें पुढें पडत गेलें, त्यांची वाणी दिव्य आदेशाचें तेज प्रगट करूं लागली, लोक दोन्ही हातांनीं देऊं लागले, तसतशी आमची उपेक्षा कुतूहलांत, कुतूहलांतून आशेंत आणि आशेंतून सक्रियतेंत पालटत गेली. खुद्द शंकररावांनीं सेवापुरीला २५ लाख एकर जमीन पुढच्या एक वर्षांत संबंध भारतांतून पुरी करायची असा संकल्प मांडला. विनोबांनीं ती मुदत २ वर्षांची केली. मोठे-छोटे कार्यकर्ते हलूं लागले, संकल्प घडूं लागले.

१९५२ सालीं महाराष्ट्रांत शंकररावांनीं प्रथम पदयात्रेचा प्रारंभ पुरंदर तालुक्यांत केला. आज महाराष्ट्रांत २६००० एकर जमीन मिळाली आहे. १ लाखाच्या संकल्पपूर्तीच्या मानानें ही प्रगति कांहींच नाहीं. तथापि, एवढी प्रगति साधत असतांना-सुद्धां महाराष्ट्राच्या विचारांत परिवर्तन घडत गेलें आहे हें उघड दिसत आहे. प्रा. धनंजयराव गाडगीळां-सारख्या अर्थपंडितांनीं भूदानाची सहानुभूतिपूर्वक दखल घेतली आहे, त्याचें स्थान सामाजिक स्थित्यंतराच्या आंदोलनांत मान्य केलें आहे.

पण खुद्द जनसमाजाच्या मनांत, मतांत, मूल्यांत होत जाणारें परिवर्तनसुद्धां अभ्यासण्याजोगें आहे. १९५२ सालीं काय किंवा १९५३ सालच्या आरंभकाळांत काय, महाराष्ट्रांत भूदानाच्या कामीं लक्ष घालणारे कार्यकर्ते इनमीन साडेतीनच होते ! श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांनीं कोल्हापुर जिल्ह्यांत १५ दिवस, रत्नागिरि जिल्ह्यांत जवळ जवळ १॥ महिना आणि त्यानंतर सोलापूर जिल्ह्यांत तीन दिवस पदयात्रा केली. त्यानंतर त्यांनीं कुलाबा जिल्ह्यांत दौरा काढला, त्यावेळीं त्यांना साथ देणारी मंडळीहि मोजकीच होती आणि तीहि तात्पुरती आलेली होती. कोल्हापुरांत त्यांना दीड-पावणे-दोनशें एकर जमीन मिळाली, रत्नागिरीनें जवळ जवळ १ हजाराचा आंकडा गांठला आणि सोलापूर जिल्ह्यांत अदमासें शंभरएक एकर मिळाले होते. कांहीं जमीन-दारांनीं अण्णांना टाळलें होतें, कांहींनीं त्यांच्याशीं सामना दिला होता. कूळ-कायद्यानें आणि जमिनीचा खंड $\frac{1}{4}$ चा $\frac{1}{6}$ सरकारनें केल्यामुळें मालकवर्ग क्षुब्ध झालेला होता. कॅांग्रेससरकार आणि भूदान-चळवळ्ये हे एकाच झाडाच्या दोन शाखा ते आणि सर्वसाधारण लोक मानीत होते. त्यामुळें सरकारवर पाखडण्याची आग ते भूदानकार्यकर्त्यांवर टाकीत होते. तरीहि जमिनीचा प्रश्न तीव्र असलेल्या रत्नागिरि जिल्ह्यांत अण्णांच्या पदयात्रेनें यश मिळविलें आणि लोकमानस भूदानाला अनुकूल असल्याचा एक प्रत्यय तेथें प्रथम आला.

तथापि, शिक्षितवर्ग यांत सामील झाल्याखेरीज ही चळवळ वेग घेणार नाहीं हा आमचा भ्रम कायम असल्यामुळें शहरांत जमलेल्या या वर्गाला जागृत करण्याकरितां आचार्य दादा धर्माधिकारी यांच्या सारख्या विद्वान्, बुद्धिवादी, पट्टीच्या वक्त्याचा दौरा दोन वेळां साऱ्या महाराष्ट्रभर काढण्यांत आला. दादांनीं या दौऱ्यांत वकील, डॉक्टर, व्यापारी, जमीन-दार, विद्यार्थी अशा सर्व प्रकारच्या शिक्षित वर्गांत संचार केला आणि त्यांना जागें करण्याचा प्रयत्न केला. त्याचा परिणाम कळत न कळत ठिकठिकाणच्या कार्य-कर्त्या वर्गावर मात्र चांगला झाला आणि पुढें या चळवळींत कार्यकर्त्यांची संख्या जी वाढली त्याला दादांची तर्कशुद्ध ध्येयपूर्ण शिकवण कांहीं अंशीं कारणीभूत झाली आहे.

तथापि, जनसमाजाची होणारी चळवळ ( mass-movement ) ही शिक्षितांवर अवलंबून नसते,








ती प्रत्यक्ष जनताच उचलून धरते हें आज आमच्या अनुभवाला येत आहे. १९५३ सालामध्यें उत्तर-सातारा जिल्ह्यांत शंकररावांची पायीं यात्रा झाली. कॉंग्रेस ही एक संघटित संस्था असल्यामुळें व तिला परंपरा असल्यामुळें, त्याचप्रमाणें कॉंग्रेसच्या नेत्यांनीं वेळोवेळीं या चळवळीचें कौतुक केल्यामुळें कॉंग्रेसचे कार्यकर्ते व संघटना या कामीं सहज उपयोगी पडेल असें शंकररावांना वाटत होतें. परंतु उत्तरसातारा जिल्ह्यांत त्यांचा तो भ्रम दूर झाला. ज्या कॉंग्रेस कार्यकर्त्यांविषयीं शंकररावांनीं अपेक्षा बांधल्या होत्या ते बहुतांशीं दूरच राहिले. कांहीं व्यक्तींनीं मदत अवश्य दिली, पण संघटनेच्या दृष्टीनें होईल असें वाटलेलें साहाय्य झालें नाहीं. प्रजासमाजवादी पक्षाचीहि तीच गत. कारण हे पक्ष सत्तेचें उद्दिष्ट ठेवून बनलेले असल्यामुळें सत्ताशून्य कार्यक्रमांत भाग घेण्याचा उत्साह त्यांच्यांत नव्हता, आजहि नाहीं. म्हणून जनतेंतल्याच लहान लहान पुढाऱ्यांना हाताशीं धरून श्री. माणिकचंद दोशी यांनीं भूदानाचें लोण सर्वसामान्य जनतेपर्यंत पोंचविलें. फक्त पूर्वखानदेश जिल्हा याला अपवाद आहे. या जिल्ह्यांत भूदानाचें जें काम झालें आहे तें श्री. सीताराम बिर्ला प्रभृति निष्ठावंत कॉंग्रेस कार्यकर्त्यांच्या मार्फतच झालें आहे आणि होत आहे. यांत विनोबांशीं व शंकररावांशीं येथील मंडळींचा असलेला ऋणानुबंधहि बहुतांशीं कारणीभूत आहे हें विसरून चालणार नाहीं.

सेवापुरी ते बोधगया ( १९५२ ते १९५४ ) या दोन वर्षांत महाराष्ट्रांत कसेंबसें १५०० एकरच दान मिळालें होतें पण बोधगयेला जयप्रकाशजींच्या 'जीवनदाना'च्या घोषणेनें या आंदोलनांत एक नवीन पर्व सुरू केलें. जयप्रकाशजी संपूर्णपणें भूदानाला मिळाले या गोष्टीनें महाराष्ट्रांतल्या शिक्षित युवकवर्गावर मोठा परिणाम केला. प्रजासमाजवादी पक्षांतहि त्यामुळें खळबळ माजली आणि त्या पक्षांतील अनेक कार्यकर्त्यांचा भूदानाकडे असलेला ओढा वाढला. जयप्रकाशजींनीं पक्षाचें कार्य सोडून हें 'ताम्हनभर संध्ये'चें काम घेतलें म्हणून कांहीं राजकारणधुरंधरांना रागहि आला. पण एकंदरींत या पक्षांतील अनेक कार्यकर्त्यांची प्रतिक्रिया भूदानाला अनुकूल झाली; राष्ट्रसेवादलासारख्या संघटनेच्या अध्वर्यूंनीं या चळवळीशीं समरस होण्याचा अधिक प्रयत्न चालविला. श्री. एम्. एम्. जोशी यांनीं तर संपूर्ण १ वर्ष या चळवळीकडेच देण्याचें हडपसर येथील मेळाव्यांत जाहीर केलें आणि आतां समयदान दिलेल्या स्वयंसैनिकांसह ते भूदानाच्या कार्यक्रमालाच लागलेले आहेत.

बोधगयेनंतर ( १९५४ ऑगष्ट महिन्यांत ) पाचोरा येथें जें महाराष्ट्राचें भूदानशिबिर झालें त्या शिबिरांत आंदोलनाची शक्ति एकाग्र प्रयत्नांनीं वाढविण्याचें ठरलें. येथें शंकररावांनीं 'चरैवेति चरैवेति' चा संदेश ५ जिल्ह्यांना दिला आणि या ५ जिल्ह्यांनीं हजारों मैलांच्या पदयात्रेचे संकल्प जाहीर केले. पूर्व खानदेश, प. खानदेश, नासिक, ठाणें व रत्नागिरि या ५ जिल्ह्यांवर आपली शक्ति अखंड पदयात्रा करून केंद्रित करण्याचा प्रयोग शंकररावांनीं निश्चयानें सुरू केला. या कामीं श्री. अप्पा पटवर्धन, आचार्य भिसे आणि बाळुभाई मेहेता यांचें साहाय्य त्यांना मिळालें. या पांचांपैकीं नासिक सोडून चार जिल्ह्यांनीं २ आक्टोबर 'गांधीजयंती' ते १२ फेब्रुवारीचा 'सर्वोदयदिन' ही कालमर्यादा धरून पदयात्रेचे कार्यक्रम अखंड सुरू ठेवले आहेत.

या कार्यक्रमांमुळें कार्यकर्त्यांची संख्या, त्यांचा उत्साह आणि त्यांचा आत्मविश्वास वाढत आहे, जनता हळू हळू भारली जात आहे. गेल्या ५ महिन्यांतच १५ हजार एकरांचे एकदम २६ हजार एकर झाले. कांहीं जिल्ह्यांतील कांहीं तालुक्यांनीं आपापले एक एक हजाराचे संकल्प पूर्ण केले, नव्हे ओलांडले. ठाणें आणि रत्नागिरि जिल्ह्यांनीं 'दस-हजारी' लवकरच गांठण्याची हिंमत धरली आहे. ( पान २९ वर महाराष्ट्रांत डिसेंबरअखेर मिळालेल्या भूदानप्राप्तीची कोष्टकवार माहिती दिली आहे. )

आतां महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं जमीन-वांटपाच्या कामालाहि सुरुवात झाली आहे. उत्तर साताऱ्यांत आक्टोबर १९५४ मध्यें खटाव येथें जयप्रकाशजींच्या हस्तें महाराष्ट्रांतलें पहिलें वांटप झालें. तेथील अनुभवानें ठिकठिकाणच्या कार्यकर्त्यांमध्यें उत्साह संचरला. वांटपांतून पुनः भूमि-प्राप्ति वाढते, नव्हे, नवे नवे कार्यकर्ते वाढतात, जनतेचा विश्वास वाढतो असें दिसून आलें. वांटपांतून समाजक्रांतीचें ओझरतें दर्शन होऊं लागलें आहे. जुनीं मूल्यें गळून पडून नवीं मूल्यें प्रकट होत










आहेत, पूर्वग्रह नाहींसे होऊन नव्या सद्भावना निर्माण होत आहेत, सत्तेकडील लक्ष कमी होऊन लोकशक्तीचें भान वाढत आहे, पक्षीय आग्रह लुला पडून ध्येयविषयक भ्रातृभाव पसरत आहे, वर्गीय अस्मिता कमी होत असून माणुसकीची जाणीव मूळ धरूं लागली आहे.

अलीकडील म्हणजे डिसेंबर १९५४ मधील ठाणें जिल्ह्यांतील शंकररावांच्या पदयात्रेनें तर महाराष्ट्रांतील एका नव्या युगाला प्रारंभ केला असें म्हणावेंसें वाटतें. ठाणें जिल्ह्यांत कॅंग्रेसप्रमाणेंच प्रजासमाजवादी पक्षाचेंहि कर्तृत्ववान् कार्यकर्ते मोठ्या संख्येनें आहेत. एकमेकांना त्यांनीं निवडणुकीच्या क्षेत्रांत जोरकस सामनेहि पूर्वी दिले आहेत. आचार्य भिसे हा कॅंग्रेस पक्षाचा मोहरा आहे. ते विधायक कार्यकर्त्यांचेहि म्होरके आहेत. परंतु स्वतः सत्तावृत्तिरहित, निःस्वार्थी असल्यामुळें आणि त्यांचें जीवन तपस्वी असल्यामुळें दोन्ही पक्षांच्या कार्यकर्त्यांत आणि प्रतिष्ठित श्रीमंत समाजांतहि त्यांच्याविषयीं पराकाष्ठेचा आदर आणि विश्वास आढळून येतो. भूदान-यज्ञानें आचार्यांना खेचलें, त्यानें त्यांच्यांतील पक्षीयता विशुद्ध केली.

ठाणें जिल्ह्याच्या या पदयात्रेंतच पहिल्याप्रथम विरार येथें श्री. शंकरराव देव आणि राष्ट्रसेवादल परस्परांच्या सान्निध्यांत आले. एकवेळ कॅंग्रेसपक्षाचे अध्वर्यु असतांना ज्या शंकररावांनीं आपल्याला उखडून टाकण्याचा प्रयत्न केला असें राष्ट्रसेवादलाच्या आणि समाजवाद्यांच्या मनांत असेल ते शंकरराव यावेळीं भूदान-शिबिरांत त्यांचे स्नेही आणि सहकारी या रूपांत त्यांच्या निकट आले आणि राष्ट्रसेवादलानेंहि त्यांचा स्नेही आणि सहकारी म्हणून स्वीकार केला. ही घटनासुद्धां हृदयस्पर्शी आणि महाराष्ट्राच्या घटनाक्रमावर परिणाम करणारी ठरल्यावांचून राहाणार नाहीं.

ठाणें जिल्ह्यांतील आदिवासी भूहीनांचा प्रश्न कटोकटीला पोंचलेला आहे. वसंतराव नारगोलकरांसारखे सत्यनिष्ठ कार्यकर्ते या प्रश्नाची तड गांधीवादाच्या साहाय्यानेंच लावण्याचा पण करून चिकाटीनें गेलीं कित्येक वर्षें काम करीत कम्युनिस्टांना तोंड देत आहेत. या सर्वांच्या धडपडीनें आदिवासींची जमिनीची भूक आणि आपल्या हक्कांविषयींची जागृति वाढत आहे. आदिवासी सेवामंडळाचे कार्यकर्ते आपल्या परी त्यांना समर्थ बनविण्याचा प्रयत्न करीत आहेत. सर्वांच्या प्रयत्नांचा मिळून परिणाम म्हणून मोठमोठ्या जमिनी घेऊन बसलेले जमीनमालक ठिसूळ बनत चालले आहेत. या सर्व थरांत प्रेमाचा, स्नेहाचा प्रादुर्भाव झाला तर अपरिहार्यपणें घडून येत चाललेली क्रांति सुमधुर बनेल, समाजांत शांति आणि आनंद कायम राहील.

## बंगालमधील जमीनीचा प्रश्न

" कांहींजण म्हणतात. ' सगळ्यांना वाटायला पुरेशी जमीन आहे कोठें ? अशा परिस्थितींत जमिनीची वांटणी करणें म्हणजे केवळ दारिद्र्याची वांटणी करणें आहे. अगोदर उत्पादन वाढवा आणि मग वांटणी करा ' असें ते म्हणतात. पण आपण घरांत कांहीं असें वागत नाहीं. आपल्या मुलांना दूधतूप न देतां आई स्वतःच तें कधीं खाते का ? मग आपणहि तसेंच वागायला नको का ? जें आपल्यापाशीं आहे तें वाटून टाकलें पाहिजे. दारिद्र्य असेल तर तें वाटूं या. आपल्या शेजाऱ्यावर प्रेम करणें हा जीवनाचा खरा मार्ग आहे. रवींद्रनाथ टागोरांनीं ' वंदे मातरम् ' या मंत्राऐवजीं ' वंदे भारतम् ' हा मंत्र शिकविला. पण आपल्या भावावर व शेजाऱ्यावर जर आपण प्रेम करूं शकलों नाहीं तर देशावर प्रेम कसें करणार ?

' परवां मी म्हणालों कीं बंगालच्या वैष्णव संतांनीं शिकविलेल्या भक्तिमार्गांत कर्मयोगांतील कर्माचा अभाव आहे. कृतिशून्यता इतरांनाहि जाणवली आणि त्यांनीं कर्मप्रवणता शिकविली. पण त्या कर्माबरोबर त्यांनीं हिंसक मार्ग आणला. एका बाजूनें निष्क्रियता गेली पण दुसऱ्या बाजूनें हिंसा आंत शिरली. या हिंसाप्रवणतेनें बंगालचें सामर्थ्य वाढविण्याऐवजीं त्याला दुबळेपणा आणला असें मला वाटतें. म्हणून आज हवें आहे तें असें कीं, वैष्णवांची अहिंसा आणि कर्मयोग्याची कर्मप्रवणता यांचा संयोग झाला पाहिजे— अहिंसक कर्मयोग आचारांत आला पाहिजे. यानेंच बंगालची चित्तशुद्धि होऊन त्याचें सामर्थ्य वाढेल. हें कार्य कायद्यानें होणार नाहीं. केवळ जनशक्तीनें हें कार्य घडून येईल.

" बंगालमध्यें सुमारें दीड कोटी एकर शेतजमीन आहे. त्यांपैकीं तुम्ही मला पंचवीस लक्ष एकर जमीन द्यावी अशी माझी मागणी आहे. "

—आचार्य विनोबा

बांकुरा ( प. बंगाल ) ७।१।५५.








# डिसेंबर १९५४ अखेर महाराष्ट्रांत भूदान-यज्ञांत मिळालेली जमीन

| अनु. नं. | जिल्हा | दानपत्रांची संख्या | मिळालेली जमीन | |
|---|---|---|---|---|
| | | | एकर | गुंठे |
| १ | पू. खानदेश | ८३० | ३४९२ | २४॥ |
| २ | प. खानदेश | ६९१ | २४५२ | ३५।॥ |
| ३ | नाशिक | ५३४ | ३२७८ | — |
| ४ | ठाणें | ९३<br>* ? | ९२२<br>४२०० | १४॥<br>— |
| ५ | कुलाबा | ३९२ | १३५९ | ६ |
| ६ | पुणें | १४३ | १७९ | ३८॥ |
| ७ | उ. सातारा | ३७१<br>* ? | २०४४<br>२५०० | १८<br>— |
| ८ | द. सातारा | १६ | २२९ | ३० |
| ९ | कोल्हापूर | १२९ | १९४ | २७। |
| १० | रत्नागिरि | ४८४<br>* ? | २९६१<br>२५०० | १२।॥<br>— |
| ११ | अहमदनगर | १०५ | ५६२ | १६ |
| १२ | सोलापूर | ७९ | २२२ | २५ |
| १३ | डांग | ३ | ६० | — |
| | एकूण | ३८७० | २७१६० | ८। |

* ठाणें, रत्नागिरि व उत्तरसातारा जिल्ह्यांत डिसेंबर १९५४ अखेर मिळालेली एकूण जमीन ठोकळ मानानें वरीलप्रमाणें आहे. दानपत्रांच्या सदरांत प्रदेश-कचेरींत दाखल झालेल्या दानपत्रांची संख्या फक्त दिलेली आहे. प्रश्नचिन्ह दाखविलेलीं दानपत्रें जिल्हाकचेरींत आहेत. आंकडे प्रदेशकचेरीकडे अजून आलेले नाहींत.

आचार्य शं. द. जावडेकर

# भूदान-यज्ञ आणि समाजवादी क्रांति

भूदानयज्ञाचें अंतिम ध्येय शासनमुक्त समाज असें जाहीर झालें असलें तरी या आंदोलनाचा स्वाभाविक व मूर्त परिणाम भारतांत थोड्याच काळांत विकेंद्रित लोकशाही समाजवाद स्थापन करण्यांत होणार आहे असें मी स्वतः मानितों. सर्व प्रकारच्या बाह्य बंधनांतून मुक्त झालेला समाज निर्माण व्हावा आणि त्याचे सर्व व्यवहार ज्ञान, प्रेम आणि सेवा यांच्या बळावर चालूं लागून सर्व प्रकारची सामाजिक व आर्थिक विषमता नष्ट व्हावी, समाजांतील प्रत्येक व्यक्तीला शारीरिक, बौद्धिक व आत्मिक विकासाचें पूर्ण स्वातंत्र्य उपभोगतां यावें आणि समाजांत सर्वत्र बंधुभावना नांदूं लागावी हाच सर्व अध्यात्माचा व सर्व धर्मांचा अंतिम संदेश आहे. तो जसा भारतीय वेदान्ताचा संदेश म्हणतां येतो तसाच तो येशू खिस्ताचा व महंमद पैगंबराचा संदेश आहे असें तितक्याच आधारानें सिद्ध करून देतां येईल. याच्या उलट, खिस्ती व इस्लामी धर्मनिष्ठांनीं ज्या सामाजिक, धार्मिक, राजकीय संघटना निर्माण केल्या त्या सर्व ज्याप्रमाणें सामाजिक विषमतेला, आर्थिक पिळवणुकीला आणि राजकीय दास्याला कालांतरानें कारण झाल्या, त्याचप्रमाणें भारतीयांनीं निर्माण केलेल्या सामाजिक, धार्मिक व राजकीय संस्थाहि सामाजिक विषमता, आर्थिक पिळवणूक आणि राजकीय दास्य यांना कारण झाल्या होत्या. ज्याप्रमाणें येशु खिस्त व महंमद पैगंबर यांच्या वचनांचा आधार घेऊन लोकशाही व समाजवाद या पुरोगामी व क्रांतिकारक ध्येयांना विरोध करणारे लोक निघतात व निघालेले आहेत त्याचप्रमाणें भारतीय वेदान्ताच्या आधारावर समाजवादाला व लोकशाहीला विरोध करणारे लोक निघूं शकतात व निघालेलेहि आहेत. जन्मसिद्ध जातिभेदांना उचलून धरणारे, हरिजनांना अस्पृश्य मानणारे, स्त्रीदास्याचें समर्थन करणारे आणि धनिकांची संपत्ति हें त्यांच्या पूर्वपुण्याईचें फळ आहे आणि निर्धनांचें दारिद्र्य हें त्यांच्या पापांचें फळ आहे असें प्रतिपादन करणारे वेदान्ती कांहीं कमी आढळणार नाहींत. परंतु भूदान-यज्ञ-आंदोलन सुरू करणारे वेदान्ती हे अशा प्रकारचे प्रतिक्रांतिकारक वेदान्ती नाहींत. ते लोकशाहीचे व समाजवादाचें ध्येय आत्मसात् करून त्या ध्येयांना अधिक शुद्ध व उन्नत बनवूं पाहणारे असे वेदान्ती आहेत. त्यांचा वेदान्त समाजसंघटनेंत क्रान्तिकारक परिवर्तन घडवून आणीत आहे. सामाजिक व्यवहारांत स्वातंत्र्य, समत्व आणि बंधुत्व या तत्त्वांचा पूर्ण आविष्कार झाला पाहिजे असें मानणारे ते वेदान्ती आहेत. वेदान्ताला सामाजिक क्रांतीची ही आधुनिक दृष्टि प्राप्त करून देण्याचा प्रारंभ एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं राजा राममोहन रॉय यांनीं ब्रह्मसमाजाची स्थापना करून केला. त्यांतून प्रागतिक सुधारणावाद निर्माण झाला. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस विवेकानंद आणि टिळक यांनीं वेदान्ताला कर्मयोगी बनवून त्याच्या आधारें भारतांत क्रांतिकारक राष्ट्रवाद निर्माण केला. पुढें विसाव्या शतकांत पहिल्या जागतिक युद्धानंतर म. गांधींनीं त्याच वेदान्ताला सत्याग्रही दीक्षा देऊन भारतांत व आधुनिक जगांत सर्वांगीण क्रांति घडवून आणणारें अहिंसक क्रांतिशास्त्र निर्माण केलें. या अहिंसक क्रांतिशास्त्राचें आजचें अंगीकृत कार्य भारतीय लोकशाहीला सत्याग्रही अधिष्ठान निर्माण करून द्यावें आणि भारतांत वर्गहीन समाजाची स्थापना करून संपत्तीचें स्वामित्व व्यक्तीचें नसून समाजाचें आहे या तत्त्वाची अंमलबजावणी करावी हें बनलें आहे. या नव्या समाजाची उभारणी ग्रामोद्योगप्रधान, स्वावलंबी व स्वयंपूर्ण ग्रामराज्यें यांच्या पायावर व्हावयाची असून, तशी ती झाली असतां शासनमुक्त समाजाचें ध्येय दृष्टिगोचर होऊं लागेल अशी भूदानयज्ञाच्या प्रणेत्यांची दृष्टि आहे.

## लोकशाही समाजवाद व शासनमुक्त समाज

प्रस्तुत लेखकाच्या मतानें, शासनमुक्त समाज किंवा आत्मराज्य हें नेहमींच अमूर्त राहणारें परंतु समाजांतील सर्व व्यवहारांवर आपला प्रभाव गाजविणारें आध्यात्मिक ध्येय राहणार आहे. तें अमूर्त राहूनहि समाजांतील व्यवहारांवर प्रभाव गाजवूं लागेल तर आजच्या समाजघटनेंत आमूलाग्र क्रांति घडून येऊन भांडवलदार लोकशाहीचें रूपांतर समाजवादी लोकशाहींत व विकेंद्रित समाजवादांत होईल. म्हणून










आत्मराज्य हें मानवी समाजाचें सनातन अमूर्त ध्येय आणि विकेंद्रित लोकशाही समाजवाद हें त्या अमूर्त आदर्शाचें आजच्या परिस्थितीस अनुरूप असें मूर्त स्वरूप होय असें मी मानितों. आत्मराज्याच्या अमूर्त आदर्शाच्या अभावीं लोकशाही समाजवाद हें एक जड समाजघटनायंत्र बनेल आणि लोकशाही समाजवादाच्या अभावीं आत्मराज्याचें सनातन ध्येय हें अंतःसृष्टींतूनहि लोप पावून प्रभावहीन बनेल. म्हणून लोकशाही समाजवादाच्या भोक्त्यांनीं आत्मराज्याचें अमूर्त स्वरूप व त्याचा प्रभाव समजून घेऊन त्यासाठीं जीवनदान करण्याची वृत्ति स्वीकारली पाहिजे. त्याचप्रमाणें आत्मराज्यवाद्यांनीं आपल्या सनातन आदर्शाचें आजचें मूर्त स्वरूप म्हणजे विकेंद्रित लोकशाही समाजवाद हेंच आहे हें ओळखून भारतांत लोकशाही समाजवाद स्थापन करणाऱ्या शक्तींना आपला नैतिक पाठिंबा दिला पाहिजे. या दृष्टीनेंच भूदान-यज्ञाचे प्रणेते आचार्य विनोबा भावे आणि भारतीय समाजवादाचें मूर्त प्रतीक असे जयप्रकाश नारायण यांचें सहकार्य ही भारतीय इतिहासांतील स्वातंत्र्यप्राप्तीनंतरची अत्यंत महत्त्वाची आणि भारतीय इतिहासाला नवी कलाटणी देणारी अशी घटना आहे असें मी समजतों. भारतांत निर्माण होणारा समाजवाद हा सत्याग्रही स्वरूपाचा बनणार आहे व बनला पाहिजे असें माझें मत १९३० सालापासूनच बनलेलें असल्यामुळें, आचार्य विनोबा आणि जयप्रकाश नारायण यांची युति होऊन भारतीय जनतेंत क्रांतिकारक आंदोलन सुरूं झाल्याचें पाहून मला अत्यंत समाधान झालें. या आंदोलनाचा प्रभाव राष्ट्रांतील सर्व राजकीय पक्षांवर पडत असून समाजवादाची घोषणा करण्यास कचरणारा अधिकारारूढ कॉंग्रेस-पक्षहि आतां लोकशाही समाजवाद हेंच आपलें ध्येय आहे असें घोषित करूं लागला आहे. माझ्या मतानें हाहि एक भूदानयज्ञाचाच प्रभाव आहे.

राष्ट्राची दुसरी पंचवार्षिक योजना आंखतांना आपलें ध्येय समाजवाद हें आहे, असा स्पष्ट आदेश योजनाकारांना देण्यांत आलेला असून त्याचबरोबर बेकारीनिवारणाच्या दृष्टीनें ग्रामोद्योगांच्या संघटनेला प्राधान्य दिलें पाहिजे हें ग्रामोद्योगाचें तत्त्वहि मान्य करण्यांत आलें आहे. अद्यापि या ग्रामोद्योगांच्या संघटनेला स्वावलंबी व स्वयंपूर्ण ग्रामराज्यें निर्माण करण्याच्या ध्येयाशीं निगडित करण्यांत आलेलें नाहीं हा एक महत्त्वाचा तात्त्विक दोष कॉंग्रेसपक्षाच्या धोरणांत उरलेला आहे. गांधीवाद्यांनीं व समाजवाद्यांनीं हा दोष काढून टाकावयाचा असा निर्धार केला पाहिजे आणि त्याचबरोबर ग्रामोद्योगांचीं उत्पादनसाधनें अधिक फलप्रद कशीं बनतील याचा शोध केला पाहिजे. ग्रामोद्योगांच्या उत्पादनसाधनांत व तंत्रांत अधिक फलदायी क्रांति घडवून आणल्यावांचून ग्रामोद्योगांचा पाया सुस्थिर बनणार नाहीं. तसेंच या ग्रामोद्योगांना सरकारी संरक्षण मिळून त्यांच्या क्षेत्रावर भांडवलशाही आक्रमण होणार नाहीं अशी दक्षता घेतली पाहिजे.

## विनोबा आणि जयप्रकाश

भारतांतील समाजवादी क्रांतीला आजचें सत्याग्रही स्वरूप प्राप्त होत आहे त्याचें श्रेय आचार्य विनोबा आणि साथी जयप्रकाश यांना आहे. म. गांधींनीं 'आपण समाजवादी आहों आणि भारतांत समाजवादी क्रांति घडून आली पाहिजे' असें वारंवार म्हटलेलें असलें तरी त्यांनीं आपला समाजवाद हा भिन्न स्वरूपाचा असणार असेंहि म्हटलें होतें. तसेंच त्यांनीं प्रतिपादिलेला धनिक हे निधिधारक आहेत हा सिद्धान्त आणि वर्गसमन्वयाचें त्यांचें धोरण या दोन दृष्टिकोनांतून अखेरीस वर्गहीन समाज आणि संपत्तीचें सामाजिक स्वामित्व या दोन रुळांवर सत्याग्रही क्रांतीची गाडी कशी व केव्हां येणार याविषयीं फार मुग्धता होती. कांहींना तर वर्गहीन समाज आणि संपत्तीचें सामाजिक स्वामित्व हे विचार गांधीवादाशीं पूर्णपणें विसंगत असल्याचेंच वाटत होतें. यामुळें म. गांधींच्या वधानंतर सत्याग्रही क्रांतीचा रोख कोणीकडे वळणार याबद्दल जनता बुचकळयांत पडली होती. अशा परिस्थितींत आचार्य विनोबा भावे यांनीं भूदानाचा यज्ञ सुरूं करून त्याच्या होमकुंडांत संपत्तीच्या खाजगी स्वामित्वाची आहुति द्यावयाची आणि त्यांतून अखेरीस वर्गहीन व शासनमुक्त समाज निर्माण करावयाचा असा संकल्प जाहीर केला. यावेळेपासून स्वतंत्र भारतांत सत्याग्रही क्रांतीचा रोख संपत्तीच्या खाजगी मालकीविरुद्ध राहील आणि आर्थिक क्रांति करून वर्गहीन समाज स्थापन करणें हेंच सर्व सत्याग्रहींचें आजचें आद्य कर्तव्य आहे अशी गांधीवाद्यांची खात्री झाली.

मध्यंतरींच्या काळांत जयप्रकाश नारायण यांनीं गांधीवादांतील साधनशुद्धीचा आणि अनत्याचारी वृत्तीचा सिद्धान्त समाजवादी पक्षाकडून मान्य करवून घेतला होता. त्याचप्रमाणें समाजवाद्यांनीं मार्क्सवादाचीं सर्व गृहीततत्त्वें सत्याग्रही दृष्टीनें फेर-तपासून पाहिलीं पाहिजेत अशी वृत्ति समाजवादी पक्षांत निर्माण केली होती. इतकेंच नाहीं तर मानवी जीवनां-तील अत्यंत खोल व संकीर्ण समस्या सोडविण्याच्या दृष्टीनें भौतिकवाद पुरा पडत नाहीं आणि म्हणून त्याच्या पलीकडे जाऊन मानवी जीवनाचें तत्त्वज्ञान बनविलं पाहिजे असा आपला नवा दृष्टिकोन असल्याची घोषणा केली होती. अशा रीतीनें भारतांतील समाज-वादी क्रांतिकारक आणि सत्याग्रही लोकसेवक हे येथील समाजवादी क्रांति घडवून आणण्यास उद्युक्त झाले होते. त्यांचा समन्वय करून आणि समाजवादी पक्षाचें प्रजासमाजवादी पक्षांत रूपांतर करून जयप्रकाश नारायण यांनीं भारतीय राजकारणांत सत्याग्रही तत्त्वाच्या अधिष्ठानावर समाजवादी क्रांति करूं पाहणारा एक राजकीय पक्ष निर्माण करून त्यांत आचार्य कृपलानी व प्रफुल्लचंद्र घोष यांच्यासारख्या निष्ठावंत गांधीवाद्यांचा समावेश करवून घेतला होता. भारतीय समाजवादी शक्तीला हा विशिष्ट आकार देण्यांत जयप्रकाश नारायण यांनीं फार मोठी मुत्सद्देगिरी प्रकट केलेली असून त्यांनीं भूदान-आंदोलनांतून निर्माण झालेल्या क्रांतिकार्याला आपलें जीवन समर्पण केलें हें त्याहूनहि मोठें कार्य त्यांनीं केलेलें आहे. आचार्य विनोबा आणि जयप्रकाश नारायण या दोघांनीं भारतांत सत्याग्रही क्रांतीला हें जें नवें वळण लावून दिलें आहे त्यामुळें भारतांत निर्माण झालेल्या सत्याग्रही क्रांति-शक्तीला समाजवादी आकार येणार अशी आतां सर्वांची खात्री होत आहे. कॉंग्रेसपक्षानें लोक-शाही समाजवादी ध्येयाची निःसंदिग्ध घोषणा केली हा एक या सत्याग्रही क्रांतिशक्तीचाच प्रभाव आहे.

### दोन पक्ष आणि पक्षातीत क्रांतिशक्ति

विनोबा आणि जयप्रकाश हे जी क्रांतिशक्ति निर्माण करीत आहेत ती पक्षातीत राहावी असें त्यांचें धोरण आहे. या धोरणामुळें संपत्तीचें सामाजिक स्वामित्व, वर्गहीन समाजरचना आणि विकेंद्रित उत्पादन हीं तत्त्वें राष्ट्रांतील सर्व पक्षांनीं मान्य केलींच पाहिजेत अशी परिस्थिति निर्माण होत आहे. प्रजासमाजवादी पक्षानें आधींच हीं तत्त्वें मान्य केलीं असून कॉंग्रेस-पक्षानें सुद्धां दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत समाजवादी ध्येयाला मान्यता देऊन बेकारीनिवारणाच्या दृष्टीनें कां होईना, ग्रामोद्योगाला महत्त्वाचें स्थान दिलें पाहिजे अशी मान्यता दिली आहे. म्हणजे नवसमाजाची उभारणी ज्या आर्थिक तत्त्वांवर व्हावयाची तीं आर्थिक तत्त्वें आतां प्रजासमाजवादी पक्ष आणि कॉंग्रेसपक्ष या दोनहि पक्षांना समान बनलीं आहेत. या पक्षांमधील मतभेद आतां नेमस्त आणि जहाल या पक्षांमधील मत-भेदासारखा बनलेला आहे. तो मतभेद साध्यासंबंधीं नसून त्या साध्याकडे प्रगति करण्याचा वेग तीव्र असावा कीं मंद असावा आणि हा वेग तीव्र करण्यासाठीं कायद्याचा व राजदंडाचा उपयोग किती प्रमाणांत करावा या संबंधींचा हा मतभेद आहे. साध्याचें स्वरूप आणि प्रगतीची दिशा दोघांना समान असल्यामुळें त्यांपैकीं एक पक्ष क्रांतिकारक व दुसरा पक्ष प्रतिक्रांतिकारक अशी परिस्थिति निर्माण होण्याचा धोका उरला नाहीं. लोकशाही राज्यांत एक पक्ष क्रांतिकारक आणि दुसरा पक्ष प्रतिक्रांतिकारक असा पक्षभेद निर्माण होऊन ते दोन पक्ष एकमेकांचा पाडाव करण्यास उद्युक्त झाले म्हणजे लोकशाही राज्ययंत्र मोडून पडतें असा अनु-भव १९२० पासून १९४० पर्यंतच्या काळांत युरोप-खंडांत आलेला आहे. आपल्या देशांत क्रांतिकारक विरुद्ध प्रतिक्रांतिकारक असे दोन पक्ष निर्माण होत नसून आपल्या लोकशाहीचा विकास तीव्र वेगानें करावा किंवा मंदगतीनें करावा अशा प्रकारच्या मत-भेदांवर आपले राजकीय पक्ष संघटित होऊं लागले आहेत. ही घटना लोकशाहीला तारक आणि शांततेला पोषक अशीच आहे. हे दोन पक्ष एकमेकांविरुद्ध टीका करीत असतां कोणतीहि भाषा वापरीत असले अथवा त्यांपैकीं प्रत्येकजण प्रतिपक्षासंबंधीं कोणतीहि भावना धरीत असला तरी त्यांपैकीं एक पक्ष समाजवादी क्रांतीच्या आघाडीवर राहणार आणि दुसरा पक्ष समाजवादी क्रांतीच्या पिछाडीवर राहून लोकशाहीला धक्का बसूं नये एवढी दक्षता घेणारा पक्ष ठरणार आहे, असें आम्हांस वाटतें.

या दोन पक्षांच्याहून भिन्न परंतु दोनहि पक्षांना अभिप्रेत असणाऱ्या समाजवादी क्रांतीकडे जाण्याचा








वेग वाढविणारा असा तिसरा एक सत्याग्रही लोकसेवक वर्ग आचार्य विनोबा निर्माण करीत आहेत. या सत्याग्रही लोकसेवकांचें अंतिम ध्येय शासनमुक्त समाज हें असलें तरी तो शासनमुक्त समाज कोणताहि राजकीय पक्ष निर्माण करूं शकणार नाहीं हें त्यांना मान्य आहे. लोकशाही राज्यांत राजकीय पक्ष असणार आणि अशा राजकीय पक्षांपैकीं कोणत्या पक्षाच्या हातीं केव्हां राज्ययंत्र द्यावें हें ठरविणें लोकांच्या हातींच राहणार हें उघड आहे. मात्र एका पक्षाच्या हातचें राज्य दुसऱ्या पक्षाच्या हातीं गेल्यावर त्यानें पूर्वीच्या पक्षानें केलेली प्रगति उखडून टाकतां कामा नये यासाठीं लोकांना आपल्या प्रगतीची दिशा कोणती आहे तें बरोबर समजलें पाहिजे आणि त्या दिशेच्या विरुद्ध कोणताहि राजकीय पक्ष जाणार नाहीं अशी दक्षता घेण्याचें कार्य लोकांनीं कोणत्याहि एका पक्षाच्या अधीन न होतां आपल्या पायावर उभें राहून केलें पाहिजे. अशी पक्षातीत क्रांतिशक्ति निर्माण करून तिचा प्रभाव सत्याग्रहाच्या मार्गानें सर्व पक्षांवर पाडण्याचें कार्य आचार्य विनोबा आणि जयप्रकाश हे करीत आहेत. समाजवादी क्रांतीचा वेग या त्यांच्या कार्यांतील प्रगतीवर अवलंबून असून १९५७ सालापर्यंत त्यांना समाधान वाटेल इतक्या प्रमाणांत या क्रांतिकारक आंदोलनाला यश आलें तर आमच्या राष्ट्रांतील लोकशाहीला समाजवादी स्वरूप देण्यासाठीं कायद्यांत व राज्यघटनेंत ज्या सुधारणा करणें अवश्य आहे. अशा रीतीनें भूदान-आंदोलनाचा प्रत्यक्ष परिणाम भारतांत समाजवादी राज्य स्थापन करणें हा होणार आहे.

## सत्याग्रही निष्ठा

भारतांतील सर्व पक्षांना व लोकांना लोकशाही, समाजवाद आणि सत्याग्रह हीं तीनहि तत्त्वें पटलेलीं असून सत्याग्रह हेंच मानवी जीवनाचें अंतिम तत्त्वज्ञान आहे अशी निष्ठा आधुनिक भारतांत निर्माण झाली आहे. तथापि, या सत्याग्रही निष्ठेचे दोन प्रकार असून त्यांना आम्ही शुद्ध सत्याग्रही निष्ठा आणि शबल सत्याग्रही निष्ठा अशीं नांवें देतों. शुद्ध सत्याग्रही निष्ठेचे लोक पूर्णपणें अराज्यवृत्तीनें व आत्मराज्यवृत्तीनें वागण्याचें व्रत अंगीकारून कोणत्याहि राजकीय पक्षाचे सभासद राहत नाहींत. कोणताहि राजकीय पक्ष राज्यसंस्थेवर आरूढ होऊन दंडशक्तीचा उपयोग करणारा अथवा करूं इच्छिणारा असतो. हें कार्य शुद्ध सत्याग्रही निष्ठेंत बसूं शकत नाहीं म्हणून कोणत्याहि राजकीय पक्षाची निष्ठा ही शुद्ध सत्याग्रही निष्ठा असूं शकत नाहीं. पण कोणत्याहि राजकीय पक्षानें क्रांतिकार्यासाठीं हिंसेचा उपयोग करावयाचा नाहीं तर तें कार्य सत्याग्रहानेंच घडवून आणावयाचें आणि राजदंडाचा वापर लोकशाही पद्धतीनेंच करावयाचा अशी निष्ठा स्वीकारिली तर त्याच्या त्या निष्ठेला शबल सत्याग्रही निष्ठा असें नांव देतां येईल. या दृष्टीनें प्रजासमाजवादी पक्ष याची निष्ठा शबल-सत्याग्रही आहे असें म्हणतां येईल. हीच निष्ठा काँग्रेसपक्षासहि स्वीकारतां येईल. म्हणून काँग्रेसपक्ष व प्रजासमाजवादी पक्ष हे शबल-सत्याग्रही पक्ष असून आचार्य विनोबा व त्यांच्यासारखे सर्वोदयवादी यांची निष्ठा शुद्ध सत्याग्रही आहे. शबल-सत्याग्रही निष्ठेचे दोन राजकीय पक्ष असून त्यांपैकीं एक तीव्र वेगानें लोकशाही समाजवादाकडे जाऊं इच्छिणारा व दुसरा मंदगतीनें तिकडे प्रगति करावी असें इच्छिणारा आहे. हे दोनहि पक्ष जर भूदानआंदोलनाच्या प्रभावाखालीं येत राहिले तर त्या दोघांना लोकशाही राज्य न मोडूं देतां समाजवादाची स्थापना करण्यांत यश येऊं शकेल. म्हणून भारतीय समाजवादाची स्थापना होण्यास हे दोनहि पक्ष आपापल्या परी उपयोगीं पडणार असून त्याची प्रचीति शुद्ध सत्याग्रही निष्ठेच्या लोकसेवकांच्या कार्यावर बऱ्याच अंशीं अवलंबून आहे. जर या तीन शक्ती एकमेकांना मारक न होतां आपापलें कार्य करीत राहतील तर भारताला कम्युनिस्ट क्रांतीची व तिच्यांतून निर्माण होणाऱ्या हुकुमशाहीची भीति धरण्याचें मुळींच कारण नाहीं. या तीन शक्तींचा प्रभाव वाढत जाईल त्या मानानें कम्युनिस्ट पक्ष भारतांतून लुप्त होत जाईल. मात्र या तीन शक्तींना आपलें कार्य करतां आलें नाहीं व त्यांपैकीं कोणतीहि शक्ति नष्ट झाली तर भारतांत हुकुमशाही किंवा अराजक माजण्याचा धोका आहे. आचार्य विनोबा यांनीं शुद्ध सत्याग्रही निष्ठेनें भूदान-आंदोलन सुरूं केल्यापासून हा धोका आतां फारच कमी झाला आहे. थोड्याच काळांत तो पूर्णपणें नष्ट होऊन भारतांत समाजवादी राज्याची स्थापना होईल अशी आम्हांस आशा वाटते.










प्रा. ना. अ. मावळंकर व प्रा. मा. दि. कानेटकर

# भूदान-आंदोलन : तत्त्वज्ञान, ध्येय व कार्यपद्धति

भूमिदान-आंदोलनापाठीमागील तत्त्वज्ञान, प्रेरणा, आणि तदनुसार भारतांतील वेगवेगळया प्रांतांत आज प्रत्यक्षांत घडत असणारें कार्य या गोष्टींचा परामर्श वेगवेगळया अधिकारी व्यक्तींनीं या अंकांत ठिकठिकाणीं घेतलाच आहे. प्रस्तुत लेखामधूनहि वरील गोष्टींचाच उहापोह थोड्या वेगळया पद्धतीनें करण्याचा विचार आहे.

भूमिदानामागील तत्त्वज्ञानाचा विचार करतांना तीन महत्त्वाचे प्रश्न उभे रहातातः ( १ ) सर्वसामान्य व्यक्तीच्या दृष्टीनें प्रचलित समाजांत भूमिदान ही कर्माकर्मविवेकाची कसोटी ( criterion of action ) होऊं शकेल काय ? ( २ ) भूमिदान आणि संपत्तिदान या चळवळींची कार्यपद्धति अंतिम ध्येयसाधनेस कितपत अनुकूल आहे ? आणि, (३) या कार्यपद्धतीनें जी नवसमाजनिर्मिति होणार असें सांगण्यांत येतें, तिचें मूलतः स्वरूप कोणतें राहील ?

वरील तीन प्रश्नांची चर्चा या लेखांत मुख्यतः करण्याचा प्रयत्न केला आहे.

## विचार व आचार यांमधील खोल दरी

गांधीजींनीं सत्याग्रह आणि अहिंसा या दोन महान् तत्त्वांचा पुरस्कार आणि प्रचार गेल्या तीस वर्षांत राजकीय क्षेत्रांत केला. त्यांच्याच पावलांवर पाऊल ठेऊन तोच प्रयोग आचार्य विनोबा आज आर्थिक क्षेत्रांत करीत आहेत. सामाजिक क्रान्ति घडवून आणून वर्गविहीन समाज निर्माण करणें हेंच श्री. विनोबाजींचें अंतिम उद्दिष्ट आहे. त्याग, सहकार, सेवा अशा शांतिमय मार्गांनीं मानवाचा हृदयपालट घडवून आणणें, ही या ध्येयपूर्तींचीं साधनें आहेत. भूमिदान, श्रमदान, संपत्तिदान, जीवनदान ह्या वरील साधनांच्या एकाहून एक उच्च पायऱ्या आहेत.

साध्य ह्या दृष्टीनें वर्गविहीन समाज व अर्थव्यवस्था हीं सर्वमान्य आहेत असें आज व यापुढें समजण्यास हरकत नाहीं. अल्डस् हक्सली यांनीं म्हटल्याप्रमाणें न्याय, समता, स्वातंत्र्य वगैरे मानवाच्या अंतिम उद्दिष्टांबाबत आज तीन हजार वर्षे सर्वांचें एकमत आहे. त्याचप्रमाणें त्याग आणि सहकार यांसारख्या ध्येयवादी साधनांबद्दल कोणाच्याही मनांत किंतु असण्याचें कारण नाहीं. मानवधर्म याहून वेगळा नाहीं.

मग प्रश्न असा उद्भवतो कीं साध्य व साधनें हीं अशा तऱ्हेनें आपापल्यापरी सर्वमान्य असतांना त्यांसंबंधीं आंदोलनाची जरूर काय ? हृदयपालट करण्याची आवश्यकता कोणती ? श्री. जयप्रकाश नारायण आदि भूमिदानकार्यकर्ते वारंवार आग्रहानें सांगतात कीं भूमिदान किंवा संपत्तिदान यांस तात्त्विक विरोधक त्यांना आतापर्यंत कोठेंहि, केव्हांहि आढळला नाहीं. भारतीय संस्कृतींत तरी त्यागाची, सहकाराची, सेवाधर्माचीं मुळें अंतःकरणांत फार खोलवर रुजलेलीं आहेत !

भूमिदान-चळवळींत अभिप्रेत असलेलीं साध्य व साधनें सर्वसंमत आहेत असें एकदा ठरल्यावर संकल्पित वेळांत व कार्यपद्धतीनें पांच कोटी एकर जमीन सध्याच्या जमीनदारांपासून मिळवून तिची फेरविभागणी करणें हीहि गोष्ट विशेष कठीण असूं नये. तथापि गेल्या ३-४ वर्षांत हातीं आलेली सुमारें ३५ लक्षांवर एकर जमीन व तिची वर्गवारी लक्षांत घेतां भूमिदान आंदोलनाचें हें कार्य अपेक्षेपेक्षां बरेंच कठीण असावें अशी शंका मनांत येते. आहे याच गतीनें गेल्यास १९५७ अखेर संकल्पित ५ कोटी एकर जमीनहि कशी मिळणार असा प्रश्न त्यामुळें उभा रहातो.

भूमिदान-आंदोलनाच्या मंद गतीचें 'लायक व योग्य अशा कार्यकर्त्यांचा अभाव' असें एक महत्त्वाचें कारण या चळवळीच्या पुढाऱ्यांनीं सभासंमेलनांतून वारंवार पुढें केलें आहे. तथापि भूदानापाठीमागील प्रेरणा व वैचारिक बैठक यांच्याशीं हें कारण सुसंगत वाटत नाहीं. कारण भूमिदानाची महती सर्वांनाच पटली आहे किंवा यथावकाश पटेल असें एकदां ठरल्यावर जमीनमालक किंवा











अनुक्रमणिका

घनिकवर्ग या सर्वांनींच स्वेच्छेनें व स्वतःच्या उदाहरणानें या कार्याचा भार भूदान-कार्यकर्त्यांच्या ' निमंत्रणा'ची वाट न पहातांच हलका केला पाहिजे, हें ओघानेंच प्राप्त होतें. आणि असें जर प्रत्यक्षांत घडत नसेल तर लायक कार्यकर्त्यांच्या अभावाव्यतिरिक्त इतर कांहीं महत्त्वाच्या व मूलगामी गोष्टींमुळेंच या कार्यास विलंब लागत असला पाहिजे हें उघड आहे.

या मूलगामी गोष्टी कोणत्या, या प्रश्नाचा परामर्श येथें घेतला पाहिजे. भूमिदानाचें तत्त्व सर्वमान्य असूनहि आचरण मात्र त्यानुसार होत नाहीं याचा तात्पर्यार्थ विचार व आचार यांमध्यें प्रत्यक्ष व्यवहारांत फारकत होत आहे हा होय. हें आचार–विचारांचें द्वंद्व केवळ भूमिदानाच्या बाबतींतच नव्हे तर इतरहि जेथें विशिष्ट तत्त्वानुसार आचरण करण्याची वेळ येते त्यावेळीं स्पष्ट होतें. असें नसतें तर तुकारामांनीं ' बोले तैसा चाले त्याचीं वंदावीं पाऊलें ' असें म्हणण्याचें कांहींच कारण नव्हतें. इतिहासांतील व अर्वाचीन तत्त्ववेत्त्यांनीं जगाला दिलेलीं उदात्त नीतितत्त्वें कोणाला मान्य नाहींत ? तीं पटलीं आहेत एवढेंच नव्हे तर त्यांचा जयघोष उठल्यासुटल्या आपणां सर्वांकडून केला जातो. व्यासःपीठ, वर्तमानपत्र, शिळोप्याच्या गप्पा यांसारखी संधि आपण सहसा वायां दवडीत नाहीं! इतरांना तात्त्विक उपदेशाचे वळसे देणें हा तर आपल्यापैकीं अनेकांचा नित्याचा छंद असतो. अशा वळशांमधूनच सत्य, सहकार, त्याग इत्यादि गोष्टींचें महत्त्व इतरांना पाजण्याचें कार्य अव्याहत चालूं असतें. तथापि, अशा तऱ्हेनें वर्षानुवर्षें चालत आलेल्या उच्च व नैतिक मूल्यांची पाठपूजा सर्वत्र होत असूनहि व्यवहारांत मात्र खोटेपणा व स्वार्थ, हिंसा व अन्याय यांसारख्या गोष्टीच हरघडी दृष्टीस पडतात. कळतें पण वळत नाहीं अशांतील हा प्रकार आहे. निवडणुकांमधील उमेदवारी यशस्वी करण्यासाठीं सज्जन ठरलेल्या लोकांकडून कोणते प्रमाद घडूं शकतात हें येथें नव्यानें सांगण्याची जरूरी नाहीं. तीच गोष्ट पुढारीपण मिळविण्यासंबंधींची. ' पुढाऱ्यांना व्यवहारांत तत्त्वाला मुरड घालावी लागते ' अशा तऱ्हेचा युक्तिवाद करून आमच्या पुढाऱ्यांनीं अनेक वेळां कठीण व बांक्या प्रसंगांमधून आपली व आपल्या सदसद्विवेकबुद्धी-( Conscience) ची सुटका करून घेतलेली आहे. मनुष्याचे विचार व आचार यांमध्यें केवढी खोल दरी असते हें या उदाहरणांवरून सहज स्पष्ट होतें.

## मनुष्य दांभिक आहे काय ?

वरील गोष्टींचें एक महत्त्वाचें कारण म्हणून कदाचित् असें आग्रहानें सांगण्यांत येईल कीं सामान्य माणसाची आपल्या मूल्यांवरील निष्ठाच दांभिक स्वरूपाची असल्यामुळें व्यवहारांत त्याच्याकडून असे प्रकार घडतात व घडणारच. तथापि हें विधान वरील गोष्टींचें कारण या दृष्टीनें समाधानकारक वाटत नाहीं. कारण त्यामुळें जॉर्ज बर्नर्ड शॉ यांनीं आपल्या 'Everybody's Political What's What? या पुस्तकांत म्हटल्याप्रमाणें 'Is human nature so incurably depraved ? ( 'मनुष्यस्वभाव कधींहि न सुधारण्याइतका नीच आहे काय ?' ) हा मूलगामी प्रश्न पुढें उभा राहतो. सध्याच्या कोणत्याहि सर्वसामान्य व्यक्तीची ध्येयनिष्ठा दांभिक व बाजारी स्वरूपाची असल्याचा प्रत्यय किंवा शंका इतरांना येण्यासारख्या अनेक लहानसहान गोष्टी त्या व्यक्तीच्या हातून प्रत्यहीं कळत न कळत घडत असतात हें तर मान्य केलेंच पाहिजे. परंतु ' दांभिकपणा ' हा गुण सामान्य व्यक्तीमध्यें स्वयंभू असल्याचा आ( ग्रह ) वरील विधानापाठीमागें आहे हें लक्षांत घेतलें पाहिजे.

सत्याग्रहादि साधनांनीं मानवाचें मतपरिवर्तन किंवा हृदयपालट होईल या आग्रहाच्या पाठीमागेंहि भूमिका हीच कीं या साधनांचा योग्य वापर करूनहि सामान्य मनुष्य जर अपेक्षित ( उदा. भूमिदान-) कार्यास प्रवृत्त झाला नाहीं किंवा तें कार्य ह्याच्या हातून निष्ठेनें पार पडलें नाहीं तर ती गोष्ट त्याच्या निष्ठेमधील चांचल्य व बाजारीपणा याची द्योतक आहे. हा आग्रह अनेक दृष्टींनीं तर्कदुष्ट वाटतो.

## विसंगत मूल्यांचा अंगीकार

भूमिदानाचीच गोष्ट घेऊं. अंतिम साध्यसाधनेस भूमिदान किंवा संपत्तिदान हा एकमेव राजमार्ग आहे असा आग्रह धरणाऱ्यांची वैचारिक भूमिका एकान्तिक (monistic) स्वरूपाची वाटते. भूदानाचें तत्त्व पटूनहि त्यानुसार प्रत्यक्षांत पुढें पाऊलें टाकण्यास कचरणाऱ्या व्यक्तीची निष्ठा दांभिक असते असें म्हणण्यापेक्षां भूदानाचा आग्रहपूर्वक प्रचार करणाऱ्या व्यक्तींच्या विचारांचें स्वरूप एकांगी किंवा एकान्तिक

असते असें म्हणणें हें वस्तुस्थितीस जास्त धरून आहे. एकांगी अशासाठीं कीं सामान्य मनुष्याकडून त्याग किंवा सहकार या गोष्टींची अपेक्षा करतांना त्या मनुष्याचे मनोव्यापार कसे चालतात किंवा कोणत्या तऱ्हेच्या भावनांचा कल्लोळ त्याचा मनांत चाललेला असतो या गोष्टीकडे भूमिदानकार्यकर्त्यांचें दुर्लक्ष असतें. जमीन किंवा संपत्ति यांसारख्या गोष्टींचें दान करतांना त्यांची निरनिराळ्या स्वरूपांत द्यावी लागणारी किंमत ( ' opportunity cost ' ) किती व कोणती या गोष्टीचा सामान्य मनुष्य साहजिकच विचार करणार. उदाहरणार्थ, मासिक ३००--४०० रुपये वेतन मिळविणाऱ्या कुटुंबवत्सल मनुष्यास आपल्या उत्पन्नाचा १/६ हिस्साहि भूदान कार्यासाठीं देणें जड वाटतें. आपल्या कुटुंबीयांसाठीं भविष्यकाळाकरितां करावी लागणारी तरतूद, मुलाबाळांचें शिक्षण व त्या प्रीत्यर्थ होणारा खर्च, पत्नी, मुलें, नातेवाईक व इतर पाहुणे इत्यादींसाठीं हौशीनें करावा लागणारा खर्च, आणि सरतेशेवटीं समाजांत आहे तें स्थान टिकविण्यासाठीं, किंबहुना रहाणीचें मान अधिक वाढवून समाजांत अधिकाधिक मान व प्रतिष्ठा मिळविण्यासाठी करावी लागणारी धडपड--या सर्व गोष्टी त्या मनुष्यास जमेस घ्याव्या लागतात. यास उत्तर म्हणून असें सांगण्यांत येईल कीं ज्या व्यक्तीस वरील सर्व गोष्टींची मातब्बरी भूमिदानापेक्षां जास्त वाटते तिला भूमिदानाचें तत्त्वच पटलेलें नाहीं, आणि म्हणून अशा तऱ्हेच्या सामान्य मनुष्याचें उदाहरण येथें सर्वस्वीं अप्रस्तुत आहे. तथापि हें विधानहि बरोबर वाटत नाहीं. कारण एक तर असें कीं अशा तऱ्हेचा वैचारिक संघर्ष प्रचलित समाजांतील चारदोन व्यक्तींच्या बाबतींतच घडत आहे असें नसून बहुतेक सर्व व्यक्तींच्या मनांत तो कमीअधिक स्वरूपांत चालू आहे. आणि म्हणूनच तमाम जनतेची भूमिदानावरील श्रद्धा बाजारी आहे असें म्हणण्यापेक्षां अंतिम साध्यसाधनेस भूमिदानासारखें साधन सर्वसाधारण मनुष्यास पेलणारें नाहीं असें म्हणणें जास्त सयुक्तिक वाटतें. दुसरी पण जास्त महत्त्वाची गोष्ट अशी कीं, अशा तऱ्हेच्या वैचारिक संघर्षास परिणामीं प्रचलित समाज व अर्थव्यवस्थाच जबाबदार आहे. भूमिदान करणें म्हणजेच प्रचलित समाजांतील मान व प्रतिष्ठा, जीवनांत थोडीफार लाभलेली आर्थिक शाश्वती वगैरे-सारख्या मूल्यांवर पाणी सोडणें असाच सामान्य मनुष्याच्या व्यवहारकोशांतील अर्थ आहे. जें आयुष्य असेल तें एकंदरींत सुखासमाधानांत जावें, भविष्यकाळीं आपल्या पश्चात् मुलाबाळांस दुसऱ्याच्या तोंडाकडे पहाण्याची पाळी येऊं नये, उलट, त्यांना मानानें व प्रतिष्ठेनें जगतां यावें, शिक्षणानें व इतर अनेक गोष्टींनीं आपण किंवा आपल्या मुलांनीं सुसंस्कृत बनावें, अशा तऱ्हेच्या अपेक्षा सामान्य मनुष्याच्या मनांत असतील तर त्यांत आक्षेपार्ह असें कांहींच नाहीं. वरील अपेक्षा पूर्ण करण्याची जबाबदारी प्रचलित समाज स्वतःच जर उचलणार असेल तर भूमिदान, संपत्तिदान किंवा इतर कोणतेंहि दान करण्यास सामान्य मनुष्य सहसा नाखुषी दाखवील असें वाटत नाहीं. वस्तुस्थिति अशी आहे कीं प्रचलित समाजाचें स्वरूपच भांडवलशाही असल्यामुळें त्याचीं अंतिम मूल्यें सत्ता, भोग व स्पर्धा हीं ठरलीं आहेत. सामान्य व्यक्तींचें दैनंदिन जीवन वरील मूल्यांच्या चौकटीनें नियंत्रित झालेलें आहे. ज्या समाजाचें अधिष्ठान स्पर्धा आणि भोग हें आहे त्या समाजांत वरील मूल्यांशीं विसंगत असणाऱ्या मूल्यांचा अंगीकार करून त्यानुसार वागणें म्हणजे आयुष्यांतील अनिश्चिति अधिकच वाढवून, बसलेली घडी विसकटविण्यासारखें आहे.

तात्पर्यार्थ असा कीं, ' भूमिदान ' ही एक भावनांना आवाहन करणारी घोषणा ( slogan ) आहे. त्याग किंवा सहकार यांच्याहि पलीकडील अंतिम सत्य ( summum bonum ) प्रचलित समाजांतील ज्या चारदोन व्यक्तींस ' सांपडलें ' आहे, त्यांना भूमिदान किंवा संपत्तिदान यांसारख्या यःकश्चित् slogans ची किंवा साधनांची काय भीति किंवा पर्वा वाटणार ? भगवद्गीतेंतील ' स्थितप्रज्ञ ' आणि अल्डस् हक्सली यांचे 'Non-attached Individuals' म्हणजेच हे लोक. अशा व्यक्तींस कोणता त्याग करावयास सांगणार ? अनासक्तियोगानेंच तर ते स्थितप्रज्ञ ठरलेले असतात. पण याउलट, भूमिहीनांच्या मीठभाकरीचा प्रश्न किंवा दैनंदिन जीवनांतील एकंदर सर्वच कलहाचा प्रश्न सुटावा यासाठीं सर्वसामान्य व्यक्तींना भूमिदानाच्या कार्यास प्रवृत्त करण्यासाठीं त्यांना स्थितप्रज्ञतेच्या उच्च पातळीवर ओढण्याचा








प्रयत्न करणें म्हणजे साध्यापेक्षां साधनालाच मातब्बर ठरविणें होय, ( The means appear to be far too bigger than the end itself ). सर्वच सामान्य व्यक्तींना हा स्थितप्रज्ञतेचा सोपान मार्ग सहज चढतां आला तर जमीनीचाच प्रश्न काय, जगांतील बहूतेक सर्वच यक्षप्रश्न चुटकीसरसे सुटतील.

भूमिदान हें नैतिक कृतीची कसोटी (criterion of action ) होऊं शकत नाहीं असें आम्हास जें वाटतें, तें एवढ्याचसाठीं कीं त्या तत्त्वापाठीमागील भूमिका आणि आग्रह एकान्तिक ( monistic ) स्वरूपाचा आहे. याउलट, प्रचलित समाजांत सामान्य मनुष्यास त्यासाठीं इतर मूल्यांच्या स्वरूपांत द्यावी लागणारी किंमत जबर आणि आत्मघातकी ( fatal ) आहे.

यानंतर दुसरा महत्त्वाचा प्रश्न असा कीं भूमिदान आणि संपत्तिदान या चळवळींची कार्यपद्धति अंतिम ध्येयसाधनेस कितपत अनुकूल आहे ?

## कार्यपद्धति प्रतिगामी ठरण्याचा संभव

धनिकांच्या किंवा उद्योगपतींच्या दाराशीं धरणें धरून त्यांना आपल्या उत्पन्नाचा एकषष्ठांश भाग भूमिदानकार्यास द्यावयास भाग पाडणें हा भूमिदान-आंदोलनाचा तात्कालिक विजय असूं शकेल. पण ज्या पद्धतीनें ही संपत्ति धनिकांनीं मिळविलेली असते, किंवा ज्या कारवायांमुळें आजपर्यंत कंगाल शेतकऱ्यांची जमीन बड्या जमीनदारांस गिळंकृत करतां आली ती पद्धत चिरस्थायी करण्यास भूमिदान हें एक आवाहनच नाहीं काय ? काळ्या बाजारांत मिळविलेल्या संपत्तीचा १/६ भाग यज्ञार्पण करतांना धनिकांना जसें पापमुक्त झाल्यासारखें वाटेल, तसेंच पुढील वर्षी हेंच कृष्णकृत्य तितक्याच नेटानें पुढें चालूं ठेवण्याची उमेद व प्रेरणाहि त्यांस भूमिदानानेंच मिळणार ! त्याचप्रमाणें मजूरवर्गाची पिळवणूक करून मिळविलेल्या संपत्तीचा १/६ भाग भूदान-यज्ञास देतांनाहि पुढील वर्षी ही भूदानप्रेमी मंडळी आपल्या दारीं धरणें धरणार या निश्चितीनें हें पिळवणूकीचें कार्य पुढेंहि अखंड चालूं ठेवण्याची प्रेरणा उद्योगपतींना मिळणार ! भूमिदान-कार्याच्या शुचितेबद्दल कोणाच्याहि मनांत किंतु नाहीं. तथापि 'Hell is paved with good intentions' ( 'नरकाचा मार्ग वरून सत्संकल्पांनींच झांकलेला असतो' ) या विधानाचीच वरील गोष्टींमधून प्रचीति येत नाहीं काय ? आणि वरील कार्यपद्धतीन धनिक किंवा जमीनदारवर्ग यांच्या हातांमधील अंतिम सत्ता जर अशा तऱ्हेनें अबाधित रहाणार असेल, नव्हे जास्तच दृढमूल होणार असेल, तर भूमिदानाची कार्यपद्धति केवळ सदोषच नव्हे तर परिणामीं प्रतिगामी स्वरूपाचीहि ठरण्याचा संभव आहे असें नाइलाजानें म्हणावें लागतें. भांडवलशाही अर्थव्यवस्थेंतील दुष्टचक्र फोडण्यास लागणारें सामर्थ्य वरील पद्धतींत आहे असें वाटत नाहीं. दूरदृष्टीनें विचार केल्यास उत्पन्नाचा कितवा हिस्सा भूमिदानकार्यास मिळत आहे, ही महत्त्वाची बाब नसून प्रचलित समाजांतील वेगवेगळ्या वर्गांचें उत्पन्न कोठून व कसें येतें ही आहे, हें चटकन् ध्यानांत येईल.

## भांडवलशाहींतील हितसंबंध अबाधित

पण असें जर आहे तर जनतेनें – यांत वरखालच्या सर्व वर्गांचे प्रतिनिधि आहेत – स्वयंस्फूर्तीनें सुमारें ३५ लक्षांवर एकर जमीन आतांपर्यंत भूमिदान कार्यास दिली त्याचें काय ? शिवाय यापुढेंहि बरीच जमीन मिळण्याचा संभव आहेच. निदान हातीं आलेल्या जमीनीवरून तरी भूमिदानकार्याच्या यशस्वितेबद्दल निश्चिति वाटण्यास हरकत नाहीं ! – असे प्रश्न संभवतात.

वरील सर्व प्रश्नांचें उत्तर दोन तऱ्हांनीं देतां येईल. पहिली गोष्ट अशी कीं हातीं आलेल्या जमीनीपैकीं बराचसा भाग उत्तर भारतामधून आलेला आहे आणि त्यांतहि बड्या जमिनदारांचा वांटा त्या मानानें ( proportionately ) विशेष आहे. आधींच कायद्यानें सरकारजमा झालेल्या जमीनींचें 'दान' ज्यांनीं केलें त्यांचा प्रश्न बाजूस ठेऊं. तरीहि उरलेल्या जमीनदारांनीं केवळ स्वयंस्फूर्तीनें आपापल्या जमिनी यज्ञार्पण केल्या हें विधान सयुक्तिक वाटत नाहीं. जमिनदारी नष्ट करणारा कायदा येणार अशा वदंतेनेंहि जमिनीच्या किंमती घसरल्याचीं अनेक उदाहरणें उत्तर भारतांत घडलीं आहेत. पडेल किंमतीच्या जमीनींचें 'दान' करून भूदानवाद्यांशीं आणि पर्यायानें सरकार-दरबारीं जुळतें घेणें हें भावी काळाच्या दृष्टीनें अत्यंत धूर्त राजकारण ठरतें, आणि कांहीं जमिनदारांनीं या दृष्टीनेंहि आपली कांहीं जमीन



अनुक्रमणिका








भूदानयज्ञास दिली आहे. ज्या चारदोन बड्या जमिनदारांनीं केवळ स्वयंप्रेरणेनें स्वतःची जमीन – म्हणजे त्यांपकीं स्वल्प भाग – भूदानयज्ञांत दिली त्यांच्या उदाहरणांवरून या चळवळीच्या यशाचें मोजमाप करणें चूक ठरेल.

पण वरील प्रश्नांचा परामर्श वेगळ्या तऱ्हेनें घेतां येईल. भूमिदानकार्यपद्धतीनें अल्पशी जमीनहि मिळणार नाहीं किंवा देशांतील संपत्तीचें थोड्याफार प्रमाणांतहि फेरवांटप होणार नाहीं असा या विवेचनांत आम्ही कोठेंहि आग्रह धरला नाहीं. पण याउलट, असा प्रश्न विचारतां येईल कीं भांडवलशाही अर्थव्यवस्थेमध्यें मालक व मजूर, जमिनदार व शेतकरी यांच हितसंबंध भिन्न व परस्परविरोधी असतांनाहि गेल्या साठसत्तर वर्षांच्या अवधीमध्यें कामगार-विकासाच्या दृष्टीनें भरीव कामगिरी इंग्लंड किंवा इतर कांहीं युरोपीय देशांत झालीच कीं नाहीं ? मग तेथें भांडवलशाही अजूनहि आहे असा आग्रह धरणें चूक नाहीं काय ? असें असूनहि अर्थशास्त्राचे मूलभूत सिद्धान्त मांडतांना आमचे पाश्चात्त्य अर्थशास्त्रज्ञ अद्यापहि इंग्लंड, अमेरिका वगैरे देशांस भांडवलशाही राष्ट्रें म्हणूनच समजतात तें कशासाठीं ? याचें कारण असें कीं भांडवलशाही अर्थव्यवस्था ही मूलतः एक पक्की दुर्भेद्य चौकट (rigid frame) आहे असें असलें तरी त्या चौकटीच्या आंत थोडाफार अंतर्गत लवचिकपणा (institutional play) चालूं शकतो. मालकांनीं मजूरांस या ना त्या स्वरूपांत थोड्याफार सवलती देणें हा या लवचिकपणाच्याच विलासा-(play) चा एक प्रकार आहे. तद्वतच भूमिदान किंवा संपत्तिदान वगैरे आंदोलनांस थोडाफार हातभार लावणें हें जमिनदार किंवा भांडवलदार याच्या अंतिम हितसंबंधां-(ultimate interests) ना मुळींच बाधक ठरत नाहीं. उलट, वर सांगितल्याप्रमाणें त्यांची अधिकच जोपासना होऊन तीं दृढमूल होतात. मात्र भांडवलशाहीच्या या चौकटीमधील अंतर्गत लवचिकपणा-( institutional play )चें तारतम्य पूर्णपणें ध्यानांत घेतलें पाहिजे. प्रचलित समाजामधील उत्पादनाच्या वेगवेगळ्या क्षेत्रांत मालक व जमिनदार आपापल्या मगदुराप्रमाणें कमीअधिक सवलती मजूर व शेतकरी वर्गास देतात व देतीलहि. मात्र यामुळें मालक व जमिनदारवर्गांची प्रतिष्ठा व सत्ता यांस कोणत्याहि तऱ्हेनें बाध येणार नाहीं या गोष्टींचीही त्यांचेकडून पूर्णपणें खबरदारी घेण्यांत येईल.

### ग्रामराज्याचें ध्येय

तथापि क्षणभर असें धरून चालूं कीं आहे या मंदगतीनेंहि जवळजवळ सर्व जमीन भूमिदानपद्धतीनें हातीं आली आहे; त्याचप्रमाणें वेगवेगळ्या उत्पादनक्षेत्रांतील खेळणाऱ्या संपत्तीचाहि बराच भाग यज्ञार्पण झाला आहे. ही साधनसामग्री हातीं घेऊन जी नवसमाजनिर्मिति भूमिदानवादी करणार तिचें स्वरूप मूलतः कोणतें राहील व त्याचे समाजावर एकंदर परिणाम कोणते होतील या प्रश्नाचीहि चर्चा येथें होणें अगत्याचें आहे.

नवसमाज वर्गविहीन असणार अशी ग्वाही आचार्य विनोबा व इतर भूमिदान-कार्यकर्ते यांनीं वारंवार दिली आहे. तथापि केवळ 'वर्गविहीन' या शब्दावरून या समाजाचें स्वरूप स्पष्ट होत नाहीं. वर्गविहीन समाजांतहि उत्पादनरचना (organization of production) कोणत्या स्वरूपाची असणार हा महत्त्वाचा प्रश्न आहे. या प्रश्नाचें उत्तर आचार्य विनोबा व इतर कार्यकर्ते यांनीं भाषण-लेखनद्वारां दिलें आहे. ग्रामराज्याची स्थापना हें यासंबंधीच्या धोरणांतील मुख्य सूत्र आहे. त्याचप्रमाणें देशांतील प्रचलित धंद्यांचें विकेन्द्रीकरण करून किंवा कांहीं विशिष्ट धंद्यांची पूर्णपणें पीछेहाट करून हीं ग्रामराज्यें स्वयंपूर्ण करण्याची घोषणाहि या मंडळीकडून झाली आहे. थोडक्यांत म्हणजे या नवसमाजाचें स्वरूप बहुतांशीं मध्ययुगीन रहाणार असें स्पष्ट दिसतें. पण असें जर असेल तर ज्या कारणांमुळें मध्ययुगीन समाज त्याज्य ठरला त्या गोष्टींचा अंतर्भाव थोड्याफार स्वरूपांत कां होईना, या नवसमाजांत होणार हें उघड आहे. 'The progress of society is from status to contract' ( 'समाजांतील जन्मसिद्ध स्थानापासून व्यक्तिगत कराराकडे अशी समाजाची प्रगति झाली आहे') ही इतिहासाची शिकवण दुर्लक्षून इतिहासकालीन व अनेकदृष्ट्या दुष्ट अशा अर्थव्यवस्थेची या नवसमाजांत पुनःस्थापना करणें म्हणजे पर्यायानें समाजाच्या वेगवेगळ्या अंगांमध्यें आजपर्यंत झालेल्या प्रगतीकडे पाठ फिरविणें आहे; किंबहुना मध्ययुगापासून आजपर्यंत झाली ती प्रगति नव्हेच असा आग्रह








घरणें आहे !

### प्रतिक्रान्तीचा धोका

तथापि नवसमाज मध्ययुगीन होणार एवढीच केवळ विवंचना वरील विवेचनाच्या पाठीमागें नाहीं. भांडवलशाही ही इतर अनेक दृष्टींनीं दुष्ट अशी अर्थव्यवस्था असली तरी प्रचलित समाजांत घडलेल्या व अद्यापहि होत असलेल्या एका महत्त्वाच्या प्रगतीचें श्रेय तिला दिलें पाहिजे. भांडवलशाहीच्या काळांतच औद्योगिक क्रान्ति फोंफावत जाऊन तिचीं फळें आपण आज चाखीत आहोंत. औद्योगिक क्रान्तीमुळेंच देशांतील अर्थव्यवस्थेस एक तऱ्हेचा सुसूत्रीपणा आला, वेगवेगळ्या प्रान्तांचे अन्योन्य संबंध घनिष्ठ झाले, त्यांमधील दळणवळण वाढलें, आणि यामुळें राष्ट्र समृद्ध झालें. याउलट, ग्रामराज्यांची स्थापना करून त्यांना स्वयंपूर्ण बनविण्याचा प्रयत्न करणें म्हणजे औद्योगिक व एकंदर सर्वच उत्पादनक्षेत्रांत प्रतिक्रान्ति (counter-revolution) घडवून आणण्यासारखें आहे. ही प्रतिक्रान्ति यशस्वी करण्यास द्यावी लागणारी सामाजिक किंमत (Social Cost) केवढी प्रचंड आहे याचा भूमिदान-वाद्यांनीं साकल्यानें विचार केला आहे किंवा नाहीं हें समजत नाहीं. केवळ दळणवळणाचीं साधनेंच घ्या : कॉंक्रीट व मेटलचे रस्ते व सडका, पूल, लोहमार्ग, आगगाड्या, एंजिनें, स्थानकें, गुदामें इत्यादींनीं आज भारतांतील प्रमुख शहरांचें एकमेकाशीं दळणवळण चाललें आहे, व्यापार-उदीम वाढला आहे, बाजारपेठा समृद्ध होण्यास मदत झाली आहे. ग्रामराज्यव्यवस्थेंत हा सर्वच प्रपंच कोसळून पडणार; म्हणजेच यांत आजपर्यंत ओतलेल्या पैशाची किंमत पूज्य होणार ! वरील साधनांचा इतरत्र उपयोग होण्याची शक्यताहि कमी आहे. घातलेले लोहमार्ग उखडून काढून त्यांतील लोखंडादि वस्तूंचा इतरत्र उपयोग करण्यासाठींहि केवढी जबर किंमत द्यावी लागेल ! रस्ते व सडका यांवरील वहातूक बंद पडली म्हणजे त्यांचा वापर पूज्य होऊन निकामी अडगळी-(dead-weight)-मध्येंच त्यांची गणना होणार. या सर्व गोष्टींचा तपशीलवार विचार होऊन मगच ग्रामराज्यस्थापना ही परिणामीं कितपत फलदायी आहे याचा अदमास घेतला पाहिजे.

अर्थात् भूमिदान-आंदोलनानें अशा तऱ्हेची नवसमाजनिर्मिति झाली तरच वरील दुष्परिणाम घडतील. लेखांत प्रारंभीच्या भागांत सांगितल्याप्रमाणें सत्याग्रहादि साधनांनीं कोणत्याहि नवसमाजनिर्मितीची शक्यता आम्हास दूरापास्त वाटते. मानवांत बदल घडविणें याचा अर्थ त्याचीं प्रचलित मूल्यें व निष्ठा नष्ट करून त्या ठिकाणीं नवीन मूल्यांचें अधिष्ठान बसविणें असा आहे. तथापि सामान्य मनुष्य हा समाजाचा एक घटक असून व असल्यामुळें त्याचीं मूल्यें व निष्ठा भोंवतालच्या समाजव्यवस्थेंतूनच निर्माण झालेल्या असतात. कोणत्याहि समाजव्यवस्थेचें स्वरूप हें परिणामीं त्यांतील अर्थव्यवस्थेवर अवलंबून असल्यामुळें मानवांत बदल घडविणें याचा खरा अर्थ पर्यायानें समाजरचना-(social structure) च बदलणें असाच आहे. एरवीं सत्याग्रहादि साधनांनीं झालेला बदल हा केवळ तात्कालिक आणि गौण (incidental), वरवरचा ठरेल, मौलिक रचनेमध्यें (structural) नव्हे.

---

## देशाला वांचविण्याकरितां यज्ञ

जेव्हां देशावर कांहीं संकट येतें, तेव्हां यज्ञ करतात. आपला देश संकटांत सांपडला आहे. हें कोणतें नवें संकट आलें आहे, असें मी म्हणत नाहीं. संकट आपल्या आंत अंतर्गतच आहे. मजूर आणि मालक यांच्यामध्यें तट पडले आहेत, कोट्यवधि लोकांची स्थिति अशी कीं त्यांना चरितार्थाला साधन नाहीं, हरिजन आणि हरिजनेतर यांच्यामध्यें शिवाशिव युगानुयुगें चालत आलेली आहे, धर्माधर्मांचे झगडे तर चालूंच आहेत. ह्या साऱ्या संकटांनीं आपल्या देशाला घेरलें आहे. अशा परिस्थितींतून देशाला वांचविण्याकरितां जेव्हां यज्ञ सुरू होतो, तेव्हां त्या यज्ञांत आपापला भाग देणें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. या सामूहिक यज्ञांत जे आपला भाग देत नाहींत, ते देशद्रोही ठरत आहेत हें मी जाहीरपणें सांगूं इच्छितों. देशाची या वेळीं अशी मागणी आहे कीं भूमिहीनांचा प्रश्न सोडविण्याकरितां, हा गोवर्धन पर्वत उचलण्याकरितां प्रत्येकाकडून दानपत्र मिळालें पाहिजे.

—आचार्य विनोबा

(सर्वोदयपुरी १८।४।५४).








प्रा. देवदत्त अ. दाभोलकर

# भूदान, साम्ययोग आणि नियोजन

भूदानयज्ञ-आंदोलनाचे मुख्य दोन हेतू आहेत. एक भारतांतील भूसमस्या सोडविण्यास मदत करणें व दुसरा, नवसमाजरचनेचा पाया घालणें. यांपैकीं भूसमस्या सोडविण्याच्या बाबतींत भूदान-आंदोलन कितपत यशस्वी होऊं शकेल याचें बरेंचसें उत्तर त्या आंदोलनानें आतांपर्यंत दिलेलें आहे. त्या उत्तराचें ओझरतें समालोचन करून भूदान-आंदोलनाच्या नवसमाजनिर्मिति करण्याच्या प्रतिज्ञेचा अधिक विचार या लेखांत करावयाचा आहे.

## भूदान-आंदोलनाची भूमिका

भूदानाची आजवर स्पष्ट होत आलेली भूमिका अशी आहे :

(१) 'सबै भूमि गोपालकी' हें भूदानाचें घोषवाक्य आहे.

(२) दान मागणें म्हणजे लाचार भीक मागणें नव्हे. 'दानं संविभागः' या सूत्राचा तो आचार आहे.

(३) दान श्रीमंतांनींच द्यावयाचें असें नाहीं. गरीबांनींहि या यज्ञांत आपला हविर्भाग दिला पाहिजे. श्रीमंतांना लाजविण्यासाठींच म्हणून केवळ नव्हे तर आपलें कर्तव्य म्हणूनहि.

(४) भूदानांत मिळालेल्या जमिनीच्या पुनर्वितरणांत जमिनीचे लहान लहान तुकडे झाले तरी चालतील. 'जमिनीचे तुकडे होण्यापेक्षां भूदान यशस्वी झालें नाहीं तर हृदयाचे तुकडे होतील याची मला भीति वाटते. पुन्हां एकत्र शिवण्यासाठींच कापडाचे हे तुकडे केले जात आहेत' –विनोबा.

(५) लहान तुकड्यांमुळें उत्पादनांत घट येईलच असें नाहीं. शेतीचा प्रत्यक्ष अनुभवहि तसाच आहे. 'लहानशा तुकड्यांतहि भरपूर मशागत केली तर पुरेसें उत्पादन होऊं शकतें हें माझें म्हणणें नियोजन-मंडळाला पटलें' (विनोबाजी, चांडिल-भाषणांतून.)

(६) भूदान भूसमस्या सोडविण्यासाठीं योग्य ते कायदे करण्याच्या आड येत नाहीं. त्या कायद्यासाठीं तें अडूनहि बसत नाहीं. योग्य तें वातावरण निर्माण झाल्याखेरीज केवळ कागदोंपत्रीं कायदा करणें व्यर्थ असतें. कायद्यांच्यासाठीं आवश्यक तें वातावरण निर्माण करण्याचें कार्य भूदानामुळें आपोआपच होत असतें.

(७) भूदानाला शेवटीं सहकारी शेतीच अभिप्रेत आहे. परंतु आज सध्यांतरी शेती सुरूं करणें व्यावहारिक अडचणीमुळें शक्य नाहीं. परंतु क्रमाक्रमानें त्याच दिशेनें पाउलें टाकावयाचीं आहेत.

(८) श्रमदान, संपत्तिदान, जीवनदान हीं याच आंदोलनाचीं स्वाभाविक इतर अंगें आहेत.

(९) भूदान-आंदोलन अयशस्वी झालें तर सत्याग्रह केला जाईल कीं नाहीं, सत्याग्रह केल्यास त्याचें स्वरूप काय राहील याविषयीं आजच निश्चित असें कांहीं सांगतां येणार नाहीं.

भूदानांत आजवर सुमारें ३६ लक्ष एकरांवर जमीन दान मिळाली आहे. या जमिनीची प्रतवारी माहीत नसली, व सुमारें ३४ लक्ष एकर जमिनीचें पुनर्वितरणाचें प्रचंड कार्य अद्याप पुरें व्हावयाचें असलें तरी या आंदोलनानें आजवर मिळविलेलें यश हें भव्य असेंच आहे हें मान्य करावयास हवें. वातावरणनिर्मितीचें कार्य तर आंदोलनानें निश्चितपणें पार पाडलें आहे व आंदोलनाचा वेग आज मंदावल्यासारखा दिसत असला तरी तें पुन्हां केव्हां अचानक गति घेईल तें सांगतां येणार नाहीं.

## साम्ययोगाचें ध्येय

भूसमस्या सोडविण्याच्या दृष्टीनें ही प्रगति समाधानकारक आहे. परंतु भूसमस्या सोडविणें एवढेंच विनोबाजींचें ध्येय नाहीं. त्यांना एक नवसमाज निर्माण करावयाचा आहे. भूदान-आंदोलन हें केवळ त्या नवसमाजाला पायाभूत आहे. गया-संमेलनांत जयप्रकाशजींना विनोबाजींनीं पाठविलेल्या त्या अमर








जीवनदानपत्रांत विनोबाजींनीं आपल्या नेहमींच्या रेखीव स्पष्ट शैलींत मोजक्या शब्दांत आपलें जीवनध्येय सांगितलें आहे. विनोबाजी लिहितात :

श्री जयप्रकाश

कल आपनें जो आवाहन किया था, उसके जबाब में–

भूदान-यज्ञ-मूलक ग्रामोद्योगप्रधान अहिंसक क्रान्ति के लिये मेरा जीवन समर्पण।

सर्वोदयपुरी २०–४–५४. – विनोबा

भूदान-आंदोलनाचा केवळ भूसमस्या सोडविण्याच्या दृष्टीनें विचार करणाऱ्या लोकांनीं 'भूदान-यज्ञ-मूलक ग्रामोद्योग-प्रधान अहिंसक क्रांतिके लिए' या प्रतिज्ञेचा अन्वयार्थ आपल्याला कितपत मान्य होतो, मानवतो हें पहावयास हवें.

वेगळ्या शब्दांत सांगावयाचें तर विनोबाजींना इष्ट असलेलें नवसमाजदर्शन साम्ययोगाचें आहे. साम्ययोग हा विनोबाजींचाच शब्द आहे. साम्यवाद व समाजवाद यांहून आपल्या कल्पनेचा निराळेपणा स्पष्ट करण्यासाठीं 'साम्ययोग' या संज्ञेची योजना विनोबाजी करतात. साम्ययोगाची विशेषता विनोबाजींच्याच शब्दांत पुढीलप्रमाणें सांगता येईल:

" भूदान-यज्ञामागें असलेल्या मूळ विचारास मी 'साम्ययोग' म्हणत असतों. नव्या समाजाची स्थापना याच साम्ययोगाच्या आधारें करावयाची आहे. सर्व माणसांत एकच आत्मा समानरूपांत आहे असें साम्ययोग मानतो. मानवी आत्म्यांत व प्राणिमात्राच्या आत्म्यांतहि कांहीं मूलभेद आहे असें साम्ययोग मानीत नाहीं. आपल्या जीवनसंपदेचे– मग ती संपत्ति तन-मन-धन-बुद्धि कोणत्याही प्रकारची असो – मालक आपण नाहीं, परमेश्वर आहे; आपण केवळ विश्वस्त आहोंत असें साम्ययोगाचें सांगणें आहे. साऱ्या समाजालाच आपला स्वार्थ अर्पण करणें आणि समाजहितासाठीं प्रयत्न करण्यांतच स्वतःचें हित पाहणें ही नैतिक विशेषता साम्ययोगांतूनच निर्माण होऊं शकते. सर्व प्रकारच्या श्रमांचें मूल्य सारखेंच समजलें गेलें पाहिजे. साम्ययोग सर्वांना विकासाची समान संधि मिळाली पाहिजे असें मानतो. अशी संधि मिळाल्यावर ज्याची जशी योग्यता असेल त्या धंद्यांत तो काम करील. साम्ययोगी अर्थव्यवस्थेंत खेडेगांव संपूर्ण स्वावलंबी बनेल. अन्नवस्त्रादि प्राथमिक गरजेच्या सर्व वस्तू गांवांतच निर्माण केल्या जातील" [ अ. भा. सर्व–सेवा–संघाच्या सेवाग्राम येथील बैठकींतहि ( २५ ते २८ नोव्हेंबर १९५४) ग्रामनिर्माणाच्या स्वरूपाविषयीं असाच स्पष्ट निर्णय घेण्यांत आला. 'अन्न-वस्त्र के बारे में ग्रामस्वावलंबनकी दृष्टीसे उत्पादन हो, अर्थात् फसल–नियोजन ( क्रॉपप्लानिंग ) हो। सब प्रकारके श्रमके समान–मूल्य के सिद्धांत को उत्तरोत्तर अपनाना होगा।' ] "राजनैतिक क्षेत्रांतहि साम्ययोग परिवर्तन करूं पाहतो. साम्ययोगास केवळ शोषणहीन नव्हे तर शासनहीन समाज स्थापन करावयाचा आहे. गांवागांवांत राज्यसत्ता वांटली जाईल. गांवाचेंच राज्य गांवांत असेल व मध्यवर्ती सत्ता नाममात्र राहील आणि हळूहळू कालांतरानें शासन-रहित समाज निर्माण होईल. या क्रान्तींतील भूदान ही एक पाचर आहे. आणखी पुढें जाऊन आम्ही असेंहि म्हणतों कीं पृथ्वीमाता ही सारीच्या सारी पूर्ण मुक्त आहे. ज्याला जेथें राहून सेवा करावयाची असेल तेथें त्यास राहतां आलें पाहिजे. हिंदी लोक हिन्दुस्थानचे मालक, जर्मन जर्मनीचे स्वामी ही दृष्टीच चूक आहे. आपण तर साऱ्या जगाचे नागरिक आहोंत. साम्ययोगाची अशी व्यापक दृष्टि आहे."– ( ' भूदान–यज्ञ शंकासमाधान-महाराष्ट्र-भूदान-यज्ञ–समिति-प्रकाशन )

आध्यात्मिक अधिष्ठान, विश्वस्तवृत्ति, अहिंसक आचार, ग्रामीण स्वयंपूर्णता, सत्तेचें विकेन्द्रीकरण, अपक्ष राजकारण ( सज्जन व दुर्जन हेच केवळ दोन पक्ष ), व विश्वबंधुता हीं थोडक्यांत साम्ययोगाचीं








वैशिष्ट्यें म्हणून सांगतां येतील.

यानंतर पुढील प्रश्न उभे राहतात :

(१) साम्ययोग भारताला अभिप्रेत आहे काय ? असावा काय ? (२) भूदान व साम्ययोग यांचा अटळ संबंध आहे काय ? ( ३ ) साम्ययोगाविषयींची आपली भूमिका भारतानें आजच निश्चित करणें आवश्यक आहे काय ?

या तीनहि प्रश्नांचा आतां क्रमाक्रमानें विचार करूं.

## साम्ययोग आणि भारताचें आजचें ध्येय

भारताचें आजचें ध्येय थोडक्यांत पुढीलप्रमाणें सांगतां येईल: (१) भारतांत लोकशाही दृढमूल करणें. (२) भारतांत आर्थिक समता प्रस्थापित करणें. (३) भारताचे आन्तरराष्ट्रीय प्रश्न शांततेच्या मार्गानें सोडविणें. त्याचप्रमाणें जागतिक संघर्षांत कोणताहि पक्ष न स्वीकारतां जागतिक शांतीविषयीं प्रयत्नशील राहणें.

हें त्रिविध ध्येय साध्य करतांना भारताला ज्या एका गोष्टीचें सतत अवधान ठेवलें पाहिजे ती गोष्ट म्हणजे वाढत्या लोकसंख्येला सतत वाढतें जीवनमान उपलब्ध करून देण्याची आवश्यकता ही होय. यांतून सहजपणेंच दोन पर्याय निघतात. एक, लोकसंख्येची वाढ कमी करणें किंवा थांबविणें व उत्पादनांत ज्या मार्गानीं झपाट्यानें वाढ होणें शक्य असेल ते मार्ग अवलंबिणें. जीवनमानांतील वाढ ज्या '–वादां'त किंवा '–योगां'त प्रामुख्यानें साधली जात नाहींत त्या '–वादा'विषयीं किंवा '–योगा'विषयीं बहुसंख्य भारतीय जनतेला आत्मीयता वाटणें शक्य नाहीं.

साम्ययोगांतील कांहीं तत्त्वें साम्यवाद व समाजवाद यांनाहि अन्तिम ध्येय म्हणून मान्य आहेत. आर्थिक समता प्रस्थापित व्हावी, प्रत्येकानें आपल्या शक्तीप्रमाणें काम करावें व गरजेप्रमाणें वेतन घ्यावें ('from each according to his ability, to each according to his needs') राज्यसत्तेचा निरास व्हावा ('withering away of the state'), वर्गविहीन समाजरचना असावी, आन्तरराष्ट्रीय समतेचेंहि 'सूत उवाच' व्हावें – या गोष्टी साम्यवाद व समाजवाद या दोहोंनाहि हव्याश्या आहेत. या तत्त्वांच्या उद्घोषांत साम्ययोगाची विशेषता मानावयाचें कारण नाहीं. साम्ययोगाचा विशेष मुख्यत्वेंकरून एकाच गोष्टींत सांगता येईल. तो म्हणजे साम्ययोग बाह्य क्रान्तीपेक्षां आन्तरिक क्रान्तीला महत्त्व देतो; व आन्तरिक क्रान्ति स्नेहाच्या, प्रेमाच्या प्रेरणेनें घडवून आणण्याची त्याची प्रतिज्ञा आहे.

परंतु भारतांतील साम्यवादी सोडले तर प्रजा-समाजवादी जवळजवळ हीच गोष्ट मान्य करीत नाहींत काय ? अहिंसक साधनें वापरणें व लोकशाही मार्गाचा आग्रह धरणें यांतच आन्तरिक क्रान्तीविषयींचा प्रयत्न समाविष्ट आहे. इंग्लंडमधील समाजवादी याच दृष्टीनें प्रयत्नशील नाहींत काय ? परंतु विनोबाजींचें, ( त्यांच्या साम्ययोगाचें ) एवढ्यानें समाधान नाहीं. डिसेंबर १९५४ च्या 'सर्वोदया'च्या अंकांत विनोबाजी लिहितात :

" आज जगांत जो समाजवाद आहे तो कायद्यावर अधिष्ठित आहे. आम्हाला जर क्रान्तिकारक समाजवाद हवा असेल, अहिंसा आणि सहकार यांच्या आधारावर जर आम्हाला आपल्या समाजाची उभारणी करावयाची असेल व भारताचें वैशिष्ट्य जर त्या समाजवादांतून प्रकट व्हावें अशी आपली इच्छा असेल तर प्रत्येक व्यक्तीनें आपली शक्ति स्वेच्छेनें समाजाला अर्पण केली पाहिजे.... आम्हाला असा समाज हवा आहे कीं ज्यांत प्रत्येक घर प्रत्येकाला आपलेसें वाटेल. जिथें भूक लागेल तेथें जवळच्या घरांत जाऊन अन्न मागून कुणीहि आपली भूक भागवूं शकेल व काम पडेल तर कोणाला वाटच्या वाटसरूलाहि साहाय्यासाठीं हांक



अनुक्रमणिका






मारतां येईल. प्रत्येक घर हरएकाचें, प्रत्येक भाऊ हरएकाचा. हाच समाजवाद आहे. कोणतें सरकार हा समाजवाद कृतींत आणूं शकेल ? इंग्लंडमधील समाजवाद्यांच्याकडे पहा. त्यांच्यांत आणि कान्झर्व्हे-टिव्ह पक्षांत कोणता फरक आहे ? दोन्हींहि सत्ता-परायणच तर आहेत ना ? ... मूल्यांत परिवर्तन होईल तेव्हांच समाजवादाची स्थापना होऊं शकेल". विनोबाजींची समाजवादाची ही कल्पना रमणीय खरी परंतु तिला शास्त्रीयतेची धार दिसत नाहीं असें नम्रपणें म्हणावसें वाटतें.

## आन्तरिक क्रान्तीच्या मर्यादा

समाजपरिवर्तनाच्या दृष्टीनें बाह्य क्रान्तीच्या मर्यादाप्रमाणेंच आन्तरिक क्रान्तीच्याहि मर्यादा असतात. समाज हा इहपर असतो. ऐहिक अभ्यु-दयाची शक्यता ही कोणत्याहि कार्यक्रमाविषयीं समा-जाच्या मनासमोर असणारी महत्त्वाची कसोटी असते. कांहीं कार्यक्रम समाजमनांतील चांगल्या भागाला आवाहन करणारे असतात, कांहीं वाईट. त्या त्या मार्गानें गेलें असतां समाजाचें कल्याण किंवा अकल्याण होत असतें. लोकशाही मार्गानेंच क्रांती-चा प्रयत्न करतां येतो, हिंसक मार्गानींहि करतां येतो. एकूण परिस्थितीच्या अनुरोधानें फलप्राप्तीच्या अपेक्षेचा विचार करून सद्यःफलदायी मार्ग जनता अनुसरते. समाजमनाची घडण एका विशेष प्रका-रची असल्यामुळें एक विशिष्ट प्रकारचा कार्यक्रम निवडला जातो असें नव्हे किंवा त्या त्या कार्य-क्रमाच्या आचारानंतरहि समाजमनाची मूळ बैठक विशेष बदलली जाते असेंहि नव्हे. हिंसक आचारां-तून हिंसेवर अधिष्ठित संस्थाजीवन निर्माण होतें व समाजाचा अधःपात होत जाण्याचा संभव असतो व अहिंसक साधनांचा वापर केला असतां अनुकूल वातावरण-निर्मिति होऊन त्यांतून समाजाची प्रगति होणें शक्य असतें इतकेंच. कोणत्याहि कार्यक्रमानें समाजमन बदलत नाहीं, संस्थाजीवन बदलतें व त्या-मुळें समाजजीवनांत बदल होतो. व्यक्ती-व्यक्तीच्या आन्तरिक क्रांतीवर संपूर्ण भर देणाऱ्यांनीं ही मर्यादा लक्षांत घ्यावयास हवी.

भूदानाच्या पूर्वींहि भारतांत या सत्याचा प्रत्यय एकदां आलेला आहे. गांधीजींचा अहिंसेबद्दलचा आग्रह हा जीवनाच्या सर्व अंग-उपांगांना व्यापून टाकणारा होता. त्यांचें संपूर्ण जीवनदर्शनच त्यावर अधिष्ठित होतें. परंतु भारतानें त्यांच्या अहिंसा तत्त्वाचा वापर एका विशिष्ट परिस्थितींत एका विशिष्ट काळा-पुरता केला. राजकीय स्वातंत्र्य ही भारतीय जन-मनाची उत्कट आकांक्षा होती. या आकांक्षेला ब्रिटिश सरकारचा प्रतिकार केल्याचें समाधान सामु-दायिक सत्याग्रहांतूनच मिळण्यासारखें होतें. सत्या-ग्रहानें जनजागृति झाली. आन्तरराष्ट्रीय परिस्थिति व ही जनजागृति यांच्या दुहेरी दडपणामुळें ब्रिटि-शांना भारताला स्वातंत्र्य द्यावें लागलें. हें सर्व साध्य झालें तरी भारतीय जनमनाची घडण बदलली असें आपल्याला म्हणतां येईल काय ? आपापल्या श्रद्धे-प्रमाणें याचें कोणी 'होय' असेंहि उत्तर देतील याची मला जाणीव आहे. परंतु श्रद्धेशीं वाद कोण घालूं शकेल ?

आजचें भूदान साम्ययोगाच्या आग्रहाच्या बाब-तींत याच पूर्वीच्या चाकोरींतून फिरत आहे असें वाटतें. गांधीजींचाच आध्यात्मिक वारसा विनो-बाजींच्याकडे आलेला असल्यामुळें त्यांत आश्चर्य वाटण्याचेंहि कारण नाहीं. भूदान-यज्ञाला आजवर मिळालेल्या यशाला विनोबाजींचें व्यक्तिमत्त्व हें जसें कारणीभूत आहे, त्याचप्रमाणें भारतांतील आजची विशिष्ट राजकीय व आर्थिक परिस्थितीहि कारणी-भूत आहे. कालाचें दडपण समतेच्या दिशेनें आहे व कोंडलेल्या वाफेला भूदानाचा 'सेफ्टी-व्हाल्व' मिळाला आहे. स्फोटापेक्षां ही स्थिति कितीतरी पटींनीं स्पृहणीय आहे. परंतु हृदयपरिवर्तनाचा यांत फारच थोडा भाग आहे. यामुळेंच हृदयपरिवर्तनच्या








आधारावर साम्ययोगाची प्रस्थापना कशी होऊं शकेल याविषयीं शंका वाटते.

साम्ययोगाच्या आध्यात्मिक अधिष्ठानाविषयीं जनता उदासीन आहे. भूदानानें जमिनीचा प्रश्न कांहीं प्रमाणांत सुटत आहे, तोंवर जनतेचा भूदानाला पाठिंबा राहील. परंतु भूदानाच्या पायावर उभारलेल्या साम्ययोगाविषयीं जनतेला आस्था नाहीं. जनतेच्या हातीं अर्थसत्ता देण्याला विलंब करणाऱ्या विश्वस्तवृत्तीविषयीं तिला विश्वास नाहीं. ग्रामोद्योग व ग्रामीण स्वयंपूर्णता या गोष्टी अंतिम ध्येयें म्हणून स्वीकाराव्यात हेंहि जनतेला रुचणारें नाहीं. ग्रामीण स्वयंपूर्णतेचा आग्रह धरण्याचें कोणतेंच कारण नाहीं. ग्रामोद्योगांना भारताच्या आजच्या अर्थव्यवस्थेंत एक विशिष्ट स्थान आहे ही गोष्ट खरी. परंतु ध्येय म्हणून त्यांना कायमचें निश्चित स्थान देणें संपूर्ण आर्थिक विकासाला मारक होईल.

भारताच्या भवितव्याच्या दृष्टीनें दोन महत्त्वाचे प्रश्न भारतापुढें आज उभे आहेत : ( १ ) लोकशाही व समाजवाद यांचा समन्वय कसा करावा ? ( २ ) मोठे उद्योगधंदे व ग्रामोद्योग यांचा व्यावहारिक समतोल राखून देशाचा झपाट्यानें आर्थिक विकास कसा साधावा ? — या दुसऱ्या प्रश्नाचा तपशीलवार विचार करण्याचें केवढें तरी मोठें क्षेत्र भारतांतील विचारवंतांच्या पुढें आहे. नुसत्या तात्त्विक विवेचनानें किंवा केवळ मोठे उद्योग किंवा केवळ ग्रामोद्योग यांचे पक्षपाती होऊन हा प्रश्न सुटण्यासारखा नाहीं.

गांधीजींचें संपूर्ण जीवनदर्शन स्वीकारल्याशिवाय ज्याप्रमाणें भारतानें सत्याग्रहाचा आचार केला, त्याचप्रमाणें साम्ययोगाविषयीं आस्था नसतांनाहि भारत भूदान-यज्ञाविषयीं आपुलकी दाखवील. यांत गांधीजींशीं किंवा विनोबाजींशीं प्रतारणा करण्याचा भारताचा हेतु नव्हता व नाहीं. जनता आपल्याला रुचतें व पचतें तेवढ्याचाच स्वीकार करते एवढाच त्याचा अर्थ आहे. सत्याग्रहाबरोबर संपूर्ण गांधीवाद अटळपणें स्वीकारलाच पाहिजे असें जनतेनें कधीं मानलें नाहीं. भूदान व साम्ययोग यांच्याबाबतींतहि जनता तसें मानीत नाहीं.

### भूदान आणि नियोजन

आपल्या ऐहिक उत्कर्षाविषयींचा एक स्वतंत्र निर्णय भारतीय जनतेनें घेतलेला आहे. योजनाबद्ध विकास हें त्या निर्णयाचें स्वरूप होय. भूदानाचें कार्य स्वतंत्रपणें चालू राहील, नियोजन स्वतंत्रपणें केलें जाईल, अशा विलगतेच्या भूमिकेवरून आज दोघांचेंहि कार्य चालू आहे. नियोजनमंडळ भूदानाच्या चळवळीचा उल्लेख करते व भूहीनांना जमीन मिळवून देण्यासाठी भूदान-आंदोलनाचा हवालाहि देते ही गोष्ट खरी. परंतु यापलीकडे त्या दोहोंच्या कार्यक्रमांत, कार्यपद्धतींत किंवा अन्तिम ध्येयांत साम्य नाहीं. अशा परिस्थितींत भूदान व नियोजन यांचा प्रत्यक्ष विरोध येत नाहीं. याचीं कारणें अशीं :

(१) विनोबाजींचें व्यक्तिमत्त्व व गांधीजींचे आध्यात्मिक वारस म्हणून त्यांचें भारतीय जीवनांतील स्थान. (२) जमिनीचे तुकडे पडण्याबाबत सरकारनें घेतलेली तडजोडीची भूमिका. ( ३ ) भूदानाचें यशापयश त्या क्षेत्रापुरतेंच मर्यादित राहील ही अपेक्षा. (४) भूदान-कार्यकर्त्यांची नियोजनाच्या कार्यवाहीविषयीं सहिष्णु सहकारी भूमिका. ( ५ ) साम्यवादाच्या प्रसाराला भूदान-आंदोलनानें घातलेला पायबंद. ( ६ ) आजचें नियोजन एका विशिष्ट पद्धतीनें चाललें तरच पुढें साम्ययोगी समाजरचना अस्तित्वांत येऊं शकेल असा आग्रह भूदान-कार्यकर्त्यांच्या मनांत नाहीं. आज जेवढें चांगलें घडेल तें आपल्याला उपयोगींच होईल असा त्यांचा विश्वास आहे. ( ७ ) तपशीलवार साम्ययोगी योजनेचा अभाव. अशा योजनेच्या अभावीं वाटणारी अस्वस्थता डिसेंबर १९५४ च्या 'सर्वोदय' मासिकाच्या अंकांत डॉ. दरबारीलाल अस्थाना यांनीं व्यक्त










केली आहे. ते लिहितात : " आज आमचे नेते व कार्यकर्ते आपापल्या मनाप्रमाणें व आवडीप्रमाणें सर्वोदयाच्या वेगवेगळ्या बाजूंवर कमीअधिक जोर देत असतात. यामुळें वेगवेगळ्या गोष्टींच्या महत्त्वाच्या तरतमभावाविषयींहि मनांत संदेह निर्माण होतो. सर्वोदयी राज्यव्यवस्थेंत कोणत्या राजकीय किंवा आर्थिक विभागांचें केन्द्रीकरण वा विकेन्द्रीकरण होईल हें आज आम्हाला निश्चित स्वरूपांत सांगतां येत नाहीं. ग्राम-राज्य, ग्रामीण राज्यव्यवस्था व ग्रामीण अर्थव्यवस्था यांचें नेमकें स्वरूप काय असेल हें आम्हाला माहीत नाही. ग्रामपंचायत कशी असेल ? दुसऱ्या पंचायतीशीं तिचे व्यवहार कोणत्या तत्वानुसार होतील ? फौज किंवा पोलीस व्यवस्थेची मर्यादा काय राहील ? आन्तरराष्ट्रीय व्यवहार कोणत्या तत्त्वावर चालेल ? शिक्षणाची व्यवस्था काय ? कर कोणत्या पद्धतीनें लादले जातील व वसूल केले जातील ? यंत्रें व वीज यांचा किती प्रमाणांत उपयोग केला जाईल ? – अशा प्रश्नांचा नवीन परिस्थिति विचारांत घेऊन शास्त्रशुद्ध विचार करण्याची आवश्यकता आहे. "

याप्रमाणें नवीन परिस्थिति लक्षांत घेऊन शास्त्रशुद्ध विचार करतांना सर्वोदयवादी एकान्तिक ध्येयवादी भूमिकेवरून व्यावहारिक भूमिकेवर कदाचित् येतीलहि. आपल्या भूमिकेचा कडवा आग्रह त्यांनीं धरल्यास आजच्या नियोजनाशीं आपला असणारा विरोध हा अधिक मूलभूत स्वरूपाचा आहे हें ओळखून नियोजनासंबंधीं तशी भूमिका त्यांना घ्यावी लागेल. हा विरोध खालील बाबतींत यावा :

(१) अर्थसत्तेचें व राज्यसत्तेचें केन्द्रीकरण– आजचें नियोजन अशा केन्द्रीकरणाच्या अनुरोधानेंच चालूं आहे. ( २ ) लोकसंख्या-संततिनियमनांच्या प्रचार व प्रसार करावा काय ? गांधीजी व विनोबाजी यांची ब्रह्मचर्याविषयींची भूमिका संततिनियमनाच्या साधनांच्या प्रचार-प्रसाराला अनुकूल नाहीं. (३) मोठे उद्योगधंदे. ते असावेत कीं नाहीं ? आज अस्तित्वांत असलेल्या मोठ्या उद्योगधंद्यांचें काय करावें ? (४) ग्रामीण स्वयंपूर्णता. नियोजनमंडळाला ती इष्ट वाटेल असें नाहीं. (५) सर्वांना पुरेसें काम-भारताच्या घटनेंत जीं निर्देशक तत्त्वे (Directive Principles) आहेत त्यांत काम मिळणें हा प्रत्येकाचा हक्क आहे हें तत्त्व मान्य करण्यांत आलें आहे. आजच्या परिस्थितींत नियोजनमंडळाला तें शक्य वाटत नाहीं. ग्रामोद्योगाचा आग्रह धरल्यास तें आजहि शक्य होऊं शकेल अशी सर्वोदयाची भूमिका आहे.

(६) ग्रामोद्योग. सर्वांना पुरेसें काम, अल्प जीवनवेतन ( कारण उत्पादन कमी ), व आर्थिक प्रगतीची अशक्यता हीं स्वीकारावींत कीं कांहीं काळ अनिश्चितता पत्करून मोठे उद्योगधंदे वाढवून उद्यांच्या आर्थिक प्रगतीचा पाया घालावा याबाबत विरोध. ( ७ ) सैन्यावर खर्च. अहिंसेविषयींच्या कल्पना. ( ८ ) परकीय भांडवलाविषयींचीं मतें. ( ९ ) शिक्षणाची दिशा. ( १० ) सर्वोदयाचा आध्यात्मिक अधिष्ठानाकडील कल व नियोजनमंडळाची निर्भेळ व्यावहारिक भूमिका. – अशा अनेक कारणांनीं सर्वोदयी ( किंवा साम्ययोगी ) योजनेचा आजच्या योजनेशीं विरोध येऊं शकेल.

आपल्या नियोजनाच्या व घटनेच्याहि पुढें जाऊन भूदानानें एक गोष्ट साध्य केलेली आहे हें मात्र मान्य करावयास हवें. मोबदला न देण्याचें अहिंसक तंत्र आचरणांत आणून खाजगी मालमत्तेच्या कल्पनेलाच भूदान-यज्ञ-आंदोलनानें धक्का दिलेला आहे. जुन्या अर्थव्यवस्थेच्या मर्मस्थानीं दिलेला हा घाव आहे.












श्री. नारायण गणेश गोरे

# यंत्रयुगांतलें विकेंद्रीकरण

विकेंद्रित अर्थव्यवस्थेसंबंधी आपण जेव्हां बोलतों त्यावेळीं आपले विचार फारसे स्पष्ट असतात असें वाटत नाहीं. म्हणून त्यासंबंधीं कांहीं प्रश्नांचा विचार यथ करण्याचें योजिलें आहे.

## एक भावनात्मक चित्र !

अर्थव्यवस्थेचें विकेन्द्रीकरण करण्याचा विषय निघाला कीं एकीकडे लाखों चात्या व हजारों माग जिच्यांत अहोरात्र चालत आहेत अशी धूर ओकणारी गिरणी एका बाजूला आणि मोडक्याशा खोपटांत बसून दिवसभर चरखा फिरवीत बसणारी सुरकुतलेली म्हातारी व खालच्या मानेनें हातमाग चालवीत बसलेला साळी दुसऱ्या बाजूला – अशासारखें कांहींसें भावनात्मक चित्र आपल्या डोळ्यांसमोर उभें राहातें. गिरणीमुळें सुताच्या व कापडाच्या उत्पादनाचें केंद्रीकरण झालें आणि त्यामुळें त्या बिचाऱ्यांची अशी दुर्दशा झाली अस गणित मांडून गिरणी बंद केल्यास यांना पुनरपि चांगले दिवस यतील असा उपसिद्धान्तहि आपण बसवतों. आपल्यापैकीं कांहीं जणांचे विचार तर चरख्यापाशींहि थांबत नाहींत. वस्त्रपूर्णा तकली व अन्नपूर्णा कुदळ यांच्यापर्यंत ते जाऊन पोंचतात आणि केवळ गांवच नव्हे तर व्यक्तिमात्र स्वयंपूर्ण झालें पाहिजे असें ते प्रतिपादन करतात.

पण पूर्णतया स्वावलंबी व्यक्ति अथवा स्वावलंबी गांव कोठेंच अस्तित्वांत राहिलेलें दिसत नाहींत. उलट, व्यक्ति व मानवसमूह अधिकाधिकच अन्योन्यावलंबी बनत चालल्याचें दिसून येतें. वादासाठीं क्षणभर असेंहि जरी धरून चाललें कीं, वस्त्र आणि अन्न यांच्या बाबतींत कांहीं मूठभर व्यक्तींना स्वावलंबी होणें शक्य आहे तरी अन्नवस्त्राच्या व्यतिरिक्त त्यांच्या ज्या इतर गरजा आहेत, उदा० वृत्तपत्रें, पुस्तकें, औषधें, वाहनें इत्यादि, – त्यांच्या बाबतींत तर त्या कधींहि स्वावलंबी बनणें शक्य दिसत नाहीं. याचाच अर्थ असा कीं विकेंद्रीकरण शक्य म्हटलें तरी तें फारच मर्यादित अर्थानें शक्य आहे.

विकेंद्रित अर्थव्यवस्थेमध्यें ज्याप्रमाणें केवळ कापड अथवा अन्न यांचा विचार केल्यास अव्याप्तीचा दोष निर्माण होईल, त्याचप्रमाणें केवळ उत्पादनाचाच विचार करून उत्पादित वस्तूंचा विनिमय, दळणवळणाची व्यवस्था, बाजारपेठा इत्यादि गोष्टींचा विचार वगळल्यासहि अतिव्याप्तीचा दोष निर्माण होईल. गेल्या एका शतकामध्यें जगभर ज्या घटना यंत्रयुगावतारानें घडवून आणल्या त्यांत केवळ उत्पादनसाधनांचाच कायापालट झालेला नसून दळणवळण, बाजारपेठा, भांडवलाची उभारणी ह्या सर्वांचाच कायापालट झालेला आहे.

## आपणास कोणतें जीवन अभिप्रेत ?

माझ्या मतानें विकेंद्रित अर्थव्यवस्थेचा आराखडा तयार करण्यास बसण्यापूर्वी कोणत्या दर्जाचें व्यक्तिजीवन, समाजजीवन व राष्ट्रजीवन आपणांस अभिप्रेत आहे त्याचा विचार व्हावयास हवा. भारत हें ३५ कोटींचें एक राष्ट्र आहे ही संवेदना सतत जागृत राहावी, हें अवघें राष्ट्रच एका पातळीवरून दुसऱ्या पातळीवर उचललें जावें अशी जर इच्छा असेल, तर आगगाड्या, मोटरी, आगबोटी, विमानें, वृत्तपत्रें, टपाल, आकाशवाणी आदिकरून राष्ट्राची एकजीवता शक्य ठरवणारीं व ती प्रतिक्षणीं प्रत्ययास आणून देणारीं जीं साधनें आहेत तीं आपणांस गृहीत धरावीं लागतील. हीं साधनें वगळल्यास अखिलभारतीय संवेदनाच नष्ट होईल अशी धास्ती आहे. व्यक्तीचा विचार करूं लागल्यावर भारतामधील प्रत्येक व्यक्तीला रहावयास पुरेशी जागा, पोटभर अन्न, अंगभर वस्त्र, शिक्षण, व्यवसाय, औषधोपचार, करमणूक व संस्कृति एवढ्यातरी गोष्टी मिळाल्याच पाहिजेत असा जर आपला आग्रह असेल तर यंत्रयुगापूर्वीच्या साधनांनीं आपणांला वरील प्रकारचें जीवन भारतांतील हरेक व्यक्तीला उपलब्ध करून देतां येणार नाहीं.

यंत्रयुगापूर्वींच्या जीवनाचें जें चित्र रंगविण्यांत येत असतें तें अतिरंजित व एकतर्फी असतें हें विसरून चालणार नाहीं. खेड्यांतील जीवनाचे कितीहि गोडवे गाइले तरी शहरी जीवनांत ज्यानें एकदां प्रवेश केला तो खेड्याकडे परत वळावयास तयार होत नाहीं. खेड्यामध्यें पिठाची चक्की आली म्हणजे घरांतलीं जातीं बंद पडतात, सायकल बसावयास मिळूं लागली कीं घोडीं ठाणबंद होतात आणि नळाचें पाणी आलें कीं उत्कृष्ट व्यायाम होण्यासारखा असूनहि आडाचें पाणी न उपसतां त्यावर झांकणें बसतात – हा








नित्याचा अनुभव आहे.

सारांश, कोणी कितीहि वेदान्त सांगितला तरी यंत्र हें मानवी समाजांत यापुढें कायम झालें आहे, असेंच मानलें पाहिजे. चरखा, तकली, कुदळ हींहि यंत्रें आहेत ह्या बुद्धीनें वरील विधान केलेलें नसून वाफ, तेल किंवा वीज यांनीं चालणारीं यंत्रें वरील विधानांत गृहीत धरलेलीं आहेत. जमीन कसणें, दळणें, पाणी भरणें, लाकडें फोडणें, विणणें इत्यादि जीवधारणेला अत्यावश्यक अशीं कामें मनुष्य ज्या वेळीं अत्यंत मागसलेल्या साधनांनिशीं करीत होता तेव्हा समाजांतील सर्व व्यक्तींना व्यापक व सुखी जीवन जगणें शक्यच नव्हतें, ती शक्यता आधुनिक यंत्रांनींच उपलब्ध करून दिलेली आहे असाहि विचार येथें गृहीत आहे.

## एक जबरदस्त केन्द्रशक्ति

म्हणून विकेंद्रीकरणाचा विचार करीत असतांना, आधुनिक समाजांतलें जें अत्यंत महत्त्वाचें साधन यंत्र, त्याचें स्वरूप आपण नीट समजून घेतलें पाहिजे. तसा प्रयत्न केल्यास त्याचें स्वरूप दोन परस्परविरुद्ध प्रवृत्तींनीं बनलेलें आहे असें दिसून येतें. उदाहरणादाखल आपण आगगाडी, वृत्तपत्रें व आकाशवाणी किंवा वीज यांचा विचार करूं. आगगाड्यांच्या मार्गांचें जाळें सर्व देशभर पसरल्यामुळें देशाचा कानाकोपरासुद्धां आटोक्यांत आला; पण त्याचबरोबर आगगाड्यांच्या (तसेंच तारांच्या व बिनतारांच्या) योगानें सर्वत्र लक्ष पोचूं शकणारी एक जबरदस्त केंद्रशक्तीहि निर्माण होण्यास मदत झाली. पुण्यास रुपयास १६ शेर गहूं तर खानदेशांतील लोकांवर दुष्काळामुळें उपासमारीनें टांचा घांसून मरण्याची पाळी – अशीं दृश्यें पेशवाईच्या व तत्पूर्वींच्या सर्व ज्ञात इतिहासाच्या काळांत दिसूं शकत असत. कारण त्यावेळीं अर्थव्यवस्था विकेन्द्रित होती ! पण अर्थव्यवस्थेप्रमाणेंच त्यावेळची राज्यसत्ताहि विकेंद्रित असल्याकारणानें खानदेशांतल्या उपासमारीची जबाबदारी पुण्याच्या सरकारवर आहे असें कोणी मानीत नसे आणि पुण्याच्या दरबारालाहि खानदेशांतल्या दुष्काळाची जबाबदारी आपणांवर आहे असें वाटत नसे. परंतु आतां एकीकडे सुकाळ व दुसरीकडे दुष्काळ असें दृश्य कोठेंहि दिसणार नाहीं आणि कोणतेंहि सरकार दिसूं देणार नाहीं. कारण हा विरोध नष्ट करण्याचीं साधनें व त्याचबरोबर त्यांचा वापर करण्याची पात्रता असलेलें असें सरकार, दोन्हींहि आज अस्तित्वांत आलेलीं आहेत.

वृत्तपत्रें व आकाशवाणी यांच्यामुळें तर सबंध देश दररोज दोनदां किंवा अधिक वेळांहि ढवळून निघतोच. पण ज्यांना आमचे " पातालनिवासी बांधव " म्हणून चिपळूणकरांनीं संबोधिलें ते सुद्धां एका जाजमावर बसल्यासारखे आमच्याशीं बोलतात. कृषि, आरोग्य, बाजारपेठा, यांच्यासंबंधींची चालू क्षणापर्यंतची माहिती तसेंच नाट्य व संगीत याच्यासारखे सांस्कृतिक कार्यक्रम सर्वदूर घरपोंच करतां येतात. तथापि त्याचीच उलटी बाजू ही आहे कीं मनें अथवा मतें आपल्याला हवीं तशीं करून घेण्याची राक्षसी शक्तीहि सरकारच्या अथवा कांहीं गटांच्या त्यामुळें अंगीं येते.

## स्वामित्वसंबंध बदलण्याची जरूरी

वीज हें तर सर्वांत आधुनिकतम, सर्वांत प्रसरणक्षम पण त्याचबरोबर अधिकांत अधिक केंद्रानुकूल साधन आहे. विजेमुळें शक्तिप्रवाह शेंकडों मैल अंतरापर्यंत खेळवतां येत असल्यामुळें शहरांत आळून बसलेले व्यवसाय पसरवून टाकण्यास व नागर राहाणींतल्या सुखसोई खेडोपाडीं पोचवण्यास विजेसारखें दुसरें साधन आज तरी उपलब्ध नाहीं. समपातळ सार्वत्रिक विकास ही लोकशाहीची एक शर्त मानली तर ती पुरी करण्याचें सामर्थ्य विजेंतच आहे. पण वीजनिर्मितीचीं केंद्रें देशांत हाताच्या बोटांवर मोजण्याइतकींच असणार. यंत्राधिष्ठित अर्थव्यवस्थेमधल्या प्रसरणशील व केंद्रशील अशा ह्या विरोधी प्रवृत्तींचीं अनेक उदाहरणें, केवळ उत्पादनाच्याच नव्हे तर इतरहि क्षेत्रांतून देतां येतील. पण तसें करण्याची जरूरी नाहीं. एवंगुणविशिष्ट यंत्र हें समाजजीवनाचें अविभाज्य व आवश्यक अंग आहे हें लक्षांत घेतल्यास विकेंद्रीकरणाच्या आपल्या कल्पनांना बऱ्याच मर्यादा घालाव्या लागतील आणि केंद्रीकरणाचे सामाजिक दुष्परिणाम टाळावयाचे असतील तर साधनापेक्षां प्रचलित स्वामित्वविषयक संबंध व शासनविषयक कल्पना बदलण्यावर विशेष जोर द्यावा लागेल असें वाटतें.








श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे

# सर्वोदयाचा आर्थिक कार्यक्रम व भूदान

सर्वोदयाच्या द्वारें शासन-मुक्त व शोषणविहीन समाजाची कल्पना आज लोकांपुढें मांडली जाते व त्याची पहिली पायरी म्हणून केन्द्रित राजकीय सत्तेचें ग्रामराज्यांत रूपांतर झालें पाहिजे, स्वयं-शासित अशीं ग्रामराज्यें हे राजकीय सत्तेचे आधार-भूत घटक बनले पाहिजेत, व ते जसे स्वयंशासित त्याचप्रमाणें आर्थिक दृष्टीनें स्वयंपूर्ण असावेत अशी आमची अपेक्षा आहे. त्या दृष्टीनें सर्वोदयाचा आर्थिक कार्यक्रम काय राहील, त्याचा तपशील काय असेल, तो क्रमाक्रमानें कसा अमलांत आणला जाऊं शकेल व अशा आर्थिक कार्यक्रमाला भूदानाची काय मदत होईल याचा विचार या लेखांत करावयाचा आहे.

## आजचा बेकारीचा गंभीर प्रश्न

आज भारतांत राजकीय सत्तेचें केन्द्रीकरण झालेलें आहे, वाहतुकीचीं साधनेंहि केन्द्रित व्यवस्थेखालीं आहेत, बँका व विमाकंपन्या याहि आज ना उद्यां सरकारच्या मालकीच्या होणार आहेत. मोठमोठाले धंदे हे राष्ट्रातर्फेच काढले जावे व चालविले जावे असें आपलें आजचें आर्थिक धोरण आहे. आशिया खंडांतल्या इतर कोठल्याहि देशापेक्षां भारतामध्यें औद्योगीकरण जास्त झालें आहे. हें सर्व खरें असलें तरी प्रत्यक्षांत केन्द्रित कारखान्यांतून सुमारें २५ लाख लोकांनाच काम मिळत आहे. राष्ट्राच्या एकंदर वार्षिक उत्पन्नामध्यें औद्योगीकरणामुळें उत्पन्न होणाऱ्या संपत्तीचा वांटा फक्त १७% आहे. सुमारे ८०% लोकसंख्या खेडोंपाडीं आपल्या लहानशा शेतीच्या तुकड्यांवर आज काम करीत आहे व राष्ट्रीय उत्पन्नाचा सुमारें ६०% भाग अशासारख्या घरगुती उद्योगधंद्यांतून निर्माण होत आहे. ७५% लोक आज स्वतःच्या जबाबदारीवर शेती किंवा एखादा ग्रामोद्योग करीत आहेत. ते (self-employed) स्वतःच्याच जबाबदारीवर कामें करीत आहेत व त्यांच्या द्वारें राष्ट्रीय उत्पन्नाचा ५०% ते ६०% भाग राष्ट्राला मिळत आहे. १५ ते ५५ वयापर्यंतच्या काम करणारांची संख्या १९५१ च्या खानेसुमारी-प्रमाणें सुमारें १९.२ कोटी आहे. त्यांपैकीं १४.५ कोटी लोकांना आज (employment) काम आहे व राहिलेले लोक बेकारींत दिवस काढीत आहेत. भारतामध्यें प्रत्यक्षांत आज १० वर्षांच्या मुलांना सुद्धां काम करतांना आपण पाहतों व ६५ वर्षांचा मनुष्यहि खेडोंपाडीं आज काम करीत असतो. या सर्वांचा हिशेब जमेला धरल्यास आपल्या देशांत काम करूं शकणारांची संख्या सुमारें २४ कोटी होते व त्यांतल्या १४ कोटी लोकांना आज काम मिळतें व बाकीच्या १० कोटी लोकांना बेकार राहावें लागतें, असें दिसून येतें. ज्या १४ कोटी लोकांना काम मिळत आहे त्यांनाहि पूर्ण काम मिळतें असें समजण्याचें कारण नाहीं. यांपैकीं शेतीच्या उद्योगांत काम करणारे सुमारें १० कोटी लोक आहेत व त्यांना सुमारें ६ महिनेच काम असतें व ६ महिने बेकार राहावें लागतें असा आपला अनुभव आहे. इतर कारागीरवर्ग जो सुमारें १०% खेडोंपाडीं आहे त्यालाहि तीन महिन्यापासून ६ महिने काम मिळतें व राहिलेल्या मुदतींत त्याला उद्योग नसल्यामुळें बेकार राहावें लागतें. आपल्या देशांतील बेकारीची गंभीरता यावरून लक्षांत येईल.

शेतीचे लहानलहान तुकडे झालेले आहेत, जमीन धारण करणाऱ्या शेतकऱ्यांपैकीं ७५% पांच एकराच्या खालचे आहेत; व त्यांचें वार्षिक उत्पन्नहि फारच अल्प आहे. रिझर्व बँकेतर्फें नुकतीच जी व्यापक पाहणी केली गेली त्यांत असें आढळून आलें आहे कीं जवळजवळ जमीन धारण करणाऱ्या निम्म्या शेतकरीवर्गाचें वार्षिक उत्पन्न ६०० रु.

पेक्षां कमी आहे[1] आणि खर्च वजा जातां त्यांना नफ्याच्या स्वरूपांत मिळणारी रक्कम सुमारें ६० रुपये किंवा त्यापेक्षां कमीच आहे. शेती सुधारण्यासाठीं भांडवल म्हणून तो किती पैसा घालूं शकेल याची माहिती घेण्याचा प्रयत्न केला तेव्हां तो दरवर्षी रु. २२ ते ५१ सुद्धां भांडवल म्हणून बाजूला काढूं शकेल अशी आज स्थिति नाहीं. याचा अर्थ हा आहे कीं जसें आपल्या देशांत बेकारीचें भयानक स्वरूप आहे, त्याचप्रमाणें शेती व ग्रामोद्योगांत जे ७५% लोक आज काम करीत आहेत असें आपण मानतों त्यांचें सरासरी वार्षिक उत्पन्न फार अल्प आहे व ते स्वतः आपली सुधारणा करून घेण्याला पूर्णपणें असमर्थ आहेत. अशा परिस्थितींत आपणाला आर्थिक नियोजनाचा विचार करावयाचा आहे.

### नियोजनाला आधारभूत गोष्टी

आज भारत-सरकार बेकारीचा प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीनें विचार करीत आहे. २० डिसेंबर १९५४ ला दिल्लीच्या लोकसभेंत भारताचें आर्थिक धोरण कसें असावें यावर चर्चा झाली; त्या वेळीं भारताचे अर्थमंत्री श्री. चिंतामणराव देशमुख यांनीं असें सांगितलें कीं, 'भारतांत काम करणाऱ्या १४॥ कोटी लोकांपैकीं अंदाजें १० % लोक बेकार आहेत व पुढल्या १० वर्षांत, वाढणाऱ्या लोकसंख्येपैकीं जे काम करणारे लोक असतील ते धरून, सुमारें २॥ कोटी लोकांना अन्यत्र काम द्यावें लागेल व पुढील १० वर्षांत दरवर्षी २५ लाख लोकांना उद्योगधंद्यांच्या द्वारें काम देऊन बेकारीचा प्रश्न सोडविला जाऊं शकेल.'' खेडोंपाडींच्या लोकांना शहरांत आणून उद्योगधंद्यांना लावण्याची त्यांची कल्पना आहे. पुढील १० वर्षांत २॥ कोटी लोकांना यंत्रोद्योगां-( Mechanised Industries ) मध्यें काम द्यावयाचें म्हटल्यास तें कितपत शक्य आहे याचा विचार केला गेलेला नाहीं. देशाचें जें थोडेंफार औद्योगीकरण झालेलें आहे त्याची वाढ गेल्या १०० वर्षांत हळूंहळूं झाली व सुमारें २५ लाख लोकांना आपण काम देऊं शकलों. यंत्रोद्योगांतून निर्माण होणाऱ्या वस्तू आपण भारतांत खपवूं शकत नाहीं अशी परिस्थिति आजच या देशांत निर्माण झाली आहे. अशा स्थितींत पुढील दहा वर्षांत २॥ कोटी लोकांना आपण काम कसें देऊं शकणार ? त्यासाठीं भांडवलाचा पुरवठा कसा होणार ? व उत्पन्न झालेल्या वस्तू आपण कोठें विकणार ? — या सर्व प्रश्नांचा मूलगामी विचार झाल्याखेरीज आपल्या देशांत यशस्वी नियोजन होऊं शकणार नाहीं. देशांतल्या ७५ % लोकांना शेती व ग्रामीण उद्योगधंद्यांत कसेंबसें काम मिळत आहे; त्यांतहि सहा महिने बेकार राहावें लागत आहे, स्वतःपाशीं भांडवल निर्माण करण्याचें सामर्थ्य राहिलेलें नाहीं, क्रयशक्तीचाहि संपूर्ण अभाव आहे. अशा देशांतलें नियोजन, खेडोंपाडीं राहणाऱ्या या ७५% लोकांना आपली स्थिति सुधारून घेतां येईल, त्यांना स्वतःची क्रयशक्ति वाढवितां येईल व आज जर दरवर्षी सरासरी ६०० रु. उत्पन्न एका कुटुंबांत होत असलें तर तें १०००—२००० रु. वर कसें जाईल — या दृष्टीनेंच झालें पाहिजे. हा स्वतः निर्माण केलेल्या उद्योगा-( self-employment )च्या आधारें काम करणारा ७५% वर्ग ज्यास्त भरभराटीला कसा येईल, त्याचें उत्पादक भांडवल कसें वाढेल व त्याची क्रयशक्ति सतत कशी वाढत जाईल हा या देशांतील नियोजनाचा मुख्य आधार मानला पाहिजे.

आपल्या देशांतील मुख्य उद्योग शेतीचा आहे. शेती लहानलहान तुकड्यांत वांटलेली आहे व ती जोंपर्यंत अशा स्थितींत राहील तोंपर्यंत शेतींत सुधारणा होणार नाहीं, शेतींत कसण्याच्या अवजारांच्या

१ हे आंकडे, अलाहाबादला २६।१२।५४ रोजीं 'इंडिअन सोसायटी ऑफ ॲग्रिकल्चरल एकॉनॉमिक्स' या संस्थेच्या १५ व्या अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून प्रा. धनंजयराव गाडगीळ यांनीं जें भाषण केलें, त्या भाषणांतून घेतले आहेत.







मध्यें सुधारणा होऊं शकणार नाहीं. म्हणून लहान-लहान तुकड्यांऐवजीं मोठाली सहकारी शेतें बनलीं पाहिजेत. अशा सहकारी शेतांना भांडवल मिळालें पाहिजे, शास्त्रीय शेती करण्याची माहिती उपलब्ध झाली पाहिजे, शेतीच्या तंत्र-(Technique)-मध्येंहि सुधारणा झाली पाहिजे असें आज अनेक विचारवंतांना वाटत आहे. जीं शेतें परवडत नाहींत तीं एकत्र आणल्याखेरीज, व सहकारी पद्धतीनें त्यांत काम होऊं लागल्याखेरीज आपण फारशी प्रगति करूं शकणार नाहीं. याबाबतींतहि जास्त सखोल विचार होणें आज आवश्यक आहे.

## भूदानाला अभिप्रेत अर्थव्यवस्था

देशांत भूदानाची चळवळ आज सुरूं झाली आहे. जमीनीची न्याय्य वांटणी व्हावी, भूमिहीनांनाहि जमीन मिळावी, जो कसेल त्यालाच उत्पादनाचा लाभ घेतां यावा, शेतींतून मध्यस्थांचा वर्ग नाहींसा व्हावा, हळूंहळूं स्वामित्वाची कल्पनाहि लोकांनीं सोडून द्यावी, शेतीचें ग्रामीकरण व्हावें व ग्रामराज्याची स्थापना होऊन स्वयंशासित व स्वयंपूर्ण अशीं गांवें निर्माण व्हावींत, ही भूदानचळवळीच्या मागील कल्पना आहे. जमीनीची समान वांटणी झाली म्हणजे भूदान-यज्ञाचें काम सफल झालें असें मानणें योग्य होणार नाहीं. जमीनीची समान वांटणी होणें ही पहिली पायरी समजली पाहिजे. तदनंतर एकेका पायरीनें आपणांस पुढें जावयाचें आहे. जमीनीचें ग्रामीकरण झाल्यानंतर सर्व गांव गांव-सभेतर्फे शेतीची व्यवस्था पाहूं लागल्यानंतर व आवश्यक तेथें एकमेकाला मदत करूं लागल्यानंतर, आपल्या देशांत शेतीचे लहानलहान तुकडे पडले आहेत ही गोष्ट प्रगतीच्या आड येईल असें आम्हांस वाटत नाहीं. भारतासारख्या ३६ कोटी लोकांच्या देशांत शेतजमीन ही समाजाच्या मालकीची झाली पाहिजे व सर्व गांव-समाजाला तिचा जास्तींत जास्त चांगला उपयोग करतां येईल अशी व्यवस्था आपल्याला निर्माण करतां आली पाहिजे. परंतु शेती करण्याची इच्छा बाळगणाऱ्या प्रत्येक कुटुंबाला गांवांत जमीन मिळाली पाहिजे व त्याच्या घरांत माणसं असतील त्या प्रमाणांत जमीन कसण्याचा त्याचा हक्क गांव-समाजानें मान्य केला पाहिजे. भूदानाला जी अर्थ-व्यवस्था अभिप्रेत आहे तीमध्यें शेतीच्या व्यवसायांत सहकारी तत्त्वाला स्थान राहणार आहे. परंतु सर्व शेती एकत्र केली जावी व प्रत्येकानें शेतमजूर बनावें, शेतीचें ( Collectivisation ) सामुदायिकी-करण व्हावें ही कल्पना भूदान-चळवळीच्या प्रणेत्यांना मान्य नाहीं किंवा सर्वोदय-अर्थव्यवस्थेंतहि ती बसत नाहीं.

आजच्या परंपरागत अर्थशास्त्रांत श्रम-विभागा-( Division of Labour )ला फार महत्त्वाचें स्थान दिलें जातें. त्याचप्रमाणें 'स्पेशलायझेशन' ( Specialisation ) झालें पाहिजे. प्रत्येकानें एकत्र काम करावें, एकाच क्रियेंत राबत रहावें, शेतकऱ्यानें शेती करावी, विणकरानें विणावें, प्रत्येक कारागिरानें आपआपल्या वंश-परंपरागत चालत आलेल्या उद्योगांत कार्यक्षम व्हावें वगैरे आमचें परंपरागत तथाकथित अर्थशास्त्र म्हणतें. ज्या ग्रामराज्याची व ग्रामीकरणाची आम्ही कल्पना करीत आहोंत, त्यामध्यें मनुष्याच्या व्यक्तित्वाच्या विकासाला प्रमुख स्थान दिलें पाहिजे. शेतकरी शेतीच करीत राहिला तर त्याचा सर्वांगीण विकास होत नाहीं. शेतीबरोबर त्याच्या घरांत अनेक उद्योगहि चालले पाहिजेत. प्रत्येक कुटुंबाला गांवांतील एकूण जमिनीच्या प्रमाणांत जमीन मिळेल व तें आपल्या घरीं शेतीबरोबर इतर उद्योगधंदेहि करीत राहील, प्रत्येक कुटुंब हें बहुधंदी – (Multicraft Family) कुटुंब असेल– ही सर्वोदयाच्या आर्थिक पुनर्रचनेची दृष्टि आहे. असें अनेक उद्योगधंद्यांत कार्यक्षमतेनें काम करणारें कुटुंब हें सांस्कृतिक दृष्टीनें सुद्धां अधिक विकासक्षम होईल. म्हणून भूदानाच्या










चळवळीमुळें जमिनीचे कितीहि तुकडे झाले तरी त्यामुळें देशाची आर्थिक हानि होईल व शेतीचा लहान तुकडा न परवडणारा आर्थिक घटक (Uneconomic Holding) होऊं शकेल असें आम्हांस वाटत नाहीं.

शेतीच्या उद्योगांत यंत्रें वापरलीं गेलीं पाहिजेत असें अनेकांना वाटतें. यंत्रें वापरावयाचीं असलीं तर शेतीचे मोठमोठाले गट्ट पडले पाहिजेत, असें केलें तरच शेतीचा उद्योग भरभराटीस येईल असें त्यांचें म्हणणें आहे. भूदानामुळें शेतीचा व्यवसाय अधिक गुंतागुंतीचा होईल असेंहि त्यांना वाटतें. ह्याबाबतींत आमचा अनुभव वेगळा आहे व आमची पुनर्रचनेची कल्पनाहि वेगळ्या स्वरूपाची आहे. केवळ शेती करणारा असा एक वर्ग आपल्या देशांत राहावा हें व्यक्तित्वाच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीनें योग्य नाहीं असें आम्हीं समजतों. म्हणून प्रत्येक कुटुंबांत अनेक उद्योग असलेच पाहिजेत हा आमचा आग्रह आहे. त्याचप्रमाणें जमिनीचा कितीहि लहान तुकडा असला तरी त्यांत जर भरपूर मेहनत झाली, पुरेसें व योग्य प्रमाणांत खत टाकलें गेलें, शास्त्रीय दृष्टीनें शेती करण्याचें ज्ञान आपणांपाशीं असलें तर लहान तुकडा असल्यामुळें शेतींत उत्पन्न कमी येईल असें आम्हीं मानीत नाहीं. किंबहुना आमचा अनुभव उलटा आहे. ज्ञानपूर्वक, शास्त्रीय दृष्टीनें शेती करणारा मनुष्य जमिनीच्या लहानश्या तुकड्यांतूनहि आज फार मोठ्या प्रमाणांत उत्पन्न घेतांना आपण पाहतों. अशा शेतींत सुधारलेलीं अवजारेंहि वापरलीं पाहिजेत, कुदळीच्या ऐवजीं जमीन खोदण्यासाठीं पायानें गति मिळणारा 'फोर्क' वापरला तर दुप्पट किंवा तिप्पट काम होऊं शकतें. खुरप्यानें निंदाई करण्याऐवजीं डवरण्याच्या पद्धतीनें निंदाई केल्यास १० मनुष्यांचें काम एक मनुष्य करूं शकतो. असे अनेक अवजारांचे सुधार आपणाला करून घ्यावे लागतील व ते होतील. मनुष्याला श्रम कमी करावे लागावेत किंवा कमी श्रमांत जास्त काम व्हावें हाच जर सुधारलेलें तंत्र (advanced technique) वापरण्याचा अर्थ असेल तर तो आम्हांसहि मान्य आहे. परंतु शेती सुधारण्यासाठीं किंवा शेतींतून भरपूर उत्पन्न होण्यासाठीं जमीनीचा अमुकच एकरांचा तुकडा असला पाहिजे अशी आवश्यकता आम्ही मानीत नाहीं. योग्यवेळीं शेतकऱ्याला भांडवल मिळावें, सुधारलेल्या अवजारांचा उपयोग करण्यासारखी परिस्थिति निर्माण व्हावी, शेतकऱ्यानें उत्पन्न केलेल्या वस्तू विकण्याची सोयहि सहकारी पद्धतीनें व्हावी, त्याला लागणाऱ्या वस्तूहि सहकारी पद्धतीनें खरेदी केल्या जाव्या, एवढ्या मर्यादित अर्थानेंच सहकारी शेती व्हावी हें आम्हांस मान्य आहे.

भूदान-यज्ञाच्या चळवळीमुळ जमीन ज्यांना मिळेल त्यांच्या ठिकाणीं जमीनीच्या मालकीची भावना अधिक वाढेल व सहकारी वृत्तीऐवजीं व्यक्तिवाद बोकाळेल असा एक आक्षेप घेतला जातो. एकीकडे साऱ्या गांवच्या जमीनीचें ग्रामीकरण झालें पाहिजे व गांवानें सर्व समाजाच्या हिताच्या दृष्टीनें त्या जमीनीचा काळजीपूर्वक वापर केला पाहिजे असें आम्ही म्हणतों. त्याचबरोबर जमीन कसणाराला जमीनीविषयीं आपुलकी वाटली पाहिजे, मिळालेल्या जमीनीवर जास्तींत जास्त श्रम करण्याची वृत्ति वाढली पाहिजे व त्यानें सर्व जीव ओतून जमीनीची सेवा व मशागत केली पाहिजे असें आम्हांस वाटत असल्यानें, जमीनीच्या फेरवांटणीमुळें स्वामित्वाची भावना वाढेल व त्यामुळें तो व्यक्तिवादी बनेल व शेतीचें नुकसान होईल असें जें भय आज प्रदर्शित केलें जातें तें ग्रामीकरणाच्या व्यवस्थेंत राहणार नाहीं. या योगें सहकाराचे सर्व फायदे मिळून मालकीच्या प्रेरणेनें तो जास्तींत जास्त काम करूं लागेल असें आम्हांस वाटत आहे. आज ज्या देशांत सहकारी अथवा सामुदायिक पद्धतीनें शेती करण्याचे प्रयोग चालू आहेत तेथें शेतावर काम करणाऱ्या लोकांत मना-








पासून काम करण्याची प्रेरणा-( incentive for work ) कशी निर्माण होईल असा गंभीर प्रश्न निर्माण झाला आहे. भूदानयज्ञांत या प्रश्नाचें समर्पक उत्तर आहे.

## बहुधंदी कुटुंबांचा गांव

सर्वोदयी अर्थशास्त्राप्रमाणें प्राथमिक उत्पादक घटक कुटुंब हें असेल. तें बहुधंदी असेल. एक गांव किंवा जास्तींत जास्त ५००० लोकसंख्येचा एक गट हा प्राथमिक आर्थिक सामाजिक घटक मानला जावा. या घटकाचें उत्पादन मुख्यतः स्वावलंबनासाठीं केलें जाईल. ९०% तरी ते आपणांसाठीं उत्पन्न करतील व राष्ट्राच्या गरजेप्रमाणें १० ते २०% सरप्लस किंवा जास्तीचें उत्पादन होत राहील व त्यांची इतर उत्पादक घटकांशीं देव-घेव केली जाईल. आज सुमारें ३०० रु. किंवा त्यापेक्षां कमी वार्षिक उत्पन्न असणारीं कुटुंबें जवळजवळ १ कोटी असावींत. अशा कुटुंबां-पाशीं उत्पादक साधनेंहि फार अल्प आहेत. त्यांना उत्पादक साधनें पुरविणें व तीं सुधारलेलीं असणें हा सर्वोदयाच्या दृष्टीनें पहिला कार्यक्रम हातीं घ्यावा लागेल. आज दर माणशीं उत्पादक भांडवल आपल्या देशांत फार कमी आहे. ज्या कुटुंबाचें उत्पन्न सालीना ३०० ते ४०० रु. आहे त्याच्यापाशीं उत्पादक साधनेंहि १५०-२०० रु. पेक्षां अधिक असणार नाहींत. प्रत्येक कुटुंबाला उत्पादक भांडवल सुमारें १००० रु. तरी मिळेल व त्यांवर त्याला वर्षाकांठीं १०००-१२०० रु. श्रममोबदल्याच्या स्वरूपांत मिळतील अशी स्थिति प्रथमतः देशांत निर्माण केली गेली पाहिजे. खालच्या पातळीवर असणाऱ्या लोकांना प्रथमतः मदत पोंचली पाहिजे. अशीं साधनें दिलीं गेल्यास प्रत्येक बहुधंदी कुटुंब हें कार्यक्षम आर्थिक घटक ( Efficient Economic Unit ) बनेल. व अशा सुमारें १००० कुटुंबांची सहकारी संस्था (Multi-purpose Society) ही ह्या १००० कुटुंबांना उद्योग देण्याची जबाबदारी घेईल; त्यांच्या मालाचा क्रय-विक्रय करील, त्यांना कच्चा माल पुरवील, आवश्यक तें भांडवलहि पुरवील, कार्य-क्षमता वाढविण्याच्या दृष्टीनें शास्त्रीय ज्ञान देण्या-चीहि सोय करील. त्या क्षेत्रांतील शिक्षणाचाहि विचार त्या ठिकाणचे लोक करतील. आर्थिक व्यवहार जशी सहकारी संस्था सांभाळील तशी शिक्षणसंस्था प्रयोगशाळा चालवील, अवजारांत सुधारणा करण्याचा प्रयत्न करील, उद्योगांत शास्त्रीय दृष्टि आणण्याची व त्या क्षेत्रांत चालणाऱ्या सर्व उद्योगधंद्यांच्या शिक्षणाची व्यवस्थाहि करील. सहकारी संस्थेशीं निकट साहचर्यानें शिक्षणाचें काम चालविलें जाईल. ग्रामपंचायत, ग्राम-सहकारि-संस्था व ग्राम-शिक्षण संस्था ह्या त्रिविध संस्थांच्या द्वारें गांवसमाजाचें सारें काम चालविलें जाईल.

## विकेंद्रित अर्थव्यवस्था

सर्वोदयी अर्थव्यवस्थेचा आधार विकेंद्रित अर्थ-व्यवस्था हा आहे. विकेंद्रित अर्थ-व्यवस्था म्हणजे आजच्या मोठमोठाल्या केन्द्रित उद्योगांचें भौगोलिक क्षेत्र वाढविणें-(Diffusion)-करणें हें नव्हें. आज फक्त मोठ्या शहरांत केन्द्रित झालेले जे कारखाने आहेत, त्यांचे लहानलहान घटक (Units) बनवून, त्यांची सामान्य शहरांत व खेडोंपाडीं स्थापना केली कीं झाली विकेंद्रित अर्थव्यवस्था – असें आम्हास वाटत नाहीं. आमच्या विकेंद्रित अर्थव्यवस्थेंत यंत्रयुगाचा निरास ( Disintegration of the Machine Age) व राजकीय सत्तेचें विघटन अभिप्रेत आहे. औद्योगीकरणाच्या युगांत उद्योगांचें जास्तींत जास्त केन्द्रीकरण होत गेलेलें आहे. व आज अशी समजूत आहे कीं कारखानदारी पद्धती-नेंच उद्योग चालविल्याखेरीज देशाचा झपाट्यानें विकास होऊं शकणार नाहीं. पण पाश्चात्त्य देशांत अमक्या एका पद्धतीनें विकास झाला म्हणून तीच पद्धति आपणहि स्वीकारली पाहिजे असें समजण्याचें

कारण नाहीं. कारखानदारी पद्धतींत जी कार्यक्षमता आहे, ती गृहोद्योगांतहि आपणांला आणतां येईल. आजचीं अवजारें इतकीं सुधारतील कीं हातानेंहि पुष्कळ काम होऊं शकतें व कार्यक्षमता वाढते असें दिसून येईल. काम कमी झालें तरी त्यांत मनुष्याच्या व्यक्तित्वाच्या विकासाला अधिक अवसर मिळेल. आज अनेक उद्योगांच्या बाबतींत असें प्रत्यक्ष अनुभवासहि येत आहे. त्या दृष्टीनें अद्याप कोणी विशेष विचार केला नाहीं असें मात्र दुःखानें म्हणावें लागतें. हाच मुद्दा कांहीं उदाहरणें देऊन आम्ही अधिक स्पष्ट करूं इच्छितों.

आज आपल्या देशांत ४०० कापडगिरण्या आहेत. सुमारें दोन लाख पॉवर-लूम्स आज गिरण्यांतून चालत आहेत. त्यांच्यातर्फें ४५० कोटी चौरस वार कपडा तयार होत आहे. गिरण्यांतून हें कापड काढण्याऐवजीं घरोघर चालणाऱ्या हातमागां-वर हें कापड काढावयाचें ठरविल्यास समाजाच्या गरजेप्रमाणें हातमागाकडून शटल्-मागावर, शटल्-मागाकडून पायानें चालवितां येणाऱ्या स्वयंचलित मागाकडे आपणांस जातां येईल व हाच उद्योग विकेंद्रित पद्धतीनें यशस्वी रीतीनें चालवितां येईल.

देशांत सुमारें ११४ लाख चात्या (spindles) कापडगिरण्यांतून चालविल्या जात आहेत व त्यांतून सुमारें १५० कोटी पौंड सूत आज देशांत निघत आहे. 'अंबर चरखे' ( चार चात्यांचें छोट्यातलें छोटें सूत काढण्याचें यंत्र ) जर घरोघर सुरूं केले तर कापडगिरणींत आज जें ५ लाख लोकांना काम मिळत आहे तें सुमारें १ कोटी लोकांना मिळेल व उत्पादन कापडगिरण्यांपेक्षांहि अधिक वाढण्याची शक्यता निर्माण होईल.

तेलाच्या गिरण्यांतून सुमारें १८ लाख टन गळिता-चीं धान्यें दर वर्षी गाळलीं जातात. ४ लाख तेल-घाण्या फक्त तीन महिने काम करीत आहेत, त्यांना पूर्ण काम दिल्यास तेलघाणीचा उद्योगहि विकेंद्रित पद्धतीनें गांवोगांव यशस्वी पद्धतीनें चालेल.

सालीना सुमारें १३ लाख टन साखर आज गिरण्यांच्या द्वारें उत्पन्न होत आहे. ३० लाख टन गूळ आपल्या देशांत खेडोंपाडीं आज बनत आहे. जेथें गूळ बनत आहे तेथेंच सेंट्रिफ्यूगल मशीन हातानें चालविलें किंवा विद्युत्-शक्तीनें चालविलें, तर आपणाला लागणारी आवश्यक सर्व साखर आपण गांवोगांव निर्माण करूं शकूं.

जवळजवळ ८८ % चर्मोद्योग आज विकेंद्रित पद्धतीनेंच चालू आहे. त्याला आवश्यक शास्त्रीय ज्ञानाची जोड दिल्यास चर्मोद्योगांतहि आपणाला कारखानदारीकडे जाण्याची आवश्यकता नाहीं.

साबणाचा उद्योग हाहि ५००० वस्तीच्या घटकासाठीं एक किंवा दोन कुटुंबें सहज चालवूं शकतील.

हातकागदाचें दररोज सुमारें ६ पौंड उत्पादन करणारें व एका कुटुंबांतील मनुष्यशक्तीनें चालणारें एक युनिट आज उपलब्ध झालें आहे.

काड्याच्या पेट्यांचा उद्योगहि, दररोज १० ते २० ग्रोस पेट्या उत्पन्न करणारा, एका कुटुंबाद्वारें कार्यक्षमतेनें चालविला जाऊं शकतो असा आमचा अनुभव आहे.

लोहार, सुतार, कुम्भार यांच्या उद्योगांतहि कुटुंब हा घटक मानून व आवश्यक तेथें सहकारी तत्त्वाचा अंगीकार करून आपणांस लागणारीं सर्व अवजारें ( Tools ) व सायकल-आदि वाहनांची साधनें, कट्लरी व अशा प्रकारच्या अनेक वस्तू निर्माण करणें शक्य आहे; एवढेंच नव्हें तर दुसऱ्या अनेक देशांतूनहि या उद्योगांचें स्वरूप अशाच विकेंद्रित स्वरूपाचें आहे. त्याचप्रमाणें कुटुंबाला लागणाऱ्या आवश्यक गरजा व त्यासाठीं उत्पन्न होत असलेल्या आणखी शेंपन्नास वस्तू गृहोद्योगांच्या स्वरूपांत होऊं शकतील किंवा नाहीं याविषयीं संशोधन झालें पाहिजे. इतर देशांतून त्या बाबतींत जे अनुभव












आलेले आहेत त्यांचाहि आपण लाभ घेतला पाहिजे.

वरील दृष्टीनें विचार करीत असतांना जगांत तंत्रविज्ञाना-( Technology )च्या दृष्टीनें जी प्रगति झाली आहे तिचा आपणाला पूर्ण फायदा घ्यावा लागेल. तिचा फायदा घेऊन प्रत्येक कुटुंबा-पर्यंत सुधारलेलीं साधनें पोंचविण्याचा आपण विचार केल्यास, व शक्य होईल तेव्हां वीजहि आपण वापरूं लागल्यास आमचें बहुधंदी कुटुंब हेंहि वर्षाकांठीं ४/५ हजार रुपये मिळवूं लागेल, जीवनमान ( Standard of Living ) उंचावण्याचें काम विकेंद्रित पद्धतींतही आपणांस आवश्यकतेनुसार वाढवितां येईल असें या दृष्टीनें आजवर जें संशोधन झालें आहे त्यावरून स्पष्ट होत चाललेलें आहे.

एक गांव किंवा गांवांचा समूह ह्या स्वयंशासित व स्वयंपूर्ण अशा आर्थिक घटकाचें क्षेत्र विस्तृत होईल असें जरी आपण मानलें तरी कांहीं उद्योग आपणांला केन्द्रित पद्धतीनेंच चालवावे लागतील, त्यासाठीं अशा विविध कार्यकारी सहकारी संस्थांचे आपणांस संघ बनवावे लागतील. ते हळूंहळूं तालुका, जिल्हा, प्रांत व देश अशा स्वरूपांत वरपर्यंत संघटना वाढवीत जातील व त्यांच्या ताब्यांतच बँका, विमा-कंपन्या, दळणवळणाचीं साधनें व प्रधान उद्योगधंदे ( Key Industries ) राहतील. अशा सर्व संस्थांचा असा प्रयत्न राहील कीं मूलभूत घटक हे जास्त जास्त स्वावलंबी व्हावेत व आवश्यक तितकाच माल एका क्षेत्रांतून दुसऱ्या क्षेत्रांत पाठविला जावा.

## स्वावलंबी गांवें व विविध कार्यकारी संघ

आज सर्व आर्थिक जीवनाची किल्ली केन्द्र-सरकारच्या हातीं आली आहे, व ( Welfare State ) कल्याणकारी राज्य जितक्या प्रमाणांत वाढत जाईल तितक्या प्रमाणांत आर्थिक प्रवृत्तींचेंहि केन्द्रीकरण होत जाईल. सर्वोदयी अर्थव्यवस्थेंत ज्या आर्थिक नियोजनाचा आम्ही विचार करीत आहोंत त्यांत गांव किंवा गांव-समूह आर्थिक व्यवहारांत जास्तींत जास्त स्वावलंबी होईल व विविधकार्यकारी सहकारी संघ हा कार्यक्षमतेनें लोकांना जास्तींत जास्त स्वावलंबी बनविण्याची खटपट करील. सुमारें १००० कुटुंबांची एक सहकारी संस्था धरल्यास व ७ कोटी कुटुंबें आहेत असें धरल्यास असे ७०००० विविध कार्यकारी सहकारी संघ साऱ्या देशांत बनतील. अशा कांहीं संस्थांनीं तालुका, तालुक्यांतून जिल्हा, जिल्ह्यावरून प्रांत व प्रांतावरून देश अशा प्रकारचीं मंडळें बनतील व त्यांच्यातर्फे देशाचें आर्थिक नियोजन, विकास व व्यवहाराच्या अंमलबजावणीचें कार्य केलें जाईल. जे उद्योग कांहीं प्रमाणांत केन्द्रित म्हणून चालवावे लागतील ते आवश्यकतेनुसार केन्द्रित पद्धतीनें वरील मंडळेंच चालवितील.

सर्वोदयी अर्थव्यवस्थेचा थोडाफार विचार वर केला आहे. एक स्पष्ट दर्शन या स्वरूपांत पूर्ण चित्र उभें करणें आज शक्य नाहीं. वरील विवेचनांत आर्थिक जीवनाच्या प्रत्येक पैलूला स्पर्श करणेंहि शक्य झालेलें नाहीं. परंतु प्रारंभ करण्याच्या दृष्टीनें व आपल्या-सारख्या ३६ कोटी लोकसंख्येच्या देशांत बेकारीचा प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीनें मजूर-मालक, सेव्य सेवक वगैरे नातीं जीं निर्माण होतात व त्यांतून ज्या कट-कटी उत्पन्न होतात त्या टाळण्याच्या दृष्टीनें, व विशेषत: मनुष्याच्या व्यक्तित्वाचा सर्वांगीण विकास साधावा, त्याला त्याच्या घरांत राहून उद्योगधंदा करतां यावा, एका आर्थिक घटकाला प्राथमिक गर-जांच्या बाबतींत दुसऱ्यावर अवलंबून राहावें लागूं नये व आर्थिक रचना करीत असतांना राजकीय सत्तेच्या अस्तित्वाचीच आवश्यकता राहूं नये, स्पर्धेच्या अर्थशास्त्राऐवजीं सहकाराचें व सेवेचें अर्थ-शास्त्र अंगीकारिलें जावें, प्रत्येक कुटुंबानें उत्पादक

कामाकरितां आवश्यकतेनुसार रोज ४–६ तास तरी द्यावेत, त्याचबरोबर त्याला सांस्कृतिक व बौद्धिक विकासासाठीं जरूर तितकी फुरसत मिळावी, कुणी कुणाचें शोषण करूं नये व इतरांपासून फटकूनहि वागूं नये – अशा दृष्टीनें सर्वोदयी अर्थशास्त्राची उभारणी करावी लागेल. त्यांतली पहिली पायरी म्हणून वरील कार्यक्रम या लेखाच्या द्वारें आज मी मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

सर्वोदयाच्या अर्थशास्त्राला अन्त्योदया-('unto this last')पासून सुरुवात झाली पाहिजे. म्हणून कमींत कमी सालीना रु. ३०० किंवा त्यापेक्षांहि कमी उत्पन्न असणाऱ्या कुटुंबांना प्रथम साहाय्य केलें पाहिजे. प्रत्येक कुटुंब हें बहुधंदी कुटुंब बनलें पाहिजे. कसण्याची इच्छा असेल त्याला शेती मिळाली पाहिजे असें आम्हांस वाटत आहे. त्यासंबंधीं आम्ही जें चिंतन केलें आहे त्यावरून शेती हा अल्प किंवा अधिक प्रमाणांत मुख्य उद्योग समजून गृहोद्योग व ग्रामोद्योग यांच्या साहाय्यानें प्रत्येक कुटुंबाला बहुधंदी बनविल्यास आणि त्याचबरोबर सहकारी जीवनाचा अंगीकार करून तदनुकूल शिक्षणप्रवृत्तींत बदल केल्यास, आपणांस सर्वोदयाच्या ध्येयाकडे झपाट्यानें मार्गक्रमण करतां येईल असें आम्हास वाटतें.

---

## ' सज्जन आपल्या तपानें समाजाची धारणा करतात '

समाजाच्या प्रगतीमध्यें तीन टप्पे किंवा अवस्था विशेष नजरेंत भरण्यासारख्या दिसून येतात : पहिली अवस्था म्हणजे ' जंगलचा कायदा '; यांत स्वार्थ आणि हिंसा यांचें राज्य असतें. दुसरा टप्पा किंवा अवस्था म्हणजे ' कायद्याचें राज्य '; यांत पोलिस असतात, तुरुंग असतात, निःपक्षपाती न्याय देण्याकरितां न्यायालयें असतात. समाजाच्या प्रगतीचा तिसरा उल्लेखनीय टप्पा म्हणजे ' अहिंसा आणि निःस्वार्थ यांचें राज्य '; यांत प्रेम आणि कायदा एकरूप बनतात. सामाजिक प्रगतीच्या या तीन टप्प्यांपैकीं शेवटचा तिसरा टप्पा गांठणें हें सर्व सुसंस्कृत मानवांचें ध्येय आहे. स्वार्थी महत्त्वाकांक्षेला तिलांजलि देणारे, वैयक्तिक स्वार्थांचा त्याग करणारे, दुसरे सुखानें आणि शांततेनें रहावेत म्हणून आत्मसमर्पण करणारे असे स्त्रीपुरुष जसजसे संख्येनें वाढत जातील तसतशी समाजाची ही तिसरी ध्येयभूत अवस्था जवळजवळ येत जाईल. ' सन्तो भूमिं तपसा धारयन्ति ' ( 'सज्जन लोक आपल्या तपस्वी जीवनानें समाजाची धारणा करतात ' ). आचार्य विनोबा भावे हे एक असे ' तपस्वी ' असून ते आपल्या सामाजिक आणि आर्थिक जीवनांत प्रेमाचें, स्नेहाचें राज्य आणूं पहात आहेत.

सगळेच लोक सन्त बनूं शकत नाहींत म्हणूनच समाजव्यवस्थेंत परिवर्तन घडवून आणण्याकरितां आपणांस कायद्याच्या बळावर विसंबून रहावें लागते. समाजरचनेंत परिवर्तन होणें किती निकडीचें आहे याचा विचार करूं लागलें तर त्या संदर्भांत भूदान-आंदोलन किती महत्त्वपूर्ण आहे याची साक्ष पटत. भारतीय जीवनसरणीमध्यें ज्या प्राचीन उज्ज्वल परंपरा अनुस्यूत आहेत, त्या भूदानानें उजळून निघाल्या आहेत. समाज म्हणजे एक महान् कुटुंब ही भव्य सामाजिक भावना भूदानाच्या मुळाशीं आहे. आचार्य विनोबा भावे यांनीं प्रवर्तित केलेल्या या भूदान-आंदोलनांत क्रान्ति घडवून आणण्याचें सामर्थ्य आहे. त्यांच्या आवाहनाला जी समाजाच्या सर्व थरांतून साद मिळत आहे ती पहातां आपल्या देशाची नैतिक पुण्याई किती थोर आहे याची साक्ष पटते. भूदान-आंदोलन हें एका महान् श्रद्धेवर, सद्भावनेवर आधारलेलें आहे. त्यानें शेतकरी क्रान्ति घडूनच येईल हें जरी खात्रीनें सागतां न आलें तरी, जमीनसुधारणेच्या क्रान्तिकारक पद्धति अंमलांत आणायला त्यायोगें अनुकूल वैचारिक वातावरण उत्पन्न होईल हें खचित.

— सर्वपल्ली राधाकृष्णन्

[ ' Vinoba and his Mission ' by Suresh Ramabhai या पुस्तकाच्या (१९५४) प्रस्तावनेंतून ].








प्रा. गोवर्धन पारीख

# भूदान-आंदोलन आणि खाजगी मालकीचा प्रश्न

संपत्तीच्या समान विभागणीद्वारां प्राप्तीची विषमता कमी करूं पहाणारें आंदोलन – हें भूदान-आंदोलनाचें महत्त्वाचें वैशिष्ट्य म्हणून नमूद केलें जातें. आणि ही समता दंडाऐवजीं हृदयपरिवर्तनाच्या मार्गानें प्रस्थापित करण्याचा त्यांत प्रयत्न असल्यामुळें भूदानास एक महत्त्वाचें नावीन्य प्राप्त झालें आहे. या दृष्टीनें या आंदोलनानें निर्माण केलेल्या प्रश्नांपैकीं खाजगी मालकीचा प्रश्न हा एक मूलभूत प्रश्न होय. खाजगी मालकीचें प्रश्नात्मक स्वरूप भूदानांत आढळतें असें म्हणण्याचें कारण त्यांत आढळणारे खाजगी मालकीसंबंधींचे दोन भिन्न विचार हें होय. 'दान' म्हणजे 'संविभजनम्' म्हणजे न्याय्य किंवा समान वांटणी; या विचारांत खाजगी मालकीची मान्यता गृहीत धरलेली आहे, असें म्हणतां येईल. उलट, "सबै भूमि गोपालकी" ही घोषणा खाजगी मालकीचा अंत सूचित करणारी आहे. 'गोपालकी' म्हणजे गांवाची म्हणजेच सामाजिक मालकी तिच्यानें व्यक्त होते. हवा, पाणी इत्यादींप्रमाणेंच जमीनहि मुक्त झाली पाहिजे असें म्हणतांना विनोबाजी तर याच्याहि पुढें गेलेले दिसतात. तथापि, या विचारांतील अतिरंजितता अगदीं स्पष्ट असल्यामुळे तो क्षणभर बाजूस ठेवण्यास हरकत नाहीं.

## सर्वांनाच 'भूमिहीन' करूं पाहणारें आंदोलन

जमिनीची समान वांटणी हा हेतु असल्यास विशिष्ट क्षेत्रापेक्षां अधिक जमीन ज्यांच्या मालकीची आहे अशांकडून तो अधिकांश घेणें आणि त्या क्षेत्रापेक्षां कमी जमीन ज्यांच्याजवळ आहे अशा गरीब शेतकऱ्यांना किंवा भूमिहीनांना ती वांटून देणें हें स्थूलमानानें आवश्यक ठरतें. अर्थात् येथें तूर्त मालकीचें आणि कसणुकीचें क्षेत्र यांतील फरक ध्यानांत घेतलेला नाहीं. मालक प्रत्यक्ष कसणूक करीत नसेल तेथें हा फरक विचारांत घेणें अत्यंत महत्त्वाचें आहे. आणि अशा प्रकारचा राज्य आणि कसणारा यांजमधील मध्यस्थांचा मालकी हक्क नाहींसा करण्याचा उपक्रम कायद्यानें होत आहे. तूर्त कसणारेच मालक आहेत असें गृहीत धरल्यास मालकीच्या क्षेत्रांची समान विभागणी होण्यासाठीं वर उल्लेख केलेला मार्गच आवश्यक ठरतो एवढेंच म्हणावयाचें आहे. मध्यस्थांच्या मालकी हक्कांचा प्रश्न अधिक गुंतागुंतीचा आहे. अशा मध्यस्थांची संख्या एकाहून अधिक झाल्यास जमिनीचें दानपत्र त्यांच्यांतील कांहींना करतां येईल कीं नाहीं याबद्दल शंका आहे. भूदानाऐवजीं आपल्या मर्यादित मालकी हक्काचें दानच त्यांच्या बाबतींत संभवतें. तात्पर्य, तूर्त हा गुंतागुंतीचा प्रश्न बाजूस ठेऊन भूदान-आंदोलनाकडे पाहिल्यास, जमिनीची समान विभागणी होण्याच्या दृष्टीनें असलेला आवश्यक मार्ग त्यांत अवलंबिला जात नाहीं असेंच म्हणावें लागतें. समान विभागणी करतांना गृहीत धरावयाची क्षेत्रमर्यादा कोणत्या तत्त्वाच्या वा गमकाच्या आधारें निश्चित करावयाची याचाहि तूर्त विचार करण्याचें कारण नाहीं. तथापि कोणत्याहि गमकाचा वा तदनुसार निश्चित होणाऱ्या क्षेत्राचा विचार न करतां भूदान-आंदोलनांत सर्वांकडूनच जमीन मागितली आणि घेतली जाते; आणि वांटप करतांना ती मालकीची म्हणून नव्हे तर वहिवाटीसाठीं दिली जाते. प्रत्येकाकडून एकषष्ठांश जमीन मिळण्याचीच अपेक्षा आंदोलनांत धरली गेली आहे हेंहि खरें नाहीं. एकदां दानपत्र केल्यानंतर पुनः जमीन मागितली जाणार नाहीं असें नाहीं; उलट, पुनः पुनः मागितली जाईल. त्याचप्रमाणें एकषष्ठांशापेक्षां अधिक जमिनीचें दानपत्र स्वीकारलें जाणार नाहीं असें नाहीं. किंवा विशिष्ट क्षेत्रापेक्षां अधिक जमीन ज्यांच्याजवळ आहे अशांचीच दानपत्रें स्वीकारली जातात असेंहि नाहीं. अशा प्रकारें आंदोलनाचा सर्व रोख कालांतरानें सगळी जमीन सामाजिक मालकीची व्हावी असाच आहे. यामुळें त्यांत 'संविभजनम्' या कल्पनेचा अर्थच बदलतो. आणि मालकीच्या दृष्टीनें सर्वांनाच शेवटीं 'भूमिहीन' करूं पाहणारें परंतु वहिवाटीच्या दृष्टीनें अधि-







कांत अधिक शेतकऱ्यांना जमीन उपलब्ध करून देणारें आंदोलन असें या आंदोलनाचें स्वरूप बनतें. या दृष्टीनें संपत्तीची समान विभागणी ही एक दिशाभूल करणारी कल्पनाच म्हटली पाहिजे. सामाजिक मालकी हें अंतिम उद्दिष्ट परंतु तावडतोबीचा कार्यक्रम मात्र समान विभागणीचा असें या आंदोलनाचें, बारकाईनें पाहिल्यास, वर्णन करतां येणार नाहीं असें वाटतें. उलट, समान विभागणीची कल्पना ही मालकीच्या दृष्टीनें बोलावयाचें झाल्यास केवळ वरवरचीच कल्पना होय असें म्हणावयास भरपूर आधार आहे.

## हृदयपरिवर्तनाबरोबर सत्याग्रहाचीहि भाषा !

जमिनीवर सामाजिक मालकी प्रस्थापित करण्याचा भूदानप्रेरित मार्ग, तोच हेतु साध्य करूं पहाणाऱ्या अन्य चळवळींच्या मार्गाहून – भिन्न आहे असें सामान्यतः म्हटलें जातें. आणि तें बऱ्याच अंशीं खरेंहि आहे. राज्यसत्ता, दंड वा कायदा यांच्या आश्रयानें सामाजिक मालकी प्रस्थापित करण्याचा प्रयत्न भूदान करीत नाहीं; हृदयपरिवर्तनानें ती अस्तित्वांत आणूं पहाते आणि यामुळें तें नैतिक आंदोलन समजलें जातें. राज्यसत्ता आणि नीति यांच्या पारस्परिक संबंधाविषयींचा वादग्रस्त विषय क्षणभर बाजूस ठेवला तरी भूदान-आंदोलनाच्या मार्गासंबंधीं एकदोन प्रश्न मनांत उभे राहिल्यावांचून रहात नाहींत. हृदयपरिवर्तन घडवून आणतांना परंपरागत धार्मिक कल्पना, रूढ समजुती व श्रद्धा यांचाहि उपयोग अनेकवार करून घेतला जातो आणि त्यामुळें सामाजिक जबाबदारीच्या जाणिवेची स्पष्टता मंदावते. आणि विवेकबुद्धीऐवजीं दयेच्या भावनेलाच आवाहन दिलें जातें. त्याचप्रमाणें हृदयपरिवर्तनावर आधारलेलें नैतिक आंदोलन असूनहि, विशिष्ट फलप्राप्तीसाठीं विशिष्ट कालमर्यादा घालण्याची आणि फलाचे इष्टांक ठरविण्याची प्रवृत्ति त्यांत आढळते. ती केवळ कार्यकर्त्यांची कार्यप्रवणता वाढविण्याच्या हेतूनें त्यांत आली आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण, ठराविक काळांत अपेक्षेप्रमाणें जमीन न मिळाल्यास ती मिळविण्याचा मार्ग बदलण्याची म्हणजे सत्याग्रहाचीहि भाषा बोलली जाते. ही प्रवृत्ति एका परीनें रूढ राजकीय दृष्टिकोणाचीच द्योतक आहे. आंदोलनाच्या मूळ नैतिक दृष्टिकोणाशीं ती कितपत संवादी ठरेल हा एक प्रश्नच आहे; किंबहुना ती विसंवादीच आहे असें म्हणावें लागेल. हृदयपरिवर्तनाच्या मार्गाच्या शुचितेवरील श्रद्धेच्या शुद्धतेला या प्रवृत्तीनें बाध येतो आणि प्रसंगीं प्रत्यक्ष वर्तनक्रम त्या मार्गापासून ढळण्याचाहि संभव निर्माण होतो हें विसरतां येत नाहीं.

## आंदोलन व राज्यसंस्था– कायदे यांचा संबंध

भूदान-आंदोलनाविषयीं वैचारिक गोंधळ निर्माण होण्याचें आणखी एक महत्त्वाचें कारण म्हणजे आंदोलनाचा राज्यसंस्था व कायदे यासंबंधींचा दृष्टिकोण हें होय. या दृष्टिकोणांत दोनतीन निरनिराळ्या छटा आढळतात. यांतील एकीचा उल्लेख वर आला आहेच. इष्ट वाटणारा बदल राज्यसत्तेवर विसंबून न रहातां दंडनिरपेक्ष रीतीनें, स्वयंस्फूर्तीनें किंवा हृदयपरिवर्तनानें व तज्जन्य कृतीनें घडवून आणावयाचा व त्यासाठीं आंदोलनाची उभारणी करावयाची. दुसरा विचार म्हणजे कायद्यानें इष्ट तो बदल होण्यासाठीं प्रथम जनशक्ति किंवा लोकमत निर्माण होणें आवश्यक आहे. लोक स्वेच्छेनें जें करण्यास प्रवृत्त होतात त्याची पूर्तता करण्यासाठींच कायदा अस्तित्वांत येणें योग्य होय. कायदा म्हणजे 'पूर्णविराम.' आणि तिसरा विचार कायदे परिणामकारक होण्यासाठीं अनुकूल सामाजिक वातावरण निर्माण होणें जरूर आहे आणि अशा प्रकारचें वातावरण निर्माण करण्याचा भूदान-आंदोलनाचा प्रयत्न आहे. – पहिला विचार राज्यसंस्थेबद्दल शंका व्यक्त करणारा आणि शासनमुक्त समाजाच्या उद्दिष्टाला मान्यता सूचित करणारा आहे. दुसऱ्यांत, शासनसंस्थेच्या अस्तित्वाला मान्यता अभिप्रेत आहे. पहिल्यांत कायद्यांचें स्थान हळुहळु लोकांकरवीं स्वेच्छेनें पाळले जाणारे नियम घेऊं शकतील ही कल्पना आढळते. दुसऱ्यांत कायदा, कायदा या स्वरूपांतच आढळतो. पहिल्यांत बंधनांचा ( अर्थात् शासनसंस्थेकरवीं लादलीं जाणाऱ्या बंधनांचा ) अभाव दर्शविला जातो; दुसऱ्यांत कांहीं अल्पसंख्याकांवर कां होईना परंतु तीं लादल्या जाण्याच्या कल्पना अभिप्रेत आहे. याचप्रमाणें दुसऱ्या व तिसऱ्या विचारांतहि फरक दाखवतां येणें शक्य आहे. बहुतेकांचें हृदय-परिवर्तन झाल्यानंतर अस्तित्वांत येणारे कायदे दुसऱ्या विचारांत अभिप्रेत आहेत. उलट, तिसऱ्यांत आज शासनसंस्थेकरवीं होणारे कायदे अभिप्रेत आहेत. या सगळया छटा व त्यांत अंतर्भूत असलेल्या निर-








निराळया कल्पना यांचा विस्तारानें ऊहापोह करण्याचें हें स्थळ नव्हे. शासनसंस्था, कायदा व मालकीचा प्रश्न यांचा अत्यत निकटचा संबध असल्यामुळेंच त्यांचा येथें थोडक्यांत उल्लेख केला आहे. त्यांपैकीं तिसरा विचार मात्र कांहींशा विस्तारानें तपासून पहाणें जरूर आहे.

### एक संभाव्य विसंगति !

कायद्यांसाठीं जनशक्ति निर्माण करूं इच्छिणारें आंदोलन हें इष्ट स्वरूपाचा कायदा यावा याकरितां प्राथमिक पूर्वतयारी करणारें आंदोलन होय. उलट, कायदा यशस्वी व्हावा यासाठीं अनुकूल वातावरण निर्माण करावयाचें आंदोलन हें बव्हंशीं पूरक स्वरूपाच बनतें. प्रस्थापित सत्तेशीं विरोधाच्या भूमिकेंत जाण्याचा संभव पहिल्यांत आढळतो; दुसऱ्यांत तो निर्माण होऊं शकत नाहीं. भूदान-आंदोलन हें अशा प्रकारचें पूरक आंदोलन म्हणतां येईल कीं नाहीं याबद्दल शंका आहे. अर्थात पूरक स्वरूपाचें आंदोलन म्हटल्यानें त्याला लागलींच गौणत्व प्राप्त होतें असें मात्र समजण्याचें कारण नाहीं. कायदे यशस्वी करण्याचा प्रयत्न करीत असतांनाच, झालेल्या किंवा होऊं घातलेल्या कायद्यांत सुधारणा करण्याचें कार्यहि तें करूं शकतें. तथापि, भूदान-आंदोलन हें अशा प्रकारचें आंदोलन दिसत नाहीं. स्वातंत्र्योत्तर काळांतील शासनसंस्थच जमिनी-बाबतचें धोरण आणि त्याअनुसार होणारे कायदे यांचें स्वरूप तपासून पाहिल्यास हें ध्यानांत आल्यावांचून रहाणार नाहीं. शासनसंस्था आणि प्रत्यक्ष कसणारा यांच्यांमधील मालकी हक्क असलेले मध्यस्थ नाहींसें करणें, खुद्द कसणुकीसाठीं ठराविक क्षेत्र ठराविक काळांत आपणांकडे घेण्याचा मालकाचा हक्क मान्य करून उर्वरित क्षेत्रांतील कुळांना संरक्षण देणें व मालकी हक्काबद्दल नुकसानभरपाई हप्त्याहप्त्यानें पुरी करून खंडानें करीत असलेल्या जमिनीचे मालक बनण्याची कुळांना सवलत देणें, मालकीच्या क्षेत्राची कमाल मर्यादा ठरविणें, आणि कसणुकीच्या क्षेत्राचे अधिकाधिक तुकडे पाडण्यास मज्जाव करून असलेले तुकडे एकत्र आणून सहकारी पद्धतीनें कसणूक करण्यास उत्तेजन देणें–इत्यादि बाबींचा आजच्या सरकारी धोरणांत अंतर्भाव होतो. आणि जमिनीबाबत-च्या कायद्यांत त्यांचेंच प्रतिबिंब पडलेलें दिसतें. या धोरणाचा व कायद्यांचा रोख जमिनीची मालकी मूठ-भर लोकांकडून काढून प्रत्यक्ष कसणूक करणाऱ्या बहु-संख्य शेतकऱ्यांकडे जावी असा आहे. कुळांना मालक बनविण्याचा हेतु त्यांत आहे. शासनसंस्थेचें हें धोरण आणि मालकीसंबंधीं भूदान-आंदोलनाचा दृष्टिकोण यांत मेळ घालणें कठिण आहे. किंबहुना तीं परस्परांशीं विसंगत आहेत असेंच म्हणावें लागतें. अर्थात् ही विसंगति आज प्रत्यक्षांत भासण्यासारखी नाहीं; ती केवळ तर्कसिद्ध आहे. सगळी जमीन भूदानपद्धतीनें सामाजिक मालकीची होण्याची किंवा प्रत्येक तुकडा प्रत्यक्ष कसणाऱ्याच्या मालकीचाच असण्याविषयीं शासनसंस्थेनें आग्रह धरण्याची वेळ अजून आलेली नाहीं. ती कधींकाळीं येईल कीं नाहीं हाहि एक प्रश्नच आहे. यामुळें एकाच समाजव्यवस्थेंत दोन भिन्न स्वरू-च्या मालकी हक्काखालीं असलेली जमीन अस्तित्वांत असण्याचाच प्रश्न काय तो वरील विसंगतीमुळें निर्माण होतो इतकेंच. भावी विकासकार्यक्रमाच्या दृष्टीनें दोन्ही पद्धतींतून प्रत्यक्ष येणारा अनुभव प्रयोगात्मक स्वरूपांत विचारांत घेतला पाहिजे.

### मालकी हक्कांचा प्रश्न हा साधनांचा प्रश्न

मालकी हक्क हा सामाजिक मान्यतेवर आधारलेला हक्क आहे. या दृष्टीनें त्यासंबंधीं पूर्वनिर्णीत दृष्टिकोण स्वीकारणें इष्ट नव्हे. समाजसंस्थेचा आर्थिक व्यवहार व्यवस्थितपणें चालावा, सामाजिक घटकांच्या म्हणजे व्यक्तींच्या स्वातंत्र्याला बाध न येतां त्याचा विकास व्हावा यासाठीं उत्पादन म्हणजे सुबत्ता आणि विभागणी म्हणजे सामाजिक न्याय यांचे प्रश्न समाधानकारकपणें सुटावेत अशा प्रकारची या हक्काची मांडणी होणें इष्ट आहे. आणि हे मूलभूत प्रश्न सुटण्याच्या दृष्टीनें अडचणी निर्माण करणारे हक्क नाहींसें होणें म्हणजेच मालकी हक्कांची वेळोवेळीं पुनर्मांडणी होणें हेंहि आवश्यक आहे. तात्पर्य, खाजगी किंवा सामाजिक मालकी किंवा अंशतः खाजगी आणि अंशतः सामाजिक मालकी या सर्वांचें स्वरूप 'साधन' हेंच आहे. त्यांना साध्याचें स्थान देतां यावयाचें नाहीं. व्यक्तींचें स्वातंत्र्य, त्यांच्या व्यक्ति-मत्त्वाचा विकास हेंच साध्य होय आणि तें अधिकाधिक प्रमाणांत प्राप्त होण्यासाठीं उत्पादनवाढ आणि उत्पादित संपत्तीची न्याय्य विभागणी या आर्थिक क्षेत्रांतील












महत्त्वाच्या गरजा आहेत. त्या पुऱ्या होण्याच्या दृष्टीनें कोणत्या प्रकारची मालकी हक्कांची रचना उपयुक्त ठरेल हा खरा प्रश्न आहे. ती ठरवितांना या गमकांचा अर्थ स्पष्ट झाला पाहिजे. त्याबरोबरच विशिष्ट मालकी हक्कांचें स्वरूप, त्यांच्या मर्यादा, त्यांना मुरड घालण्याची शक्याशक्यता इत्यादींचाहि विचार होणें जरूर आहे. खाजगी व सामाजिक — हें द्वंद्व मालकी हक्कांच्या दृष्टीनें दोन आत्यंतिक टोकें दर्शविणारें आहे. पूर्णतया खाजगी संपत्ति कोठेंहि अस्तित्वांत नाहीं; सर्वच समाजाच्या मालकीचें कोठेंहि संभवत नाहीं. म्हणून खाजगी मालकी अडचणी निर्माण करतें असें दिसतांच लागलीच सामाजिक मालकीकडे धांव घेण्याची जरूरी नाहीं. रचनात्मक ( structural ) बदलच काय तो इष्ट, कार्यात्मक ( functional ) बदल हा अपुरा व वरवरचा बदल होय असें समजण्याचें कारण नाहीं. रचना व कार्य हीं परस्परावलंबी आहेत. रचनात्मक बदल केल्यानें जसें कार्य बदलतें त्याचप्रमाणें कार्यात्मक बदलानें रचनेवरहि परिणाम होतो, तिचेंहि स्वरूप बदलतें. यामुळेंच मालकी हक्कांचें स्वरूप आज कितीतरी गुंतागुंतीचें झालें असून खाजगी कीं सामाजिक या द्वंद्वाला गौणत्व प्राप्त होत आहे. खाजगी मालकी म्हणजे भांडवलशाही हें समीकरण मांडणें बरोबर नाहीं. खाजगी मालकी हो भांडवलशाहीपेक्षां कितीतरी जुनी आहे. आणि ती अस्तित्वांत राखूनहि भांडवलशाही अर्थव्यवस्था नाहींशी झालेली तत्त्वतः कल्पिणें शक्य आहे. तसें प्रत्यक्ष व्यवहारांतहि अशक्य आहे असें समजण्याचें मुळींच कारण नाहीं. उत्पादनसाधनांची खाजगी मालकी आणि भांडवलशाही यांचेंहि समीकरण वरील कारणास्तवच मांडतां येऊं शकत नाहीं. शिवाय, उत्पादनसाधनें खाजगी मालकीचीं असल्यास स्पर्धेवर आधारलेलाच आर्थिक व्यवहार संभवतो असें नाहीं. खाजगी मालकीचीं उत्पादनसाधनें आणि सहकार्य हीं देखील एकत्र नांदू शकतात. तात्पर्य, मालकी हक्कांचा प्रश्न हा साधनांचा प्रश्न आहे. विशिष्ट प्रकारच्या मालकी हक्कांना विशिष्ट स्वरूपाचें स्वयंसिद्ध मूल्य वा महत्त्व आहे असें म्हणतां येत नाहीं. खाजगी मालकी म्हटली कीं अनिष्ट, सामाजिक म्हटली कीं इष्ट असें गृहीतकृत्य धरून विचार करणें अयोग्य होय. मालकी हक्कांचें मूल्य वा महत्त्व त्यांच्या कार्यावरूनच निर्णीत केलें पाहिजे.

खाजगी मालकी हक्कांना आत्यंतिक विरोध ज्या मार्क्सवादांत प्रकट झाला त्यांत देखील मालकी हक्कांना साध्याचें स्वरूप दिलें गेलें नाहीं, हें लक्षांत घेणें जरूर आहे. किंबहुना भांडवलशाहीची निर्भर्त्सना करतांना मार्क्सनें खाजगी मालकीच्या नियमाच्या नैतिकतेचा आधार घेतल्याचें दिसून येईल. आपल्या श्रमाचें फळ आपणांस मिळणें हा प्रत्येकाचा स्वाभाविक हक्क त्यानें गृहीत धरला; असें होणें यांतच खाजगी संपत्तीचें नैतिक समर्थन होऊं शकतें हें मान्य केलें; या मान्यतें-तून शोषणाची अनैतिकता प्रतिपादिली; आणि अशा शोषणावर आधारलेली अर्थव्यवस्था म्हणून भांडवल-शाहीचा धिक्कार केला. तथापि धिक्कार ही मार्क्सच्या आर्थिक विचारांतील मध्यवर्ती कल्पना नाहीं. भांडवल-शाहीचा शेवट करण्याची आवश्यकता प्रतिपादन कर-तांना मात्र त्या अर्थव्यवस्थेंत आढळणाऱ्या दरिद्री व व बेकार कामगारांकडे दयार्द्र दृष्टीनें पहाणाऱ्या साधूच्या भूमिकेंत मार्क्स दिसत नाहीं; उलट, त्या अर्थ-व्यवस्थेची स्थिति व गति यांचे नियम सूक्ष्म व तर्क-कठोर पद्धतीनें शोधून काढूं पहाणाऱ्या शास्त्रज्ञाच्या रूपांत तो उभा राहतो आणि आपला निष्कर्ष पुढें मांडतो. हजारों लोक दरिद्री आहेत म्हणून भांडवलशाही नष्ट केली पाहिजे असा आदेश तो देत नाहीं. उत्पा-दनसाधनांची खाजगी मालकी त्या साधनांच्या विकासा-च्या म्हणजेच उत्पादनवाढीच्या म्हणजे सुबत्तेच्या मार्गांत धोंड बनते आणि अशा वेळींच ती नाहींशी करणें आवश्यक ठरते असें शास्त्रीय गमक तो पुढें मांडतो. सामाजिक न्यायाऐवजीं विकासाची बैठकच त्यानें अखेरीस पतकरली. कारण न्यायाच्या कल्पनेंत, समतेंत, विकासाकडे दुर्लक्ष होणें संभवतें. सुबत्तेप्रमाणें-च दारिद्र्याची देखील समान वांटणी होऊं शकते व शेवटीं विनाश संभवतो. तथापि न्यायाकडे दुर्लक्ष करणारा विकास हा मात्र चालू राहूं शकत नाहीं. तो घोटाळतो, अडखळतो, उत्पादन-स्वरूपांत विपरीतता आणतो आणि अखेरीस न्यायाकडे लक्ष न दिल्यास स्थगित होतो. मार्क्सनें केलेल्या भांडवलशाहीच्या समी-क्षेवरून हीच गोष्ट स्पष्ट होते. येथें मुख्य प्रश्न मार्क्सच्या विचारांचा नसून विचारपद्धतीचा आहे. आणि ती पद्धति मालकी हक्कांना ' साध्य ' म्हणून मानणारी










नसून त्यांचा 'साधन' या दृष्टीनेंच विचार करणारी आहे.

## विकास व न्याय यांत समतोलपणा

वरील विवेचनाचा अर्थ सामाजिक न्यायाचें स्थान गौण आहे असा नाहीं. विशिष्ट मालकी हक्कांच्या इष्टानिष्टतेविषयीं विचार करतांना जीं गमकें वापरावयाचीं त्यांच्यांत एकांगीपणा येतां कामा नये एवढेंच त्यांत सूचित करावयाचें आहे. सामान्यतः मागासलेल्या व दरिद्री आर्थिक जीवनांत आत्यंतिक स्वरूपाची आर्थिक विषमता अत्यंत धोक्याची ठरण्याचा संभव असतो. सामाजिक कलह आणि विघटन तिच्यांतून उद्भवूं शकतात. त्यामुळें ती नाहींशी करण्याचे प्रयत्न हे स्वागतार्हच म्हटले पाहिजेत. अशा प्रयत्नांना प्रेरणा देणारी दलितांविषयींची तळमळ ही एक नैतिक आणि संवादी सामाजिक रचनेच्या निर्मितीस कारणीभूत होणारी अत्यंत महत्त्वाची पोषक स्वरूपाची भावना होय. तथापि या भावनेनें प्रेरित झालेलें कार्य घडत असतांना आर्थिक विकासाच्या मार्गांत अडचणी निर्माण होतां कामा नयेत. कारण, विकास ही देखील तितकीच महत्त्वाची नैतिक गरज आहे. स्थिर वा स्थगित आर्थिक जीवनांत सामाजिक न्यायाचा प्रश्न कसा सोडवावयाचा ही आजची महत्त्वाची गरज नाहीं; तर सामाजिक न्यायाकडे दुर्लक्ष न होतां तो अधिकाधिक प्रमाणांत प्रस्थापित होऊं शकेल अशा पद्धतीनें विकास कसा घडवून आणावयाचा हा खरा प्रश्न आहे. सामाजिक रचनेच्या प्रश्नाला हात घालतांना केवळ सभोंवतालची परिस्थिति पाहून चालत नाहीं. आज प्रत्यक्ष जे आहेत त्यांच्या हिताबरोबरच जे अजून जन्माला यायचे त्यांच्याविषयींचीहि जबाबदारी ध्यानांत घ्यायची असते. आज अस्तित्वांत असणारांबरोबरच उद्यां येणारांनाहि न्याय द्यायचा असतो. आजचे आणि उद्यां येणारे अशा सर्वांनाच न्याय मिळण्याची पूर्व किंवा प्राथमिक गरज पुरी करणें हें विकासाचें कार्य आहे. तें करण्याचा प्रयत्न करतांना विकासाच्या तात्त्विक व तांत्रिक गरजा आणि विशिष्ट अर्थव्यवस्थेच्या चौकटींत तो घडवून आणावयाचा म्हटल्यानें त्या अर्थव्यवस्थेच्या नियमानुसार निर्माण होणाऱ्या गरजा यांतील तारतम्य ध्यानांत घेतलें पाहिजे. तात्पर्य, विकास आणि न्याय या दोहोंत गतिमान् परिस्थितींत समतोलपणा राखीत जाणें ही महत्त्वाची गरज होय. ती पुरी करणारा दृष्टिकोणच सामाजिक पुनर्रचनेचा योग्य दृष्टिकोण होय असें म्हणतां येईल.

## विकासाचा प्रश्न बिकट होण्याचा संभव

या दृष्टीनें भूदान-आंदोलनाचा महत्त्वाचा अपुरेपणा त्यांतील एकांगी दृष्टिकोणांतून उद्भवतो असें वाटतें. सामाजिक न्यायावर भर देऊन समतेला पोषक अशी अत्यंत महत्त्वाची नैतिक भावना जागृत करण्याचा फार मोठा प्रयत्न या आंदोलनानें केला आहे यांत संशय नाहीं. तथापि तो करीत असतांना उत्पादनवाढीच्या वा विकासाच्या प्रश्नाकडे हें आंदोलन लक्ष देत नाहीं; किंबहुना त्याच्या योगानें जमिनीचे आजच्यापेक्षांहि अधिक लहानलहान तुकडे होऊन विकासाचा प्रश्न अधिकच बिकट होण्याचा संभव आहे हा आक्षेप प्रसिद्ध आहे. आंदोलनाच्या भूमिकेंत त्याचें समाधानकारक उत्तर मिळूं शकत नाहीं असें वाटतें. आज देशांतील शेतीचें यांत्रिकीकरण केलें पाहिजे आणि अग्रयावत् यंत्रसामग्रीच्या दृष्टीनें आवश्यक असलेलें कसणुकीचें क्षेत्र हेंच योग्य वा किमान क्षेत्र समजलें पाहिजें असें नाहीं. हा मार्ग अव्यवहार्य आणि तूर्तास अशक्यहि आहे. त्याच्या इष्टतेविषयींहि शंका आहे. तथापि शेतीचें उत्पादन वाढवावयाचें झाल्यास कमाल क्षेत्रापेक्षांहि उत्पादनदृष्टीनें किमान क्षेत्राचाहि विचार करणें आवश्यक आहे आणि उत्पादनपद्धतींत जसजशी सुधारणा होत जाईल तसतशी या क्षेत्राची मर्यादा वाढेल हें ध्यानांत घेणें जरूर आहे. मोठीं क्षेत्रें नाहींशीं करून त्यांची लहानलहान तुकड्यांत विभागणी करणें आणि लहानलहान तुकड्यांची जुळणी करून त्यांतून मोठीं क्षेत्रें निर्माण करणें या दोन्ही गोष्टी एकसमयावच्छेदेंकरून आज होत आहेत. यावर आंदोलनाकरवीं वांटण्यांत येणाऱ्या जमिनीची सहकारी पद्धतीनें कसणूक होईल असा प्रयत्न केला जातो असें उत्तर मिळण्याचा संभव आहे. तथापि तें समाधानकारक म्हणतां येत नाहीं. उत्पादनवाढीच्या गरजा ध्यानांत घेऊन विशिष्ट क्षेत्रमर्यादेहून लहान तुकड्यांत मिळालेली जमीन विभागावयाची नाहीं असा दृष्टिकोण आंदोलनांत आहे काय आणि असल्यास ही क्षेत्रमर्यादा किती व कशी ठरविण्यांत येते ? सामाजिक गरजा पुऱ्या होण्याच्या












दृष्टीनें जमिनीचा योग्य उपयोग कसा करावयाचा याचा विचार आंदोलनानें केला आहे काय ? आणि तो ध्यानांत घेऊन प्रत्यक्षांत असलेल्या कसणुकीच्या क्षेत्रांत कशा प्रकारें बदल करावयाचे यासंबंधीं आंदोलन विचार करतें काय ? — हे खरे प्रश्न आहेत. गांवाच्या मालकीची जमीन झाली म्हणजे गांव ते सोडवूं शकेल हा विचार फारसा समाधानकारक नाहीं. जीवनाच्या गरजा कमींत कमी करण्याचें धोरण स्वीकारल्यावांचून ग्रामीण स्वयंपूर्णतेची कल्पनाहि करवत नाहीं. प्रत्यक्ष व्यवहार तर अशक्यच आहे. आणि ह्या स्वयंपूर्णतेच्या कल्पनेचा आधार घेणें म्हणजे विकासाची कल्पना सोडून दारिद्र्याचीच शक्य तों समान विभागणी करण्याचा मार्ग स्वीकारणें होय.

या एकांगी दृष्टिकोणामुळें भूदान-आंदोलन हें भूमीचा प्रश्न सोडविण्यास समर्थ होऊं शकत नाहीं; तें केवळ कांहीं मर्यादेपर्यंत साहाय्य करूं शकतें. त्याचप्रमाणें नैतिक भावनेला आवाहन देऊन तो प्रश्न शांततेनें सुटण्यास अनुकूल वातावरणहि निर्माण करूं शकतें. तथापि जमिनीचा प्रश्न सोडविण्याच्या व्यापक प्रयत्नांतील एक महत्त्वाचा भाग म्हणून तें समजलें जाणेंच योग्य होईल. आणि या दृष्टीनेंच त्याचें स्वरूप व महत्त्व यांचें योग्य व विवेकपूर्ण मूल्यमापन झालें पाहिजे. भूदान-विषयक अभिनिवेशांतून अशा मूल्यमापनांत अडचणी निर्माण होण्याचा संभव आहे. सामाजिक-आर्थिक समतेबरोबरच सुबत्तेचेंहि आश्वासन साम्यवाद देतो. सुबत्तेवांचूनच्या समतेंत भ्रमनिरासहि होण्याचा संभव आहे. यामुळें भूदान-आंदोलन हें साम्यवादाचा पर्याय होऊं शकत नाही; त्या पर्यायाचा एक भाग हेंच स्थान त्याला प्राप्त होऊं शकतें. आणि तो पर्याय शोधण्याचे प्रयत्न व तो प्रत्यक्षांत आणण्याचें कार्य चालूच रहाणें इष्ट आहे. तथापि या कामांत सहायभूत ठरण्याऐवजीं या आंदोलनांतून अडचणी निर्माण झाल्यास तें एक मोठें दुर्दैवच म्हणावें लागेल.

## साधुत्वाला शास्त्राची जोड देणें आवश्यक

अशा अडचणी निर्माण होण्याचीं कांहीं महत्त्वाचीं कारणें सांगतां येतील. एक म्हणजे मालकीच्या प्रश्नाविषयीं भूदान-आंदोलनांत घेतला जाणारा पूर्वनिर्णीत दृष्टिकोण हें होय. "खाजगी संपत्ति ही चोरी आहे" हा या दृष्टिकोणाचा आत्यंतिक स्वरूपाचा आविष्कार आहे. आणि संपत्तीचे निरनिराळे प्रकार, तद्विषयक हक्कांचें स्वरूप व मर्यादा, त्यांचीं कार्यें व केवळ आर्थिकच नव्हे तर राजकीय, सामाजिक, कौटुंबिक जीवनावर आणि व्यक्तीव्यक्तींच्या पारस्परिक संबंधांवर होणारे परिणाम यांच्यासंबंधी समीक्षक दृष्टिकोण वाढीस लावण्याऐवजीं विशिष्ट भावनेला जागृत करणाराच हा विचार आहे. त्यांतून निर्माण होणारा धोका मागासलेल्या परिस्थितींत अज्ञानामुळें व अडाणीपणामुळें कितीतरी वाढण्याचाच संभव आहे. परंतु केवळ परिणामाच्या दृष्टीनेंच नव्हे तर तात्त्विक दृष्ट्या देखील ही घोषणा चुकीची आहे. आणि म्हणून मालकी हक्कासंबंधींचा या आंदोलनांत आढळणारा एकांगीपणाचा विचार सोडला जाणें आवश्यक आहे. संपत्तिदान, श्रमदान, जीवनदान इत्यादि विचारांच्या योगानें सामाजिक क्रांतीचा वा नवरचनेचा व्यापक विचार व्यक्त होतो असें नसून भूदानांतील एकांगी कल्पनाच अन्य क्षेत्रांत लागूं करण्याचा तो प्रयत्न होय. आणि तो तपासून पाहिल्यास सर्व क्षेत्रांत मूळ विचाराशीं सुसंगत ठरणार नाहीं, असें वाटतें. त्यांतून व्यापक, प्रमाणबद्ध, तर्कशुद्ध समाजरचनेचा विचार वा आदर्श निघण्याऐवजीं सामाजिक जीवनाच्या विविध क्षेत्रांत एकांगी दृष्टि शिरण्याचाच संभव अधिक आहे. आणि जमिनीच्या प्रश्नाबाबत तिला मिळालेलें यश इतर क्षेत्रांत मिळूं शकेल कीं नाहीं हा एक प्रश्नच आहे. सामाजिक नवरचनेबाबतच्या प्रचलित विचारसरणींतले धोके अधिकाधिक स्पष्ट होत आहेत. अशा अवस्थेंत त्यांचा प्रत्यही वाढूं पहाणारा लोंढा रोखून जनशक्तीला अन्य योग्य वाट काढून देण्याची इच्छा अत्यंत स्वागतार्हच म्हटली पाहिजे. तथापि हें काय केवळ सदिच्छेचें, सद्भावनेचें नाहीं; तिला विचारांची जोड मिळाली पाहिजे; नव्हे मार्गदर्शन पाहिजे. साधुत्वाला शास्त्राची संगति मिळणें आवश्यक आहे. मार्क्सच्या विचारसरणीचें हेंच वैशिष्ट्य आहे. प्रेरणा देणारी सद्भावना घेऊन तिला अधिक शुद्ध व विकसित विचारांची जोड दिल्यावांचून पुढें जातां येणें कठिण आहे.








तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# भूदान-आंदोलन व सत्याग्रहमीमांसा

सत्याग्रहाचें तत्त्व हें नीतिशास्त्रदृष्ट्या अत्यंत गंभीर व गहन आहे. म्हणून त्या बाबतींत जोखीमहि फार जबरदस्त आहे. मोठ्या सामाजिक समस्या सोडविण्याचें एक श्रेष्ठ साधन म्हणून म. गांधींनींच प्रथम त्याला प्रतिष्ठा व पदवी प्राप्त करून दिली आहे. म. गांधींचे आध्यात्मिक वारस संत श्री. विनोबा सत्याग्रहाची ही परंपरा जिवंत ठेवीत आहेत. विनोबांनींहि आर्थिक समस्या सोडविण्याच्या चळवळींत सत्याग्रहाचा उपयोग संकल्पित केला आहे. या संकल्पाची सत्याग्रहरूप प्रतिकारांत परिणति होण्याची शक्यता पुष्कळच आहे व तशी घोषणाहि झाली आहे. म्हणून त्यासंबंधीं थोडीशी मीमांसा करणें हितावह होईल.

म. गांधींच्या सत्याग्रह-चळवळीचें मुख्य उद्दिष्ट राजकीय होतें व त्या चळवळीला त्यांच्या हयातींतच साफल्यहि आलें. त्यामुळें राष्ट्रव्यापी सत्याग्रहाचा प्रयोग करणारा पहिला ऐतिहासिक पुरुष म्हणून गांधींबद्दल इतिहास साक्ष देत राहील. हिंदुस्थानांतून ब्रिटिश स्वखुषीनें गेले याची जीं अनेक मूल-भूत महत्त्वाचीं कारणें आहेत, त्यांत गांधींचा सत्याग्रही लढा हें महत्त्वाचें कारण म्हणून गणणें भारतीय स्वातंत्र्याच्या इतिहासास प्राप्तच आहे. सत्याग्रही राजकीय चळवळीमुळें इंग्रजास राज्य चालविणें अशक्यप्राय झालें असा जर कोणी दावा करील, तर तो दावा खरा असो अथवा नसो निदान तें सत्याग्रहाचें भूषण ठरणार नाहीं. सत्याग्रहाचें खरेंखुरें नैतिक साफल्य प्रतिपक्षाचें हृदयपरिवर्तन हें होय. कारण राज्य चालविणें अशक्य होणें ही एक प्रकारची जबरदस्तीच होय. हृदयपरिवर्तनाची खरीखुरी तर्कप्राप्त परिणति म्हणजे स्वखुषीनें सत्याला आचरणांत मान्यता देणें हीच होय. आचरण हेंच हृदयपरिवर्तनाचें प्रत्यक्ष प्रमाण होय.

म. गांधी ज्या ऐतिहासिक व राजकीय परिस्थितींत सत्याग्रहाचें द्रष्टे व प्रणेते म्हणून पुढें आले त्यांत सत्याग्रहास अत्यंत अनुकूल अशीच राजकीय पार्श्वभूमि लाभली होती. ही अनुकूलता सत्याग्रहाच्या प्रश्नाला नैतिक दृष्ट्या अत्यंत पोषक होती. नैतिक दृष्ट्या पोषक होती असें म्हणण्याचें कारण असें कीं, प्रतिपक्षास म्हणजे ब्रिटिश सत्तेस, राजकीय स्वायत्तता हा भारताचा नैतिक हक्क आहे व त्यास अनुसरून भारतास स्वराज्याचे हक्क बहाल करणें क्रमप्राप्तच आहे, हें तत्त्वतः मान्य झालें होतें. यास कालमर्यादा किती व कोणी घालावी याबद्दलच म्हणजे तपशीलाचा मतभेद होता. दुसरें असें कीं, जागतिक प्रथम महायुद्धाच्या कालांत व समाप्तीनंतर जगांतील सर्व राष्ट्रांना व प्रजांना राजकीय स्वयंनिर्णयाचा हक्क प्राप्त व्हावयास पाहिजे, ह्या सिद्धान्तास विजयी पाश्चात्त्य राष्ट्रांत मान्यता प्राप्त झाली होती. त्यामुळें भारताच्या राजकीय स्वयंनिर्णयाचें तत्त्व उभयपक्षसंमत व सर्वमान्य असेंच सत्य म्हणून स्वीकारलें गेलें होतें. म्हणून गांधींची स्वराज्याची निःशस्त्रप्रतिकारात्मक चळवळ ही वास्तविकपणें सत्यावर अधिष्ठित झाली आहे, हें सर्वमान्य झालें होतें. उभयपक्षसंमत व निश्चित स्वरूपाच्या राजकीय सत्याकरितां गांधींचा निःशस्त्र प्रतिकार होता, ही एक नीतिशास्त्रदृष्ट्या अत्यंत अनुकूल अशी बाब होती व ती गांधींच्या सत्याग्रहाला परिपोषक म्हणून लाभली होती.

गांधींच्या सत्याग्रहाच्या पीठिकेंत अशा प्रकारें वैचारिक स्वच्छता प्रत्ययास येते. कारण त्यांतील राजकीय सत्य नैतिक दृष्ट्या सर्वमान्य होतें व अत्यंत स्पष्ट होतें. श्री. विनोबांच्या भूदान-आंदोलनाची पीठिका यापेक्षां फार निराळी आहे. कारण गांधींचा सत्याग्रह मुख्यतः राजकीय होता तर भूदानआंदोलन प्राधान्यानें आर्थिक समस्येशीं निगडित आहे.

भूदान-आंदोलन हें मुख्यतः आर्थिक समस्या सोडविण्याचें साधन अवलंबिण्यांत आलें असून त्याची राजकीय बाजू ही अंगभूत आहे, आर्थिक बाजू हीच प्रधान आहे. हा फरक नैतिक दृष्ट्या महत्त्वाचा आहे. कारण, ज्या आर्थिक समस्या आज समाजापुढें आहेत त्यांचें स्वरूप व गांधींच्या पुढील राजकीय समस्येचें स्वरूप यांत महदंतर आहे. गांधींच्या समस्येच्या राजकीय निर्णयांतील मुद्दा स्पष्ट, विचारतः उभयपक्ष-संमत व सर्वमान्य होता. उलट, आजकालच्या आर्थिक समस्यांचे निर्णय हे विविध प्रकारचे, अस्पष्ट, व अतएव मूलगामी मतभेदाचे असे असल्यामुळें आर्थिक सत्याचें स्वरूप हें गंभीर व गहन राहिलें आहे.

अहिंसेचें तत्त्व मूलतःच मान्य करून ही सत्याग्रहाची मीमांसा येथें करण्यांत येत आहे. कम्युनिस्ट व फॅसिस्ट हे विचारसंप्रदाय अहिंसेच्या तत्त्वास तें एक श्रेष्ठ



अनुक्रमणिका






चिरंतन नैतिक मूल्य म्हणजे जीवनाचें एक श्रेष्ठ शाश्वत ध्येय आहे म्हणून मान्यता देत नाहींत. ती त्यांची भूमिका अमान्य करूनच ही मीमांसा करण्यांत येत आहे. येथें अहिंसेचें तत्त्व मान्य आहे याचा अर्थ असा कीं, वैयक्तिक किंवा वर्गीय स्वार्थाचा त्याग करण्यास माणसें तयार होऊं शकतात व ही तयारी विचारपरिवर्तनानें किंवा हृदयपरिवर्तनानें होऊं शकते, त्याकरितां हिंसेची गरज नाहीं. उच्चतर हिताचा प्रत्यय म्हणजेच नैतिक प्रत्यय होय. उच्चतर हिताचा प्रत्यय हें हृदय-परिवर्तनाचें असाधारण कारण होय. मानवी जीवन हें नैतिक प्रत्ययावरच अधिष्ठित असल्यामुळें नैतिक प्रत्यय ही मानवांतील संपूर्ण परिवर्तन घडवून आणणारी फार मोठी शक्ति आहे. समाज हे सहकार्यावरच चालतात; वर्गविग्रह किंवा अन्य प्रकारचे विग्रह प्रबल झाल्यास समाज विदीर्ण होतात. अहिंसा किंवा मानवी सहानुभूति ही सहकार्यास सतत प्रवृत्त करते. तात्पर्य, अहिंसेचें व सत्याचें अंतिम मूल्य गृहीत धरूनच ही सत्याग्रहाची मीमांसा प्रारंभिली आहे.

विचारपरिवर्तन व हृदयपरिवर्तन या दोन प्रकारच्या वाक्प्रयोगांत एक महत्त्वाचा भेद दर्शित केलेला आहे. एखाद्या व्यक्तीस अमुक एक विचार मान्य असला तरी त्या व्यक्तीचें वर्तन त्या विचारास धरून घडेलच असें सांगवत नाहीं. त्या व्यक्तीच्या भावनांची व वासनांची बैठक त्या विचाराशीं विसंगत असली तर विचारानुरूप वर्तन घडत नाहीं. हृदयपरिवर्तन या कल्पनेंत विचार, भावना व वासना या सर्वांचें परिवर्तन विवक्षित आहे. हृदयपरिवर्तनानें आचरणांत परिवर्तन हमखास होतें. विचारपरिवर्तनापेक्षां हृदयपरिवर्तनास अधिक खोली व व्यापकता आहे. हृदयपरिवर्तन म्हणजे माणसाच्या संपूर्ण अंतरंगाचें परिवर्तन होय. सत्याग्रह हें हृदयपरिवर्तनाचें साधन होय, असा सत्याग्रहाच्या नीतिशास्त्राचा सिद्धान्त आहे. म्हणून असें म्हणतां येतें कीं हृदयपरिवर्तन हा सत्याग्रहाचा मुख्य उद्देश आहे.

सत्याग्रहाबद्दल सत्याग्रहाचे द्रष्टे असें म्हणतात कीं सत्याग्रह हें आत्मशक्तीचें आविष्करण आहे व ही शक्ति भौतिक किंवा पाशवी शक्तीचा प्रतिकार व पराभव करण्याचें निर्वाणीचें व हमखास असें अद्वितीय साधन आहे. दुष्टांचा व पापांचा निग्रह हिंसेनें करणें हें अपरिहार्य, अपवादभूत व न्याय्य मानण्याची परंपरा जगप्रसिद्ध आहे. परंतु हिंसा हें पाप आहे व दोषांचा वा पापांचा निग्रह हें पवित्र वा नैतिक असें उद्दिष्ट किंवा साध्य असलें तरी त्या उद्दिष्टाच्या किंवा साध्याच्या सिद्धीचें साधनहि पवित्र वा नैतिकच असलें पाहिजे. अशुचि अशा भौतिक किंवा पाशवी शक्तीचा प्रतिकार जर अशुचि साधनानेंच करणें अपरिहार्य असेल तर पाप हें पुण्यापेक्षां, अशुचि हें शुचीपेक्षां व भौतिक सामर्थ्य हें नैतिक वा आध्यात्मिक सामर्थ्यापेक्षां या जगांत प्रबळ ठरतें, असें म्हणावें लागेल. एवढेंच नव्हे तर, पवित्र साध्याकरितां अपवित्र साधन वापरणें न्याय्य मानलें तर पवित्र साध्य गांठणेंच दुरापास्त होईल. दुसरें असें कीं, पापाला साधन म्हणून प्रतिष्ठा दिल्यावर नीतीचा किंवा पावित्र्याचा स्वयंसिद्ध महिमाच नष्ट होऊं लागेल. सद्गुण हे स्वयमेव इष्ट आहेत; त्यांची किंमत दुसऱ्या कशानेंहि होऊ शकत नाहीं; सद्गुणांची प्राप्ति हेंच अंतिम साध्य किंवा कल्याण आहे – हा विचार जर लोप पावूं लागला तर नीतीला व सद्गुणाला बाजारी किंमत येईल, मानव्याचा महिमाच नष्ट होईल. तिसरें असें कीं नीति किंवा सद्गुण हें सुखी जीवनाचें जसें साधन आहे तसेंच तें साध्यहि आहे; नीति किंवा सद्गुण यांचें आचरण व दर्शन हेंच साध्य आहे. चवथें असें कीं, मनुष्याच्या जीवनांत नेहमींच नैतिक पेंचप्रसंग उद्भवत असतात. प्रत्येक वळीं इष्ट साध्य सिद्ध करण्याकरितां कोणतेंहि साधन वापरण्याची मुभा दिली तर मनुष्यांची नैतिक श्रद्धाच ढांसळेल व जीवन अधोगतीस जाईल.

सत्याग्रहाच्या तत्त्वज्ञानाच्या मुळाशीं अशी एक श्रद्धा आहे कीं प्रत्येक मनुष्यांत व अर्थात् दुष्ट व पापी मनुष्यांत सुद्धां विवेकशक्ति आहेच. मनुष्याच्या ठायीं वसत असलेल्या विवेकशक्तीला आवाहन व आव्हान देण्याचें मुख्य साधन म्हणजे सत्याग्रह होय. प्रतिपक्ष्याच्याहि ठिकाणीं माणुसकी किंवा सज्जनपणाचें बीज आहे, व सत्याचा साक्षात्कार होऊन दुष्टहि साधु बनतो. म्हणून मनुष्यमात्राबद्दल सहानुभूति ठेवून सत्याग्रहाचें साधन सत्याग्रही वापरण्यास सज्ज होतो. अशी श्रद्धा सत्याग्रहाच्या हृदयांत नसेल तर मनुष्यमात्राबद्दलची सहानभूति शाब्दिक बनेल व सत्याग्रहाचें








मुख्य उद्दिष्ट हृदयपरिवर्तन हें आहे ही मूळ प्रतिज्ञाच व्यर्थ ठरेल. सत्याग्रह्याच्या ठिकाणीं असलेल्या आत्मशक्तीच्या प्रभावानें प्रतिपक्ष्याच्या ठिकाणची आत्मशक्ति जागृत होऊन प्रतिपक्ष्याचें चित्त शुद्ध होतें असें त्याकरितां मानावें लागतें.

विश्वव्यापी मैत्रीची भावना हें सत्याग्रहाचें अधिष्ठान आहे. मनुष्यमात्रांत सदसद्विवेकबुद्धि स्पष्ट वा अस्पष्ट स्वरूपांत आहे, चिरंतन व सर्वव्यापी अशीं कांहीं नैतिक मूल्यें असून तीं त्या विवेकबुद्धीला प्रत्ययास येतात, हें एक गृहीत कृत्य जो धरतो व मनुष्यमात्राच्या जीवनाबद्दल शुद्ध सहानुभूति जो बाळगतो तोच सत्याग्रहास अधिकारी होतो. सत्याग्रह्याची आत्मशक्ति भौतिक पाशवी शक्तीवर विजय मिळविते याचा अर्थ, पाशवी शक्तीच्या अधीन होऊन वर्तन करणाऱ्या मानवांतील आत्मशक्तीस जागृति येऊन पाशवी शक्ति निराधार बनते.

परंतु ही सत्याग्रहाची शुद्ध भूमिका झाली. सत्याग्रहाची एक व्यावहारिक साध्या राजकीय पातळीवरील भूमिका आहे. ती म्हणजे सामाजिक, राजकीय किंवा आर्थिक समस्या आपणास इष्ट दिशेनें सोडविण्याकरितां प्रतिपक्षास म्हणजे आपल्या दृष्टीनें अमान्य अशा पद्धतीनें चालणाऱ्या लोकांस म्हणजेच दुष्ट प्रवृत्तीच्या लोकांस जेरीस आणण्याकरितां व्यक्तीच्या नैतिक वजनाचा, तपस्येचा वा जनतेच्या सामुदायिक दडपणाचा निःशस्त्र प्रतिकाराच्या रूपानें उपयोग करणें ही होय; किंवा दुष्ट म्हणून मानलेल्या व्यक्तींवर व समुदायांवर आपल्या निःशस्त्र प्रतिकारानें स्वदेहदण्डन किंवा अन्य प्रकार आचरून नैतिक जबरदस्ती करणें ही होय. या भूमिकेंत प्रतिपक्षीयांच्या दुष्ट मानलेल्या प्रवृत्तीस प्रत्यक्ष शस्त्राघातावांचून आळा घालणें एवढेंच साध्य ठरतें. हृदयपरिवर्तनाचा प्रश्नच उद्भवत नाहीं.

प्रतिपक्षावरील नैतिक जबरदस्ती हें रूप सत्याग्रहास अनेक कारणांस्तव येऊं शकते. परंतु जेव्हां प्रतिपक्षाची बाजू निखालसपणें हिंसा वा असत्य अतएव अनैतिक असेल तेव्हां ही निःशस्त्र जबरदस्ती अपरिहार्य उपाय म्हणून स्वीकार्य मानतां येईल. म्हणजे ती सशस्त्र प्रतिकाराच्या प्रथेपेक्षां अधिक बरी, असें म्हणतां येईल.

परंतु विशिष्ट माणसाला किंवा विशिष्ट मनुष्यसमूहालाच सत्याचा वा अहिंसेचा वा नैतिक निष्ठेचा मक्ता देवानें दिलेला नाहीं. कित्येक वेळां सत्याग्रहीपेक्षां ज्यांच्या विरुद्ध हें शस्त्र उपसलें जातें त्यांच्या बाजूसहि सत्य वा अहिंसा वा नीति असणें संभवनीय असतें. सत्याग्रह्यास त्याची जाणीव नसेल. जीवनांतील अनेक समस्या अशा असूं शकतात. म्हणून सत्याग्रह्यानें फार नम्रतेनें व सावधपणें जीवनांत सत्याचा शोध घेत राहिलें पाहिजे व सत्याग्रह-प्रतिकार ही नैतिक जबरदस्ती होणार नाहीं, याची खबरदारी घेतली पाहिजे.

याकरितां सत्याग्रह्यानें नैतिक सत्याची थोडी अधिक मीमांसा ध्यानांत घेण्याची आवश्यकता आहे. मानवी जीवन हा सत्याचा निर्णय करण्याची शाश्वतकाळची प्रयोगशाला आहे. सत्य हें अनन्त आहे. तें कोणत्याहि मनुष्यास संपूर्णपणें केव्हांच अवगत होत नाहीं. अधिकांत अधिक जवळ जाणें शक्य आहे, एवढेंच. नैतिक सत्यें सामान्यपणें निर्णीत झालेलीं असलीं तरी विशिष्ट देशकालीं त्यांच्या बाबतींत पेंचप्रसंग उत्पन्न होत राहतात; त्यांतून बाहेर पडण्याचे अनेक मार्ग दिसूं लागतात. प्रत्येक मार्ग अपूर्ण व अशुद्ध असतो. अधिक शुद्ध व जवळचा कोणता या बाबतींतहि मतभेद होऊं शकतात. प्रस्तुत संदर्भांत नैतिक सत्य म्हणजे समाजक्रांतीसंबंधांतील नैतिक सत्य होय. अशा नैतिक सत्याच्या बाबतींत प्रामाणिक मूलगामी मतभेद जेव्हां उद्भवतात तेव्हां ते ध्येयवादाच्या व तत्संबंधीं व्यापक सामाजिक कार्यक्रमाच्या बाबतींत उद्भवतात. कोणत्या ध्येयवादाचें व तत्संबंधी कार्यक्रमाचें अवलंबन करावें अशी ती समस्या असते.

ध्येयवाद व तत्संबंधी व्यापक सामाजिक कार्यक्रम जोंपर्यंत व्यवहारांत प्रत्यक्ष प्रयोग करून तपासले नाहींत तोंपर्यंत त्यांतील सत्य हें मानसिक किंवा केवळ श्रद्धामय असतें. प्रत्यक्ष वस्तुस्थितींत अनुभवलेलें सत्य ही पदवी त्याला नसते. भविष्यकाळांतच प्रयोगांत आणावयाचीं आहेत अशीं जीं सत्यें तीं प्रत्यक्ष वस्तुस्थितीच्या पदवीस आलेलीं नसतात. त्यांच्या बाबतींतले प्रामाणिक मतभेद हे नैतिक दृष्ट्या तुल्यबल होत. प्रत्यक्ष प्रयोगांत सिद्ध न झालेल्या सामाजिक कार्यक्रमासंबंधांत नैतिक सत्याबद्दल जेव्हां मतभेद असतात तेव्हां तेथें सत्याग्रहात्मक प्रतिकाराचा कोणत्याहि मतवाद्यास नैतिक अधिकार रहात नाहीं. जर अशा स्थितींत










आपलेंच मत परम सत्य होय, अशा भावनेनें सत्याग्रह-समर निर्माण झाला तर त्यांत सत्यास फार मोठा धोका पोंचण्याचा संभव असतो. केवळ मानसिक ( Subjective ) अवस्थेंतल्या दोन विरोधी श्रद्धांपैकीं कोणती सत्याश्रित आहे हें प्रत्यक्ष प्रयोगांत सिद्ध होतें. तेथें सत्याग्रही प्रतिकार अनाठायीं ठरतो; एवढेंच नव्हें तर तो सशस्त्र नसला तरी हिंसात्मकच ठरतो. प्रत्यक्ष प्रयोगसिद्ध ( objective ) किंवा उभयसंमत किंवा सर्वमान्य सत्याच्या बाबतींतच सत्याग्रह-प्रतिकार हा नैतिक दृष्ट्या शुद्ध ठरतो.

भूदान-आंदोलनाच्या संदर्भांत ही सत्याग्रहमीमांसा ध्यानांत घेणें जरूर आहे. कारण, हें आंदोलन समाजक्रांतीच्या ध्येयवादाशीं निगडित झालेलें आहे. अहिंसात्मक समाजक्रांति घडवून आणण्याचा दावा तिचे प्रवर्तक व अनुयायी करीत आहेत; विशेषतः अत्यंत गुंतागुंतीच्या आर्थिक नवरचनेच्या कार्यक्रमाच्या उद्देशानें हें आंदोलन प्रवृत्त झालें आहे.

भूमि व संपत्ति यांच्या स्वामित्वाची किंवा स्वत्वाची भूतकाळापासून चालत आलेली वर्तमान पद्धति बदलून तेथें भूमि व संपत्ति यांच्यासंबंधीं उत्पादनाची, विनिमयाची व उपभोगाची नवी व्यवस्था करणें हें या आंदोलनाचें उद्दिष्ट आहे. वर्तमानकालांत जमीनीची व संपत्तीची जी स्वामित्वव्यवस्था व जी आर्थिक पद्धति भारतांत अस्तित्वांत आहे तिच्यांत सामाजिक न्यायाच्या दृष्टीनें मुख्यतः तीन दोष आहेत : एक तर, सर्व व्यक्तींना काम मिळेल अशी त्यांत सोय नाहीं; दुसरें, सर्व भारतीयांचा योगक्षेम चालविण्यास पुरेल इतकें उत्पादन त्यांत होत नाहीं; व तिसरें, अत्यंत श्रीमंत वर्ग त्यांत आहेत व अन्नवस्त्रास महाग झालेल्या श्रमसमर्थ व्यक्तींनीं भरलेल्या जमाती त्यांत आहेत, म्हणजे आत्यंतिक आर्थिक विषमता त्यांत आहे. मोठी बेकारी, अत्यंत अपुरें उत्पादन व आत्यंतिक आर्थिक विषमतेची दर्शक सामाजिक वर्गवारी हे ते तीन दोष होत. हे दोष नैतिक दृष्ट्याहि दोष आहेत, ही सर्वमान्य होण्यासारखी बाब आहे. म्हणून हे तीन दोष नष्ट व्हावे व समर्थ सर्व व्यक्तींस काम सर्वांच्या योगक्षेमास पुरेसें उत्पादन व आत्यन्तिक आर्थिक विषमता राहणार नाहीं असें आर्थिक विभजन या तीन गुणांची आर्थिक पद्धति यावी हें नैतिकदृष्ट्या आवश्यक आहे, हेंहि सर्वमान्य होणारें तत्त्व आहे. तशी पद्धति शोधण्याकरितां अर्थशास्त्रीय विचारांचा अवलंब करणें अपरिहार्य आहे; परंतु त्याबरोबरच नैतिक दृष्टीचेंहि अनुसंधान राखलें पाहिजे, हेंहि विसरतां कामा नये. विद्यमान आर्थिक पद्धति नष्ट केली पाहिजे, एवढ्यानें सत्याग्रह्याची जबाबदारी संपत नाहीं. कारण, अशा आर्थिक समस्येच्या सत्याग्रही संग्रामास विधायक कार्यक्रम व तत्संबद्ध ध्येयवादी विचारसरणी यांचीहि स्पष्ट कल्पना आवश्यक आहे. प्रस्तुत अन्याय्य आर्थिक पद्धति नष्ट करून त्या ठिकाणीं कोणत्या प्रकारची आर्थिक व सामाजिक नवी रचना आणावयाची याबद्दलचीं अनेक प्रकारचीं चित्रें संभवतात. त्यांत प्रामाणिक मतभेदास भरपूर वाव आहे. भावी आर्थिक पद्धतीचें चित्र ज्या तत्त्वांवर आधारलेलें असणार त्या तत्त्वांच्या बाबतींत ध्येयवादी व क्रांतिवादी विचारकांमध्यें आज भरपूर मतभेद आहेत. उदाहरणार्थ, उत्पादनसाधनांवरील खाजगी मालकीचें तत्त्व नष्ट करणें आर्थिक दृष्ट्या व नैतिक दृष्ट्या हितावहच होईल अशी ग्वाही देतां येत नाहीं. जमीनदारी पद्धत नष्ट व्हावी, याबद्दल ध्येयवादी व क्रांतिवादी विचारसरणींत मतभेद नाहींत. परंतु श्रमिकांची वा कसणाऱ्यांची खाजगी मालकी ही भूमिस्वाम्याच्या व्यवस्थेंत आर्थिक व नैतिक दृष्ट्या हितावह होईल, कीं राज्याची वा ग्रामाची वा समाजाची संपूर्ण मालकी आर्थिक व नैतिक दृष्ट्या हितावह होईल, याबद्दल निर्णयावस्था सामाजिक प्रयोगांना आलेली नाहीं. उदाहरणार्थ, जीं आशियांतील व भारतांतील राज्यें वा सरकारें जमीनमालकीची वा जमीनदारीची पद्धति नष्ट करण्यास प्रवृत्त झालीं आहेत त्यांचा मुख्य रोख श्रमिक कुटुंबास आर्थिक दृष्ट्या पुरेशी जमीन वांटण्याकडे आहे. कम्युनिस्ट चीनचें उदाहरण असेंच आहे. कम्युनिस्ट पूर्वयुरोपियन राष्ट्रेंहि सरकारी व सामुदायिक शेतीचे प्रयोग अहितावह ठरूं लागल्यामुळें श्रमिक शेतकऱ्यांच्या वैयक्तिक मालकीच्या तत्त्वाकडे झुकत आहेत. रशियांत काय घडत आहे याबद्दल बाहेरचा निःपक्षपाती व सत्यजिज्ञासु माणूस निर्वाळा देण्याचें धाडस करणार नाहीं.

सत्याग्रहसंग्राम हा आर्थिक व सामाजिक प्रश्नांच्या बाबतींत जेव्हां उपस्थित होतो तेव्हां तत्त्वतः प्रस्थापित राज्यसंस्थेशीं विरोधी असेंच त्याचें स्वरूप राहतें.








कारण संपत्तीच्या स्वाम्याची समस्या शेवटीं कायद्याशीं निगडित असते. जोंपर्यंत कायदा ही संस्था अस्तित्वांत राहणार, तोंपर्यंत आर्थिक समस्या ह्या राज्यसंस्थेशीं अत्यन्त निगडित राहणारच. कायदा व राज्य ज्यांत मुळींच नाहीं, असा भावी समाज कल्पून जर सत्याग्रहाचा संग्राम उभा राहील तर तो काल्पनिक ध्येयाला सत्याचा दर्जा देण्याचें धाडस करीत आहे, असें खुशाल समजावें. एखादें प्रत्यक्षांत नसलेलें परंतु नैतिक दृष्ट्या शुद्ध वाटणारें ध्येय प्रत्यक्ष सृष्टींत अस्तित्वांत आणतां येईलच अशी श्रद्धा बाळगणें योग्य ठरेल. परंतु वस्तुस्थितीच्या नियमास धरून तें असेलच असा भरंवसा देणें मात्र अयोग्य ठरेल. कारण प्रत्यक्ष प्रयोगाशिवाय तसा भरंवसा देऊं नये. प्रत्यक्ष प्रयोगांत आल्यावरच तें वैज्ञानिक सत्य होय, तें निर्विवाद शुद्ध (objective) सत्य होय असें म्हणतां येतें. म्हणून सत्याबद्दल अत्यंत आस्था असलेल्या सत्याग्रह्यास राज्य व कायदा यांचें नैतिक मूल्य कांहीं प्रमाणांत मान्यच केलें पाहिजे.

अशा स्थितींत जी प्रस्थापित राज्यसंस्था कायदा बदलण्यास व नवा प्रयोग करण्यास उद्युक्त आहे तिच्याशीं जर सत्याग्रह्याचा मतभेद असेल तर त्या राज्याविरुद्ध निःशस्त्रप्रतिकारात्मक सत्याग्रहाचें अवलंबन करण्याचा सत्याग्रह्यास नैतिक दृष्ट्या अधिकार पोंचत नाहीं. कारण, अशा स्थितींत दोन्ही सत्यें प्रयोगावस्थेंतील आहेत.

एका परीनें ही अवस्था नैतिक दृष्ट्या फारच महत्त्वाची आहे. कारण हृदयपरिवर्तनाचें सर्वश्रेष्ठ साधन म्हणजे सफल होणारा प्रत्यक्ष प्रयोग हेंच होय. खाजगी मालकी नष्ट करून सामुदायिक मालकीच्या तत्त्वानुसारानें स्वयंप्रेरित सहकार्याच्या साधनानें आर्थिक जीवन सर्वांगीण रीत्या सुधारतें, कीं श्रमिकांची खाजगी मालकी ठेवून व सहकार्य अवलंबून आर्थिक जीवन सर्वांगीण रीत्या सुधारतें हें पहाण्याकरितां या दोन्ही पद्धतींचा प्रत्यक्ष प्रयोग केला पाहिजे. ही महान् तपश्चर्याच आहे. प्रत्यक्ष प्रत्यय हें हृदयपरिवर्तनाचें सत्याग्रही प्रतिकारापेक्षां अधिक उच्च दर्जाचें साधन आहे; त्यामुळें प्रयोगांतीं विग्रहच नष्ट होईल. सत्याग्रही प्रतिकारांत नैतिक जबरदस्तीची शक्यता अधिक असते; ती प्रत्यक्ष प्रयोगांत नाहीं. प्रत्यक्ष प्रत्यय ज्यांना बदलत नाहीं, अशीं माणसें असतील असें वाटत नाहीं तशीं माणसें असलींच तर तीं कांहीं काळच तशीं राहतील. प्रत्यक्ष प्रत्ययानें बदलेपर्यंत वाट पहाण्याइतका धीर सत्यनिष्ठास आवश्यक आहे.

भूमिदान-आंदोलनांतील कांहीं कल्पना अस्पष्ट आहेत. सत्याच्या दृष्टीनें त्यांचें स्पष्टीकरण आवश्यक आहे. उदा०, हवा व सूर्यप्रकाश याप्रमाणें भूमि सर्वांची व्हावयास पाहिजे, असें भूदान-आंदोलनाचे प्रवर्तक सांगतात. हवा व सूर्यप्रकाश हे अर्थशास्त्राचा विषय नाहींत. जें मानवी श्रमानेंच साध्य होतें किंवा जें मानवी गरजांच्या मानानें माणसास कमी प्राप्त होतें, किंवा जें प्राप्त होण्यास एकमेकांतील विनिमयाची जरूर असते तेंच अर्थशास्त्राचा विषय होय. तें माणसांनीं कोणत्या पद्धतीनें वापरावें यासंबंधीं न्यायाचे नियम मानवी संकेतांत बुद्धिपूर्वक तयार होतात. स्वत्व वा स्वामित्व हा मानवी संकेत आहे. तो आर्थिक जीवनाच्या स्वाभाविक न्याय्य अपेक्षेंतून निर्माण झालेला व सामाजिक परिस्थितींत परिवर्तन होऊन बदलत जाणारा न्यायसंबंधी संकेत आहे. न्यायानुरूप तो कसा असावा हें माणसांनींच ठरविलें आहे व न्यायानुरूप नसेल तर तो माणसानें बदलणें जरूर आहे. हवा व सूर्यप्रकाश याप्रमाणें जमीनच नव्हे तर सर्व जीवनोपयुक्त वस्तु जेथें होतील तो अत्यंत अभिलषणीय असा स्वर्ग ठरेल. परंतु तेथें सर्व उपयुक्त वस्तूंची हवा व प्रकाश याप्रमाणें अनन्त समृद्धि व्हावी लागेल. ती बरीचशी काल्पनिक अवस्था आहे. ब्रह्मीभूत भावना झालेले ' सब भूमि गोपालकी ' एवढेंच नव्हे तर " मैं और सब दुनिया गोपालकी " अशा भावनेनें 'अहंता और ममता' यांचें विसर्जन केलेले सर्व जन ज्या जगांत आहेत त्या दिव्य स्थितप्रज्ञांच्या जगांत हवा व सूर्यप्रकाश यांच्याप्रमाणें भूमीच काय परंतु गृह, वस्त्र, पात्र, वाहन, रत्न, देह इत्यादि सर्वच स्वत्व व स्वाम्य यांनीं रहित होईल. तुटीच्या व श्रमसाध्य वस्तूंच्या या जगांत व उपभोग व जीवन यावरील प्रीतीच्या वा आसक्तीच्या या मानवी विश्वांत स्वत्व व स्वामित्व यांची फार चोख रीतीनें (हाडामांसांच्या मानवस्वभावाशीं व वस्तुस्थितीशीं सुसंगत अशा) न्यायावर पुनः पुनः परिस्थितीप्रमाणें मांडणी केली पाहिजे.








श्री. एस्. एम्. जोशी

# सुराज्याचा श्रीगणेशाः भूदान

भूदानाची प्रेरणा होऊन आचार्य विनोबा भावे यांनीं आपल्या पदयात्रेस प्रारंभ केला तेव्हां कार्यकर्त्यांमध्यें त्याबाबत जोराची चर्चा सुरू झाली. पुष्कळसें विचारमंथन होऊन त्या कल्पनेंतील मूलगामित्व आणि उपयुक्तता त्यांना बऱ्याच अंशानें मान्य झाली. भूदानाच्या कार्यांत विनोबांना जें प्रत्यक्ष यश मिळत गेलें त्याचाहि परिणाम कार्यकर्त्यांवर झाला असण्याचा संभव आहे. तथापि आतां कार्यकर्त्यांव्यतिरिक्त अन्य लोकांचें लक्षहि या चळवळीकडे आकृष्ट झालें असून विचारवंत आणि समाजशास्त्रज्ञ यांना देखील या आंदोलनाची दखल घेणें आवश्यक वाटूं लागलें आहे. एका दृष्टीनें विनोबांनीं प्रवर्तित केलेल्या या चळवळीचा तो विजयच समजला पाहिजे.

भूदान-चळवळ ही योग्य कीं अयोग्य, संभाव्य कीं असंभाव्य, याचा निर्णय त्या चळवळीच्या अंतिम यशावरच अवलंबून रहाणार. परंतु तिचें मूल्यमापन सतत होत रहाणें नुसतें स्वाभाविकच नव्हे तर आवश्यकहि आहे. आपल्यापुढें ज्या समस्या आहेत त्या सोडविण्याचा तो एक मूलगामी उपाय आहे. आणि त्यांतील विचार पटला तर तो आत्मसात् करूनच लोकांनीं त्याप्रमाणें आचरण करावें असा विनोबांचा आग्रह आहे. केवळ भावनेला बळी पडून आणि अंधश्रद्धेनें लोकांनीं त्यास मान्यता देऊं नये असें ते कटाक्षानें बजावीत आहेत. त्याचबरोबर आपण हें देखील लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, भूदानाला केवळ नकारात्मक विरोध करून भागणार नाहीं. विरोधकांनीं विद्यमान समस्या सोडविण्याचा अन्य मार्ग न दाखविल्यास त्यांच्या विरोधाला फारसें महत्त्व कोणी देणार नाहीं.

स्वराज्याचें सुराज्य कसें करावें हा आजचा मूलभूत प्रश्न आहे. स्वातंत्र्यलढा देखील समाजाच्या मूलभूत समस्या सोडविण्यासाठींच करण्यांत आला. आजची समाजरचना आमूलाग्र बदलली पाहिजे याबाबत फारसा मतभेद नाहीं. समाजांतील दारिद्य आणि विषमता नष्ट केल्याशिवाय तरणोपाय नाहीं हें सर्वांनाच मान्य आहे. दारिद्यानें आणि विषमतेनें पोखरलेल्या समाजांत सत्त्वशील मनुष्याला जीवन जगणें कठीण होऊन बसतें. आपली माणुसकी टिकविणें अवघड जातें. मानवधर्माचें आचरण करतां येत नाहीं. माणुसकीचीं मूल्यें मान्य करूनहि मनुष्य तीं आचरणांत आणूं शकत नाहीं आणि आपली माणुसकीच गमावून बसतो. त्याची वर्तणूक अप्रामाणिकपणाची होते. समाजाची चौकट बदलली तरच त्याला आपल्या सत्प्रवृत्तीशीं प्रामाणिक राहतां येईल आणि ती चौकट जोंवर बदललेली नाहीं तोंवर त्याला त्याच्या अप्रामाणिकपणाबद्दल नांवें ठेवणें अयोग्य आहे असें सांगितलें जातें. असें जर आहे तर समाजाची ही चौकट कशी बदलावयाची याचा सर्वांनीच विचार करावयास नको का ? संपूर्ण सामाजिक क्रान्तीची आवश्यकता मान्य केल्यानंतर प्रत्येकाला त्याबाबत कांहींतरी करण क्रमप्राप्तच ठरत नाहीं काय ?

## जनशक्ति जागृत करण्याची जरूरी

संपूर्ण सामाजिक-क्रान्ति कायदा करून घडवून आणतां येईल असा एक भ्रम सध्यां रूढ आहे. परंतु जनमनांत तशा क्रांतीची तीव्र आकांक्षा निर्माण झालेली नसेल तर कायद्यानें समाजक्रांति कशी होऊं शकेल ? कायद्याच्या मागें जनशक्ति नसेल तर अशा कायद्याचा, समतेचें उद्दिष्ट प्राप्त करून घेण्याच्या दृष्टीनें, उपयोग होणार नाहीं. जनशक्ति निर्माण झाली असेल तर तिला योग्य तें वळण देऊन इष्ट ध्येयाप्रत जाण्यास कायदा साहाय्यभूत होईल. परंतु जनशक्ति निर्माण करण्याचें तें साधन निश्चितच नाहीं. स्वातंत्र्याच्या लढ्याच्या वेळीं देखील जनशक्ति निर्माण करण्याच्या प्रश्नावर भरपूर वादविवाद होई. अहिंसक लढा करून स्वराज्य कोणीं मिळविलें आहे काय असें लोक विचारीत. आणि अहिंसक लढा










करावयाचा म्हटला तरी त्याची प्रक्रिया कोणती असें विचारलें जाई. सशस्त्र क्रान्तीची शक्यता असती तर गांधीजींच्या विचाराकडे कोणी फारसें लक्ष दिलें नसतें. परंतु ती शक्यताच नसल्यामुळें निःशस्त्र प्रतिकाराचें तंत्र लोकांना मान्य करावें लागलें. सत्याग्रहाचें आणि असहकाराचें तत्त्व प्राप्त परिस्थितींत कसें लागूं करावें हें गांधींनीं दाखवून दिलें. मिठाचा कायदा मोडून स्वातंत्र्य कसें मिळणार असें लोक विचारीत. परंतु मिठाच्या सत्याग्रहामुळें जनमनांत स्वातंत्र्याची आकांक्षा प्रज्वलित झाली. समाजांत नवचैतन्य संचरलें. आणि म्हणूनच भारताला स्वातंत्र्य मिळवितां आलें. जागतिक परिस्थितीचा स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं उपयोग झाला हें खरें असलें तरी जनमनांत स्वातंत्र्याची आकांक्षा निर्माण झालेली नसती तर केवळ जागतिक अनुकूल परिस्थितीमुळें भारतास स्वातंत्र्य मिळालें असतें असें म्हणतां येईल काय ?

आजचा प्रश्न समाजक्रान्तीचा आहे. परंतु त्यासाठीं काय करावें तें सामान्य माणसाला समजत नाहीं. आपल्या मनांतील सत्प्रवृत्तींची जोपासना केली पाहिजे हें पटत असूनहि तें त्याला करतां येत नाहीं. 'मी एकटा काय करूं ?' असें तो म्हणतो. समाजांत लांच-लुचपत बोकाळली आहे. लांच दिल्याशिवाय कांहीं कामें होत नाहींत असें सर्वच म्हणतात. लांच न द्यावी तर जगणेंच कठीण आहे असें शेतकरी म्हणतो. त्याची सर्व बाजूंनीं कोंडी झालेली आहे. सामूहिक प्रयत्नाशिवाय ही कोंडी फोडतां येणार नाहीं. आपली आर्थिक परिस्थिति सुधारण्याचा प्रत्येकानें प्रयत्न केला म्हणजे आपोआपच समाजाची देखील प्रगति होईल. स्वार्थ साधला तर परमार्थ आपोआपच सिद्ध होईल हें तत्त्व आजच्या परिस्थितींत लागूं पडत नाहीं याची जाणीव आतां सर्वांनाच होऊं पहात आहे. विसाव्या शतकांतील सामाजिक न्यायाच्या आणि समतेच्या रूढ कल्पना लक्षांत घेतां आज भांडवलशाहीच्या मार्गानें आपण प्रगति करूं शकत नाहीं. उत्पादन-तंत्रामध्यें क्रान्ति घडून आली म्हणजे सामाजिक क्रान्ति घडून येणें अपरिहार्य होतें हा सिद्धान्त बरोबर आहे. परंतु इतर देशांमध्यें भांडवलशाहीच्या द्वारें उत्पादनतंत्रांत क्रान्ति घडून आली, तीच प्रक्रिया आपल्या देशांत मान्य केली पाहिजे काय ? सर्वसाधारणपणें असें म्हणावयास हरकत नाहीं कीं, ज्या ज्या वेळीं सामाजिक क्रान्ति घडून येते त्या त्या वेळीं उत्पादनाच्या प्रमुख साधनांची फेरवांटणी करावी लागते. भांडवलशाहींतील उत्पादनसाधनांच्या वैयक्तिक मालकीऐवजीं सामाजिक मालकी प्रस्थापित केली नाहीं तर समाजाची प्रगतीच खुंटून जाईल अशी अवस्था जेव्हां प्राप्त होते तेव्हां समाजक्रान्ति अपरिहार्यच ठरते.

## जमीनीची फेरवांटणी होणें आवश्यक

आपल्या देशांत भांडवलशाहीचा व त्याबरोबर येणाऱ्या कारखानदारीचा विकास विशेष झालेला आहे असें म्हणतां येणार नाहीं. देशांतील बहुसंख्य लोक तर शेतीवरच आपला उदरनिर्वाह करीत आहेत आणि ती शेती देखील परंपरागत आलेल्या पद्धतीनें चाललेली आहे. म्हणजे आपल्या देशांतील उत्पादनाचें प्रमुख साधन जमीन असून आपला मुख्य धंदा शेती हाच आहे. त्यामध्यें प्रगति केल्यावांचून आपला तरणोपाय नाहीं हें उघड आहे. देशांतील आर्थिक व सामाजिक विषमता नष्ट करण्याच्या दृष्टीनें शेतीचा धंदा ऊर्जितावस्थेला आणणें ही एक मूलभूत गरज आहे. आपली परंपरागत जीं मूल्यें आहेत त्यांतहि धंद्यांची वर्गवारी करतांना शेती उत्तम, व्यापार मध्यम आणि नोकरी कनिष्ठ असा क्रम सांगितलेला आहे. परंतु आज तर शेतीचा धंदा सर्वांत कनिष्ट समजून तो अगदीं उपेक्षिलेला आहे. शहरी संस्कृतीचा हव्यास निर्माण झाल्यामुळें असें झालें असावें. शेतकऱ्याचा मुलगा शिकला तरी त्याची पहिली आकांक्षा नोकरी हीच असते. नोकरी मिळाली नाहीं म्हणजे तो नाराज होतो, समाजाविरुद्ध असंतुष्ट बनतो. त्याचे पालक शेतांत पिकेल त्याचा उपयोग पूर्णतया शेती सुधारण्यासाठीं करीत नाहींत, आपल्या मुलाला उच्च शिक्षण देण्यासाठीं करतात. जमिनीचें ऋण फेडलें जात नाहीं. उच्चवर्णीय समजल्या गेलेल्या पांढरपेशा जमीन-मालक-वर्गांत ही गोष्ट प्रामुख्यानें दृष्टोत्पत्तीस येते. शिकलेला मुलगा तरी शेतीवरील आपला हक्क सोडून द्यावयास तयार होतो काय ? – मुळींच नाहीं. नोकरी न मिळाल्यास उपजीविकेचें एक कनिष्ट साधन म्हणून तो जमिनीला घट्ट धरून बसतो. ज्यांना शेती मन लावून करावयाची आहे त्यांना ती मिळत नाहीं. कांहीं मोठे जमिनदार आपल्या जमिनींत धान्य











पिकविण्याऐवजीं पावसाच्या पाण्यावर उगवलेल्या गवताचा व्यापार अधिक किफायतशीर होतो म्हणून आपल्या कुळांना युक्त्या-प्रयुक्त्या करून हुसकावून लावतात. एखाद्या शेतकऱ्याला स्वतःची चारपांच एकर जमीन असेल आणि दुसऱ्या एका मालकाची चार-पांच एकर जमीन कुळ म्हणून त्याच्या ताब्यांत असेल तर अशीच विचित्र अवस्था निर्माण होते. तो आपली शक्ति आपल्या जमिनीवरच केंद्रित करून कुळ म्हणून ताब्यांत असलेल्या जमिनीकडे पुरेसें लक्ष देत नाहीं. वैरण वगैरे मिळेल इतपत प्रयत्न करतो. मालकी हक्क नसल्यामुळें तसें होत असावें हें पूर्ण सत्य नाहीं. आज त्याच्याजवळ जीं साधनें आहेत तीं सर्व जमिनीला पुरीं पडण्याइतकीं नाहींत. सारांश, आज जमिनीची जी वांटणी झालेली आहे ती उत्पादनाच्या दृष्टीनें दोषास्पद आहे. उत्पादनतंत्रामध्यें क्रान्ति झाली नसली तरीहि जुन्या उत्पादन-तंत्राच्या दृष्टीनेंहि जमिनीची फेरवांटणी होणें आवश्यक आहे. कायद्याच्या साहाय्यानें हें करावयाचें म्हटलें तर तें वाटतें तितकें सोपें नाहीं. सर्व भारतांत एक कायदा करून भागणार नाहीं. इतकेंच नव्हे तर एका घटक राज्यांतहि एक कायदा करून तें होण्यासारखें नाहीं. त्याचा विचार खालच्या घटकापासून केला जाणें आवश्यक आहे. म्हणूनच विनोबांना खेड्यापासून प्रारंभ करणें आवश्यक वाटलें.

## सामूहिक बंधुभावनेला आवाहन

वाढत्या लोकसंख्येबरोबर बेकारीहि वाढत आहे. खेड्यांत बेकारी आहे परंतु कारखानदारीवर आधारलेल्या शहरांतहि ती कमी न होतां उत्तरोत्तर वाढतच आहे. मोठमोठे उद्योगधंदे खाजगी मालकांच्या ताब्यांत ठेवून बेकारीचा प्रश्न सुटूं शकणार नाहीं, ही गोष्ट आतां सर्व पक्षांना मान्य करावी लागत आहे. तोच नियम जमिनीच्या मालकीलाहि लागू करणें आवश्यक आहे. उत्पादनाच्या साधनांचें स्वामित्व व्यक्तीकडे ठेवणें इष्ट दिसत नाहीं. तें समाईकच मानलें पाहिजे. वैयक्तिक स्वामित्वाचें समर्थन एकाच कारणास्तव होऊं शकेल. व्यक्तीकडे मालकी हक्क दिल्यानें समाजाच्या एकंदर उत्पादनांत भर पडत असेल तर तसें करण्यास प्रत्यवाय नसावा. परंतु समाजहित हेंच प्रधान समजलें पाहिजे. सरोवरावांचून माश्यांचें जीवन अशक्य आहे. सरोवरांत पाणी नसेल तर मोठा मासा काय अगर छोटा मासा काय दोघांच्या जिवावर बेतल्यावांचून रहात नाहीं. समाजाचें अस्तित्व सरोवरासारखें आहे. समाजहिताच्या आड वैयक्तिक मालमत्ता येत असेल तर ती काढूनच घ्यावी लागेल. मालकी हक्काचें फेरवांटप होणें आवश्यक असेल तर तसेंहि केलें पाहिजे. नवीन वांटपांत मिळणारा मालकी हक्क हा देखील समाजहिताला पोषक आहे तोंपर्यंतच चालू राहील. विनोबा सारी जमीन देवाची म्हणजेच गांवाची या घोषणेवर भर देतात तो याच अर्थानें. मानवी जीवनास हवा, पाणी, प्रकाश यांची जशी आवश्यकता आहे तशीच जमिनीचीहि आहे. भूमाता ही संज्ञा तिला प्राप्त झाली ती उगीच नाहीं. विद्यमान परिस्थितींत आपल्या देशांत जमीन हेंच उत्पादनाचें प्रमुख साधन आहे. त्या साधनाचा योग्य वापर होत नाही याबद्दलहि मतभेद नाहीं सबब जमिनीची फेरवांटणी होईल तेव्हांच आपले प्रश्न सुटण्यास प्रारंभ होऊं शकेल. दारिद्र्य, बेकारी, लांचलुचपत आणि अन्यायाबाबत लाचारी ही नष्ट झालीच पाहिजे. स्वातंत्र्य आलें पण समता कोठें आहे? समता प्रस्थापित झाली पाहिजे असें सर्वच म्हणतात. परंतु त्यासाठीं लागणारी जनशक्ति कशी निर्माण करावयाची? प्रत्येकजण वैयक्तिक नफ्यातोट्याचा विचार करूं लागला तर हे प्रश्न सुटण्याऐवजीं अधिकच बिकट होऊन बसतात असा आजचा अनुभव आहे. सामूहिक प्रयत्न केले तरच त्याचा उकल होऊं शकेल ही गोष्ट बुद्धीला पटते. परंतु सामूहिक प्रयत्नाला सुरवात कशी आणि कोठून करावी असा प्रश्न आहे. समाजांतील प्राथमिक घटकापासून सुरवात केली तरच ही कोंडी फोडणें शक्य होईल असें दिसून आल्यामुळें विनोबांनीं जमिनीच्या प्रश्नाला प्रथम हात घातला आहे. खेड्यांत आज सामूहिक भावना नसल्यामुळें सामूहिक प्रयत्न होणें कठीण झालें आहे. ही भावना निर्माण करण्यासाठीं विनोबा ग्रामीण जनतेच्या बंधुभावनेस आवाहन करीत आहेत. आपल्या कुटुंबाप्रमाणें गांव हेंहि एक कुटुंबच आहे. सर्वांनीं परस्परांच्या सुखदुःखाचें वांटेकरी होणें नुसतें आवश्यक नव्हे तर स्वाभाविक आहे. आज तसें होत नाहीं, ही एक विकृति समजली पाहिजे. उपनिषदांतील आणि गीतेंतील दाखले देऊन विनोबांनीं ती कल्पना शेतकऱ्यांच्या गळीं उतरविण्याचा प्रयत्न चाल॰








विला आहे. तो यशस्वी होत असल्याचेंहि दिसून येत आहे. गांवांत कोणालाहि उपाशी ठेवून आपण पोटभर जेवणें ही गोष्ट माणुसकीला काळिमा आणणारी आहे असें ते सांगतात. सर्वांना काम देणें हें जसें सरकारचें कर्तव्य आहे तसें गांवांचेंहि आहे. गांवाला सामूहिक दृष्ट्या त्या बाबत जेवढा प्रयत्न करतां येईल तेवढा त्यानें केला पाहिजे. प्रत्येकाला कामधंदा मिळेल अशी योजना करावयाची म्हणजे उत्पादन-साधनांचा विचार करावाच लागतो. पांच लक्ष खेड्यांतील उत्पादनाचें सर्वांत प्रमुख साधन जमीन हेंच आहे. तिचा वापर योग्य आणि किफायतशीर झाला पाहिजे. सर्वांना काम देण्याच्या दृष्टीनें ग्रामीण धंद्यानांहि प्रोत्साहन द्यावयास हवें. जमिनीचा किफायतशीर वापर करावयाचा म्हणजे तिची फेरवांटणी केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. आजच्या मालकवर्गानें आपला स्वामित्वाचा हक्क विसर्जित करण्यास अनुमति दिली तरच हें शक्य कोटींत येऊं शकेल. त्या दृष्टीनें आज भारतांतील जवळजवळ शंभर गांवच्या सर्व जमीनमालकांनीं आपली समग्र जमीन भूदानाला दिली आहे. सर्वांनाच एकदम एवढी उडी मारणें शक्य नसेल तर त्यांनीं आपल्या जमिनीचा एकषष्ठांश हिस्सा द्यावा, गरीब श्रीमंत सर्वांनीं द्यावा, जमीनीचें ग्रामीकरण हें अंतिम ध्येय आहे, असें समजून तो द्यावा असें ते सांगतात. तसें होईल तर जनमानसांत क्रान्ति झाल्यावांचून राहाणार नाहीं. समतेची आकांक्षा जनमनांत निर्माण करण्याचें तें एक प्रभावी साधन आहे. इतकेंच काय, शेतकऱ्यांच्यावर सध्यां जो निरनिराळ्या प्रकारें अन्याय होत आहे त्याचाहि निरास करण्यास त्या भावनेचा उपयोग होईल. कारण त्यामुळें जनतेच्या हृदयांतील सुप्त शक्ती जागृत होतील आणि अन्यायाचा प्रतिकार करण्यास ती समर्थ बनेल.

### समतेची प्रेरणा मानवी प्रेमांत

मानवी मनांतील समानतेची आकांक्षा सनातन आहे. एका माणसाला दुसऱ्याबद्दल वाटणारी आत्मीयता हीच त्याच्या मुळाशीं आहे. दुसऱ्या मनुष्याचें दुःख पाहून मानवी मनांत करुणा निर्माण होते. या भावनेचा उगम कशांत आहे हें सांगणें सोपें नाहीं. तथापि मानवी समाजधारणेचा तो एक मूलाधार आहे हें निश्चित. अर्थोत्पादनाचें तंत्र आणि त्यांतून विशिष्ट युगांत उदयास आलेली समाजरचना स्थिरता प्राप्त करून देतात हें खरें असलें तरी समाजाचें अस्तित्व कायम टिकवून धरण्याच्या कार्यांत परस्परांबद्दल वाटणाऱ्या मानवी प्रेमाला फार महत्त्वाचें स्थान आहे. ती एक महान् ऐक्यप्रेरक शक्ति आहे. समाजवादाची तीच मूलभूत प्रेरणा आहे. ज्यांच्या ठिकाणीं मानवप्रेमाची भावना तीव्रतर होते त्या सर्वांना समतेची ओढ लागते. कार्ल मार्क्सच्या अगोदर जे समाजवादी झाले त्यांनीं मानव्याच्या भावनेला आवाहन केलें म्हणून मार्क्स त्यांना कल्पनावादी म्हणत असे. परंतु याचा अर्थ असा नव्हे कीं त्याला त्यांचें मानवताप्रेम मंजूर नव्हतें. किंबहुना त्याच्या जीवनांतील मुख्य प्रेरणा समानतेचीच होती. ही समानता कशी प्रस्थापित करावयाची याबद्दल मतभेद होता. भांडवलशाहीच्या विकासामुळें समाजांत दोन वर्ग पडले आहेत : पिळला जाणारा आणि पिळणारा. पिळल्या जाणाऱ्या कामगारांमध्यें एक प्रकारची वर्गीय भावना निर्माण होते. ती भावना प्रभावी बनवून त्यांच्या सामुदायिक शक्तीच्या जोरावर सामाजिक क्रांति घडवून आणतां येईल, समतेवर आधारलेला नवसमाज निर्माण करण्याचा हाच शास्त्रीय मार्ग आहे असें मार्क्सचें प्रतिपादन आहे. आजपर्यंतच्या इतिहासांत जीं सामाजिक स्थित्यंतरें झालीं त्यांच्या मुळाशीं उत्पादन-तंत्रामध्यें झालेल्या क्रान्तीमुळें निर्माण झालेल्या वर्गांतील हितविरोध होता हें मार्क्सचें प्रतिपादन कोणालाहि मान्यच करावें लागेल. अशा रीतीनें इतिहासांतील सामाजिक परिवर्तनाचा अन्वयार्थ वर्गविग्रहाच्या दृष्टिकोणांतून लावतां आला, तरी इतिहासांतील अवघीं सामाजिक परिवर्तनें वर्गीय भावनेच्या जोरावर संघटित झालेल्या पिळल्या लोकांनीं घडवून आणलीं असें म्हणणें वस्तुस्थितीला धरून होणार नाहीं. कधीं धर्माच्या भावनेचा आश्रय करून तर कधीं राष्ट्रीयत्वाच्या भावनेला आवाहन करून जुनी समाजव्यवस्था बदलण्यांत आलेली आपणास पहावयास मिळेल. भांडवलशाही युगांत ज्या ठिकाणीं कारखानदारीची वाढ झाली आहे, अशा ठिकाणींच एकजिनसी कामगारवर्ग निर्माण झालेला असतो. ज्या ठिकाणीं असा एकजिनसी वर्ग उपलब्ध नसेल त्या ठिकाणीं वर्गीय भावनेपेक्षां निराळें आवाहन करणें क्रमप्राप्तच आहे. अशा वेळीं समानतेची मूलभूत प्रेरणा जें मानवी प्रेम








त्यालाच आवाहन करणें हें स्वाभाविक आहे.

जमिनीचें फेरवांटप होणें हा आजचा निकडीचा प्रश्न आहे. त्या दृष्टीनें आज खेड्यांतून कामगारवर्गासारखा एकजिनसी वर्ग नाहीं. अशा परिस्थितींत समतेची सामूहिक भावना कशी निर्माण करावयाची ? सक्ती न करतां लोकशाहीच्या मार्गानें हें करावयाचें असेल तर जमीनीच्या फेरवांटपास विद्यमान जमीनमालकांची संमति असली पाहिजे. नुसता कायदा करूनहि प्रश्न सुटत नाहीं. कायदा केवळ जनहिताचा असून भागत नाहीं. बहुसंख्य लोकांची त्या कायद्याचें स्वागत करण्याची तयारी असेल तरच त्याची अंमलबजावणी चांगल्या प्रकारें होऊं शकते. नाहींतर अंमलबजावणी करतांना दडपशाहीचा अवलंब करणें भाग पडतें. तुकडेबंदीच्या कायद्याबाबतचा अनुभव लक्षांत घेतां ही गोष्ट मान्य होण्यासारखी आहे. म्हणून जमिनीच्या फेरवांटपास बहुसंख्य शेतकऱ्यांची संमति कशी मिळेल याचा विचार झाला पाहिजे. शेतकऱ्यांच्या बंधुभावनेस आवाहन करणें अशा परिस्थितींत आवश्यकच नव्हे, तर लोकशाहीच्या दृष्टीनें हितावह देखील आहे. भारतीय संस्कृति आणि परंपरा लक्षांत घेतां गांवामध्यें एक प्रकारची कौटुंबिक भावना निर्माण करणें अशक्य नाहीं. सर्व जमीन गांवाची असून तिचें अंतिम स्वामित्व समाजाकडे असलें पाहिजे हा विचार आज मान्यता पावत आहे. एरवीं विनोबांना त्यांच्या चळवळीत जें यश मिळत आहे तें मिळालें नसतें.

## सहकारी शेती व ग्रामोद्योग

भूमिहीनांना जमीन मिळवून देण्यासाठीं विनोबा जमीन मागत आहेत. त्यांना जमीन मिळत आहे. त्या जमिनीचें वांटप करून ती भूमिहीनांना दिली म्हणजे त्यामुळें शेतीच्या धंद्याच्या प्रगतीसाठीं सरकारकडून ज्या महत्त्वाच्या सुधारणा केल्या जातील त्यांस अडथळा निर्माण होईल, असा एक आक्षेप येण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ, उद्यां सरकारनें सहकारी शेतीचा प्रयोग सुरू केला तर ज्या लोकांना जमिनीचे लहानलहान तुकडे वांटले गेले आहेत ते लोक आपली जमीन सहकारी शेतींत विसर्जित करण्यास तयार होणार नाहींत. शेतकऱ्याची जमीनीबद्दलची भूक किती मोठी आहे तें लक्षांत घेतलें तर हा आक्षेप सयुक्तिक वाटतो. परंतु त्याचें निरसन करणें अगदींच अशक्य नाही. एक तर विनोबा स्वतः सहकारी शेतीचा पुरस्कार करतात. तें न जमलें तर जमीन शेतमजुरांना वांटली जाते. ती देत असतांना विशिष्ट अटीवरच ती दिली जाते आणि जमीन ही समाजाची आहे या पार्श्वभूमीवरच हा सर्व प्रयोग चालला आहे. सरकारनें कायद्याच्या द्वारें सहकारी शेतीचा कार्यक्रम आंखला तर त्यांना सक्ती करावी लागेल. विनोबांच्या या चळवळीमुळें तशा प्रकारच्या कायद्याला होणाऱ्या शेतकऱ्याच्या विरोधाची धार पुष्कळच बोथट होण्यासारखी आहे. किंबहुना असं म्हणतां येईल कीं सरकारला जर असा कांहीं कार्यक्रम करावयाचा असेल तर त्यांनीं या संधीचा फायदा घ्यावा. सरकार कांही करीत नाही तोंवर विनोबांनीं आणि जनतेनं लोकांची उपासमार उघड्या डोळ्यांनीं पहात बसावें असें थोडेंच आहे ? भूदानचळवळीनें सर्व प्रश्न आपोआपच सुटतील असें कोणींच म्हणत नाहीं. जमीनींची फेरवांटणी झाली म्हणजे सर्व झालें अशी अंधश्रद्धा निर्माण करण्याचा हा प्रयत्न नाहीं. भूहीनांना जमीन मिळाली पाहिजे असाहि आग्रह नाहीं. कामधंदा मात्र मिळालाच पाहिजे. म्हणूनच ग्रामोद्योगावरहि विनोबा भर देत आहेत. सहकारी शेती करून त्यांत भूमिहीनांना काम मिळेल अशी योजना केली तर ती स्वागतार्हच आहे.

## स्वामित्वविसर्जनामागील जीवनदृष्टि

भूदान-आंदोलनांत अंतर्भूत असलेले स्वामित्वविसर्जनाचे विचार जमिनीपुरतेच मर्यादित नाहींत. बुद्धिजीवी वर्गानें देखील त्याच जीवनदृष्टीचा अंगीकार करावयास हवा. बुद्धिजीवी माणसानें आपल्या बुद्धीच आपणच मालक आहोंत असें समजतां कामा नये. आजपर्यंत समाजानें केलेल्या ज्ञानोपासनेच्या अभावीं बुद्धिजीवी वर्गांना त्यांचें आजचें बौद्धिक सामर्थ्य प्राप्त झालें नसतें ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. त्यांनीं समाजाचें ऋण फेडण्यास तयार असलें पाहिजे. आज आम्ही आपल्या बुद्धिमत्तेचा जणूं लिलांवच पुकारला आहे. जो कोणीं अधिकाधिक किंमत देईल त्याला ती विकण्यांत येते. एखाद्या मोठ्या जमीनदारानें अथवा भांडवलदारानें आपली जमीन अगर कारखाने समाजहिताचा विचार न करतां आपल्या स्वार्थासाठीं वापरावे








त्याचप्रमाणें बहुसंख्य बुद्धिजीवी लोक आपली बुद्धिमत्ता समाजहिताची परवा न करतां केवळ आपल्या स्वार्थासाठीं करीत आहेत. त्यामुळें आपण आपली माणुसकी देखील गमावून बसत आहों याची त्यांना जाणीव दिसत नाही. प्रत्येकजण घेण्याची भाषा बोलत आहे. देण्यांतहि आनंद असतो याचा त्यांना अनुभवच नाहीं. स्वातंत्र्याच्या लढयाच्या वेळीं लोकांना त्या ध्येयासाठीं त्याग करण्यांत पुरुषार्थ वाटे, आनंद होई. सामाजिक आणि आर्थिक समतेचें ध्येय तर त्याहूनहि भव्य आणि उदात्त आहे. मग त्यासाठीं त्याग करण्यास सुसंस्कृत माणसानें तयार व्हावयास नको काय ? शिक्षणामुळें आम्ही जर भेकड बनत असलों तर तें शिक्षण कसलें ? ज्या योगानें मनुष्य अधिकाधिक निर्भय बनत जातो तीच विद्या. आपलें जीवन नवध्येयासाठीं समर्पित करण्याची प्रेरणा जर शिक्षणांतून मिळणार नसेल तर त्याचा काय उपयोग ? जे लोक मोठमोठ्या तत्त्वांच्या गप्पा मारतात त्यांच्या जीवनामध्यें त्यांची थोडीशी तरी झळक दिसावयास पाहिजे. ज्यांना जमिनीचें फेरवांटप झालें पाहिजे असें वाटतें त्यांनी आपली जमीन वांटण्यासाठीं कायद्याची वाट पहात बसलें पाहिजे काय ? ज्या जमिनीवर त्यांचा अधिकार आहे, मालकी हक्क आहे त्या जमिनी त्यांनीं भूहानांना कां देऊं नयेत ? त्याशिवाय लोकांनीं त्यांच्या आश्वासनांवर विश्वास कां ठेवावा ? नवध्येयाचे उपासक म्हणून मिरवणाऱ्यांच्या जीवनामध्यें त्या ध्येयाचें अंशतः तरी दर्शन व्हावयास हवें. जो नवसमाज आम्हांस निर्माण करावयाचा आहे त्याचे पाईक कसें वागतात हें फार महत्त्वाचें आहे. त्यांतूनच इतरांना प्रेरणा मिळणार आहे. समाजवादी विचारसरणीच्या लोकांनीं आणि समतेच्या उपासकांनीं खेडोंपाडीं हिंडून जनमनामध्यें नवमूल्यांचें बीजारोपण करण्याचें कार्य अव्याहतपणें चालूं ठेवलें पाहिजे. भूमिदान, श्रमदान वगैरे कार्यांच्या द्वारें विचारप्रसाराचें हें कार्य प्रभावीपणें करतां येतें. त्यांतूनच ग्रामराज्यासाठीं लागणारे असंख्य त्यागी कार्यकर्ते निर्माण होतील. समतेवर आधारलेला नवभारत आणि त्यांतील एक घटक म्हणून संयुक्त महाराष्ट्राचें स्वप्न साकार करावयाचें असल्यास समाजक्रान्तीच्या ध्येयास हजारों तरुणांनीं पुन्हा एकवेळ आपलें जीवन समर्पित करण्याची हीच वेळ आहे.

---

# दानपत्रें परत करण्याचें आंदोलन !

मध्येंच आम्ही एक नवीन आंदोलन सुरूं केलें आहे. तें आहे दानपत्रें परत करण्याचें आंदोलन. कांहीं दानपत्रांच्या मागें आम्ही असें लिहूनहि दिलें आहे कीं, " हें अपुरें दान आहे, सबब परत. " —एकाजवळ ५० बिघे जमीन आहे. त्यानें अर्धाच बिघा दान दिली. तें दान आम्ही त्यांस परत केलें. तो मनुष्य संध्याकाळींच आमच्याकडे परत आला. पश्चात्ताप झाल्यासारखी त्याची मुद्रा दिसली. आपल्या हातून जणूं गुन्हा झाला आहे अशी त्याची नजर होती. थोडें बोलणें झाल्यानंतर तो सहावा हिस्सा देऊन निघून गेला.

एका ठिकाणीं तर पुढील गोष्ट घडून आली. एका माणसानें सांगितलें कीं " आम्ही सात भाऊ आहोंत. तुम्ही आठवे. म्हणून तुम्हांला आठवा भाग देतों. " मी म्हणालों, " ठीक आहे. मग मला सर्व चांगलीच जमीन दे. " तो म्हणाला, " मी तुम्हांला भाऊ मानून वांटा दिला आहे. सगळी चांगलीच जमीन तुम्ही कोणत्या हक्कानें मागतां ? वांटयांमध्यें चांगली-वाईट दोन्हीहि मिळतील. " आम्ही दोघं जणूं भाऊभाऊच गोष्टी करीत होतों. म्हणून मीहि म्हटलें, "बरं तर, दोन्ही तऱ्हांच्या जमीनींतून मी वांटा घेईन. पण ज्या भावाला तूं हा वांटा देत आहेस त्याच्याजवळ कांहीं साधन नाहीं. म्हणून तो आपल्या पायावर उभा राहूं शकेल इतकी व्यवस्था तुम्हांला करावी लागेल. " त्यानें ही गोष्ट मंजूर केली. हा जो एवढा सद्भाव दिसून येत आहे त्याचा जर आपण लाभ घेतला नाहीं तर आपण करंटेच समजले जाऊं !

—आचार्य विनोबा

' सर्वोदय ' अंक ( १९ डिसेम्बर १९५४ ) मधून.








श्री. वसंत नारगोळकर

# भूदान-यज्ञामागील मूलग्राही जीवनदर्शन

" Bliss was it in that dawn to be alive,
But to be young was very heaven ... "

– Wordsworth

आपल्या देशांत भूदान-यज्ञआंदोलन सुरू झाल्याला चार वर्षें होत आलीं. इतक्या कालानंतर आतां कुठें त्या आंदोलनाची व्याप्ति व महत्त्व देशांतील व विशेषतः महाराष्ट्रांतील राजकीय नेत्यांच्या आणि राज्यशास्त्र, अर्थशास्त्र किंवा समाजशास्त्र यांचा व्यासंग असलेल्या विचारवन्तांच्या थोडीफार लक्षांत येऊं लागल्याचीं सुचिन्हें दिसूं लागलीं आहेत. सुरवाती-सुरवातीला तर या चळवळीवर अनेकांनीं अनेक प्रकारचे आक्षेप घेतले. पहिल्या वर्षी मिळालेल्या जमिनीच्या आंकड्यांवरून कोणी एकानें तर सरळसरळ गणित केलें कीं या गतीनें भारतांतील जमिनीचा प्रश्न सोडविण्यास पांचशें वर्षें लागतील ! कांहीं महिन्यांपूर्वी अखिल-भारतीय कीर्तीच्या एका आदरणीय नेत्यानें भूदान-यज्ञाविषयीं पुढील उद्गार काढले होते : " भूदान-यज्ञाचें काम तर चांगलें आहे; परंतु त्याच्या मागें कांहीं खास तत्त्वज्ञान आहे असें दिसत नाहीं ! " त्यांनीं भूदानाला आपला पाठिंबा व्यक्त केला आहे ही गोष्ट वेगळी. आतां अलीकडे त्यांचे विचार बदलले आहेत. परंतु ज्या वेळीं त्यांनीं आपलें हें मत व्यक्त केलें त्यावेळीं उत्तरादाखल विनोबाजींनीं 'सर्वोदय' मासिकांत लिहिलें होतें : " इसका उत्तर मैं क्या दूँ ? मैं इतनाहि कहूँगा कि अगर इसके पीछे तत्त्वज्ञान नहीं होता तो विनोबाके पाँव तीन सालमें ढीले पड जाते । लेकिन उसके पाँव ढीले नहीं हुए, बल्कि उनमें जोरही आ रहा है । " तात्त्विक शुष्क पंडिती वादांत न शिरतां मोजक्या शब्दांत आपली श्रद्धा व आत्मविश्वास प्रगट करून कार्य-मग्न राहण्याची व बोलण्यापेक्षां आचरून दाखविण्याची विनोबाजींची जी वृत्ति आहे त्याला अनुसरून त्यांनीं वरील उत्तर दिलें. भूदानयज्ञाची चळवळ ज्या सिद्धान्तांवर उभारली गेली आहे त्या सिद्धान्तांना अथवा त्या तत्त्वज्ञानाला आपला विरोध आहे हें म्हणणें वेगळें आणि त्या चळवळीमागें कांहीं खास तत्त्वज्ञानच नाहीं हें म्हणणें वेगळें. स्वातंत्र्यलढ्याच्या वेळच्या सत्याग्रह-आंदोलनामागील सिद्धान्त आणि भूदानयज्ञ-आंदोलनामागील सिद्धान्त वेगळे नाहींत. सत्य व अहिंसा या सनातन नीतितत्त्वांवर आधारलेल्या आपल्या सत्याग्रह-शास्त्राचा प्रयोग गांधीजींनीं मुख्यतः राजकीय क्षेत्रांत करून दाखविला. तपशिलाचा फरक सोडून दिला तर तेंच तंत्र आज स्वतंत्र देशाचे आर्थिक प्रश्न सोडविण्याच्या कामीं विनोबाजी वापरून दाखवीत आहेत. भूदानयज्ञ-आंदोलनाबाबत महाराष्ट्रांतील जो विद्वान् व सुशिक्षित वर्ग अजूनहि थोडासा उदासीन व तटस्थ दिसतो त्यानें या आंदोलनाकडे एका व्यापक ऐतिहासिक दृष्टिकोनांतून पाहाण्याचा प्रयत्न केला तर त्यामागील सर्वोदय-विचारप्रणालीची उदात्तता व आधुनिक विज्ञाननिष्ठ जगांत सिद्ध










होत चाललेली अहिंसात्मक तंत्राची अपरिहार्यता त्याच्या लक्षांत आल्याशिवाय राहाणार नाहीं.

सुसंस्कृत मानवी समाजाचे इतिहास चाळले असतां आपल्याला असें आढळून येतें कीं निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या देशांत अनेक जीवनविषयक तत्त्वज्ञानें उदयाला येतात. पुष्कळ वेळां एकाच प्रकारच्या सिद्धान्तांना देशकालपरिस्थित्यनुरूप निराळा आकार मिळतो किंवा त्याच तत्त्वज्ञानाचा निराळ्या स्वरूपांत आविष्कार होत असतो. हा आविष्कार कधीं केवळ विचारसंघर्षाच्या पातळीवर राहतो तर कधीं त्याचें मोठमोठ्या ऐतिहासिक घटनांत व उलथापालथींतहि परिवर्तन होतें आणि थोड्याच कालांत नवे विचार, नव्या घोषणा, नवें वाङ्मय, नव्या चालीरीति, नव्या प्रथा, नवी धर्मनिष्ठा अगर नवी समाजव्यवस्था प्रस्थापित झालेली आपल्याला दिसून येते. मागील अनुभव जमेला धरून जननेते, तत्त्वज्ञानी अगर द्रष्टे आपापल्या कालांतील समस्यांचा विचार करीत असल्यामुळें, सिद्धान्तांचें दर्शन प्राय: शतकाशतकाला उत्तरोत्तर अधिक व्यापक व अधिक खोल होत जातें. परंतु पुष्कळ वेळां असें होतें कीं एखाद्या प्रज्ञावान् द्रष्ट्याचें जीवनदर्शन इतकें खोल व मूलग्राही असतें कीं सर्वसामान्य जनतेला आणि कधीं कधीं बुद्धिमान् समजल्या जाणाऱ्या समकालीन विद्वान् समाजशास्त्रज्ञांना व विचारवंतांनाहि त्याची खोली, मूलग्राहित्व व भव्यता प्रतीत होत नाहीं. कारण, प्रचलित शिष्टसंमत विचारपद्धतींच्या चाकोरींतून बाहेर पडावयास लागणारें मानसिक धैर्य व बुद्धीचें सामर्थ्य त्यांच्याजवळ नसतें. गांधीविचाराच्या बाबतींत आज भारतांत पाश्चात्य अगर मार्क्सवादी विचारानें भारलेल्या अगर या बाबतींत मुळींच विचार न केलेल्या पुष्कळ सुशिक्षितांची हीच गत आहे.

गेल्या दोनशें वर्षांत युरोपमधील विज्ञान व यंत्रशास्त्र यांच्या प्रगतीमुळें तेथील त्यापूर्वीची समाजरचना पार बदलून गेली. भौतिक परिस्थितींत झालेल्या क्रान्तीबरोबर तेथें एक मोठी वैचारिक क्रान्तीहि घडून आली. राज्यशास्त्राच्या आणि अर्थशास्त्राच्या क्षेत्रांत नवीं तत्त्वज्ञानें उदयाला आलीं. बुद्धिवाद, लोकशाही इत्यादि नवीन वैचारिक अथवा सामाजिक आदर्श आणि स्वातंत्र्य, समता व बंधुता यांसारखीं नवीं मानवीं मूल्यें मान्यता पावलीं. विज्ञान व यंत्रशास्त्र यांच्या साहाय्यानें जगांत भौतिक समृद्धि निर्माण करण्याची संभाव्यता पुष्कळच वाढल्यानें मनुष्यमात्राच्या आवश्यक त्या गरजा पुऱ्या पाडण्याची व जगांतून दारिद्र्याचें कायमचें उच्चाटन करण्याची शक्यता निर्माण झाली. परंतु जें शक्य असतें तें घडतेंच असें नाहीं. विज्ञान व यंत्रशास्त्र यांच्या साहाय्यानें केल्या जाणाऱ्या प्रचंड केंद्रित उत्पादनाचा अपरिहार्य परिणाम म्हणून युरोपीय देशांत भांडवलशाहीचा व तिच्या अनुषंगानें जगांत आर्थिक व राजकीय साम्राज्यवादाचा जन्म झाला. शोषक व शोषित आणि शासक व शासित राष्ट्रें असें जगांतील राष्ट्रांचें विभजन झालें. देशोंदेशीं आर्थिक व सामाजिक विषमता परा कोटीला पोंचण्याची चिन्हें दिसूं लागलीं. मानवी मनच असें आहे कीं समाजांत दुर्व्यवस्था, अन्याय व अनाचार माजला कीं तें बंड करून उठतें. अशा वेळीं समाजाची अधोगति थांबविण्यासाठीं सबंध समाजाच्या सुप्त सदसद्विवेकबुद्धीचें प्रतिनिधित्व करणारा कोणीतरी अलौकिक नेता, तत्त्ववेत्ता अथवा द्रष्टा निर्माण होतो, तो समाजापुढें नवे विचार, नवें तत्त्वज्ञान, नवा आचारधर्म किंवा नवी समाजव्यवस्था आदर्श म्हणून ठेवतो व आपल्या कल्पनेप्रमाणें समाजाला इष्ट तें वळण देण्याचा प्रयत्न करतो.








## विसाव्या शतकांतील द्रष्टे गांधीजी

जें इतरांना सहजासहजीं दिसत नाहीं तें द्रष्ट्याला दिसतें अशी जर द्रष्ट्याची व्याख्या केली तर एकोणिसाव्या शतकांत आर्थिक व राजकीय क्षेत्रांत मार्क्स हा एक द्रष्टा होऊन गेला असें म्हणतां येईल. विज्ञान व यंत्रशास्त्र यांच्या वाढीमुळें अठराव्या व एकोणिसाव्या शतकांत जुनी उत्पादन-व्यवस्था व समाजपद्धति कशी विस्कटत गेली, कोणती नवीन समाजव्यवस्था अस्तित्वांत येत होती, तिचे काय काय दुष्परिणाम होणार आहेत, तिच्यांतील उपजत अंतर्विरोधामुळें तिच्या नाशाचीं बीजें तिच्या वाढींतच कशी सांठविलीं गेलीं आहेत व तिचा नाश कसा अटळ आहे इत्यादि तत्कालीन भांडवलशाही समाजपद्धतीचें त्यानें केलेलें विश्लेषण व आगामी साम्यवादी समाजव्यवस्थेबाबतचे त्याचे अंदाज हे आज, गेल्या शंभर वर्षांचा इतिहास पाहतां, स्थूल मानानें खरे ठरले आहेत असें म्हटल्यास तें वावगें होणार नाहीं. परंतु मार्क्सचें हें द्रष्टेपण त्याच्या हयातींत मान्य झालें नव्हतें व आजहि त्याच्या तत्त्वज्ञानांतील सत्यांश सर्वमान्य आहे असें म्हणतां येणार नाहीं. अर्थात् द्रष्ट्या-द्रष्ट्यांमध्यें सुद्धां फरक असूं शकतो. एकाद्या विशिष्ट परिस्थितींतून मार्ग काढण्यासाठीं मनुष्य धडपडत असतां त्याला कधीं पुढील पाचपन्नास वर्षांतील संभाव्य घटनांचें व परिस्थितीचें दर्शन होऊं शकेल, कधीं त्याची दृष्टि अधिक खोल व दूरवर जाऊं शकेल आणि जीवनविषयक कांहीं सनातन, शाश्वत, मूलभूत सिद्धान्तांचें दर्शन होऊन मनुष्याच्या पुढील प्रगतीचे टप्पे त्याला स्पष्टपणें दिसूं लागतील. भांडवलशाही व साम्राज्यवाद यांनीं जगांत जी आर्थिक विषमता आणि राजकीय गुलामगिरी निर्माण केली तिची प्रतिक्रिया म्हणून मार्क्सवाद जन्माला आला. व्यक्तिस्वातंत्र्याचा व प्रातिनिधिक लोकशाहीचा पुरस्कार करणारी परंतु अनिर्बंध आर्थिक स्पर्धेवर व विषमतेवर आधारलेली भांडवलशाही आणि आर्थिक समतेचा उद्‌घोष करणारा परंतु नव्या लोकशाहीच्या नांवाखालीं एकपक्षीय हुकूमशाही स्थापन करणारा साम्यवाद या आज विसाव्या शतकाच्या पूर्वार्धांतील परस्परविरोधी परंतु अत्यंत प्रभावी आणि बलिष्ठ अशा दोन विचार-प्रणाली म्हणून मानल्या जात आहेत. त्या विचार-प्रणालींतील संघर्ष हा आतां केवळ तात्त्विक पातळी-वरच राहिला नसून त्याचें भयंकर, संहारक अशा प्रत्यक्ष जागतिक युद्धांत केव्हां रूपांतर होईल याचा कांहीं नेम राहिलेला नाहीं. विज्ञान व यंत्रशास्त्र यांच्या संभाव्य विकासामुळें मनुष्यसमाज भौतिक दृष्ट्या सुखी होईल याचें मार्क्सला दर्शन झालें खरें; परंतु जगांतील वा एखाद्या देशांतील समाजव्यवस्थेंत इष्ट व आवश्यक ते बदल घडवून आणतांना हिंसेचा बुद्धिपुरःसर त्याग न केल्यास विज्ञान व यंत्रशास्त्र यांतील गेल्या दोनशें वर्षांतील अभिमानास्पद प्रगति हीच मनुष्याला शापरूप होण्याचा फार मोठा धोका आहे हें त्याला दिसूं शकलें नाहीं. विसाव्या शतकांत प्रथम महात्मा गांधींना ही गोष्ट स्पष्टपणें दिसली, एवढेंच नव्हे तर तिची त्यांना इतकी उत्कटत्वानें जाणीव झाली कीं भारताला व भारताच्या द्वारां जगाला अहिंसेचा व विकेंद्रित ग्रामोद्योगप्रधान अर्थव्यवस्थेचा संदेश देणें हेंच त्यांनीं आपलें जीवितकार्य मानलें. म्हणून मार्क्सला एकोणिसाव्या शतकांतील द्रष्टा म्हणून मानलें तर गांधीजी हे अधिक मूलगामी व व्यापक दृष्टि असलेले विसाव्या शतकांतील महान् द्रष्टे ठरतात. गांधीजींच्या आकस्मिक मृत्यूनंतर भारतीय जनतेला तोच महान् संदेश देत राहाण्याचें अवघड कार्य भूदानयज्ञाच्या द्वारें विनोबाजी समर्थपणें करून राहिले आहेत.



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## तपस्वी वैज्ञानिक

एप्रिल १९५४मध्यें बोधगयेला भरलेल्या सर्वोदयसंमेलनांत श्री. जयप्रकाश नारायण यांनीं ज्या दिवशीं जीवनदान देण्याचा आपला स्फूर्तिदायक संकल्प जाहीर केला त्याच्या दुसऱ्याच दिवशीं विनोबाजींनीं " भूदानयज्ञमूलक, ग्रामोद्योगप्रधान, अहिंसक क्रांतिके लिये मेरा जीवन समर्पण " या अर्थपूर्ण शब्दांमध्यें आपल्या जीवनदानाची घोषणा केली. आदर्श सर्वोदयी समाजरचनेच्या प्रक्रियेचें विनोबाजींनीं हें जें वर्णन केलें आहे त्यांत त्यांनीं सर्वोदयी जीवनदर्शनाच्या सिद्धान्तांचा सूत्ररूपानें निर्देश केला आहे. परंतु त्यांतील ' अहिंसक क्रांति ' हा शब्दप्रयोग विशेष महत्त्वाचा आहे. शासनमुक्त व शोषणहीन अशा आदर्श समाजाची प्रस्थापना हें सर्वोदयाचें अंतिम साध्य आहे, हें बुद्धीनें आकलन होण्यासारखें असलें तरी आज तें दूरचें आहे असें पुष्कळांना वाटतें तें स्वाभाविक आहे. त्या ध्येयाप्रत पोंचण्यापूर्वी आपल्याला दरम्यानचीं ध्येयें म्हणून मध्यंतरींचे कितीतरी टप्पे आक्रमावे लागतील. परंतु अखेरचें ध्येय निश्चित केल्याशिवाय वाट कोणती व मध्यंतरींचे टप्पे कोणते हें निश्चित करणेंहि अवघड होतें. आज समाजामध्यें जी निरनिराळ्या प्रकारची सामाजिक, आर्थिक, राजकीय विषमता आहे, जगामध्यें जे वंश-वर्ण-विषयक व जातीय भेद आहेत ते दूर करून समाजांतील सर्व घटकांना आपापल्या विकासाची समान संधि उपलब्ध करून देणें व अशा रीतीनें वैचारिक स्वातंत्र्य व भौतिक समृद्धि यांच्या पायावर कौटुंबिक भावनेनें बांधले गेलेले सुखी, समाधानी व शांतिप्रिय राष्ट्रीय समाज प्रस्थापित करणें हें आज सर्वमान्य होण्यासारखें नजीकचें ध्येय आहे. परंतु शासनमुक्त, शोषणहीन समाज हें जर अंतिम साध्य म्हणून आपण मान्य केलें तर नजीकचें ध्येय साध्य करण्याचे मार्गहि आपोआपच निश्चित होतात. कारण साध्यसाधनांचा परस्परपरिणामी असा अगदीं निकटचा संबंध आहे. साध्य शुद्ध व उदात्त असलें कीं साधन कसेंहि असलें तरी त्याकडे फारसें लक्ष देण्याचें कारण नाहीं असें कांहीं तत्त्वज्ञानी व राजकारणी मानतात. याच्या उलट, साध्य-साधन हा भेद तितकासा मूलगामी नाहीं; कारण आजचें साध्य हें उद्यांचें साधन बनतें; म्हणून साध्याप्रमाणें साधनहि शुद्ध राखणें आवश्यक आहे; किंबहुना साधन शुद्ध असेल तरच साध्य शुद्ध राहील, तें तसें ठेवण्यासाठीं खास प्रयत्न करण्याचें कारण राहणार नाहीं असें गांधीजी म्हणत असत. दूरच्या साध्यांचें तपशीलवार चिंतन किंवा वर्णन करीत बसण्यापेक्षां जवळच्या व निकडीच्या प्रश्नावर लक्ष केंद्रित करून तो प्रश्न सोडवितांना साधन-शुचितेवर आत्यंतिक भर देणें हा गांधीतंत्राचा विशेष आहे. भौतिक शास्त्रांतील एखादी समस्या सोडविण्याच्या अगर एखादा नवीन शोध लावण्याच्या प्रेरणेनें आपल्या प्रयोगशाळेंत प्रयोग करणारा एखादा प्रतिभावान् वैज्ञानिक आपल्याला पाहिजे असलेली परिस्थिति, साधनें व द्रव्यें अत्यंत कसोशीनें व बारकाईनें योग्य परिमाणांत निवडून घेतो. हेतु हा कीं, प्रयोग करण्यांत एखादी सूक्ष्म चूक राहिली तर त्या प्रयोगापासून निघणारा निष्कर्ष सत्य असणार नाहीं. भौतिक शास्त्रांतील बऱ्याच प्रयोगांतील परिस्थितीचें वैज्ञानिक उत्तम प्रकारें नियंत्रण करूं शकतो. तेच तेच प्रयोगघटक परिस्थिति अगर द्रव्यें बदलून पुनः पुनः करण्याची त्याला संधि मिळते. समाजशास्त्रीय प्रयोग करणाऱ्या वैज्ञानिकाला अशी संधि मिळत नसते. ' इतिहासाची पुनरावृत्ति होत असते ' हें एका निराळ्या अर्थानें खरें असलें तरी या अर्थानें खरें नाहीं. आपले निष्कर्ष अधिकाधिक सत्य व शुद्ध असावेत यासाठीं समाज-










शास्त्रीय प्रयोग करणाऱ्या वैज्ञानिकालाहि अत्यंत प्रखर अशा विकाररहित सत्यनिष्ठतेची आवश्यकता असते. ' असत्याचा उपयोग करून साध्य चटकन् हस्तगत होईल असें वाटावयास लावणारें कितीहि मोठें प्रलोभन असलें तरी मी असत्याचा आश्रय करणार नाहीं आणि माझाच विचार, माझेंच निदान व माझीच उपाययोजना शंभर टक्के खरी, श्रेयस्कर व परिणामकारक आहे असें माझें मन व बुद्धि मला कितीहि ग्वाही देत असली तरी तो माझा विचार किंवा तें माझें मत मी समाजावर अगर समाजांतील कोणत्याहि व्यक्तीवर कसल्याहि परिस्थितींत जबरदस्तीनें, हिंसेनें किंवा अन्य अनैतिक उपायानें लादणार नाहीं ' ही समाज-शास्त्रीय सत्यनिष्ठतेची पायाभूत भावना ज्याच्यामध्यें नाहीं त्या समाजशास्त्रज्ञाचे निष्कर्ष चुकीचे आणि अंतीं मानवी हिताच्या विरोधीच असणार यांत शंका नाहीं. जी सत्यान्वेषणा गेलीं दोनशें वर्षे विज्ञानांत मान्यता पावली आहे तिचा अर्थकारण, राजकारण आदि समाजशास्त्रीय क्षेत्रांत प्रवेश व्हावयाचा तर सत्यनिष्ठेप्रमाणेंच अहिंसानिष्ठा सार्व-जनिक जीवनाचा पाया म्हणून मान्य झाली पाहिजे, तरच मानवसमाजाचें अंतिम हित कशांत आहे हें शोधून काढण्यांत व त्याप्रमाणें समाज-रचनेंत आवश्यक ते बदल करण्यांत मनुष्य यशस्वी होईल. साधनशुचिता हा गांधीविचाराचा गाभा आहे. या सिद्धान्तानुसार वैज्ञानिक क्षेत्रापुरती मर्यादित असलेली प्रयोगशीलता व सत्यनिष्ठा जीवनाच्या सर्वच क्षेत्रांना लागू करून स्वतःची विचारशुद्धि व आचारशुद्धि यांवर व्यक्तिगत व सार्वजनिक जीवनाची उभारणी करणारे गांधीजी व विनोबा हे आधुनिक कालांतील दोन महान् तपस्वी वैज्ञानिक आहेत. सत्य व अहिंसा यांचें आजपर्यंत नैतिक, धार्मिक व आध्यात्मिक दृष्टिकोनांतून समर्थन करण्यांत आलें आहे व तें योग्यहि आहे. परंतु त्यांचा अवलंब करणें हें वैज्ञानिक दृष्ट्याहि कसें तर्कशुद्ध व अपरिहार्य आहे तें यापुढें लक्षांत घेणें जरूर आहे.

## जमीनीची मालकी नष्ट करावयाचा प्रश्न

स्वातंत्र्यप्राप्तीसारख्या महान् कार्यांत महात्मा गांधी गुंतले असतांना स्वातंत्र्योत्तर कालांतील समस्यांचा फारसा तपशीलवार विचार ते करूं शकले नाहींत. जमीनीचा प्रश्न हा अशाच स्वातंत्र्यो-त्तर प्रश्नांपैकीं एक होता. म्हणून त्यांच्या लिखाणांत जमीनीच्या प्रश्नांचा तुरळक उल्लेख आढळतो. अर्थात् मोठमोठ्या उद्योगपतींना व इतर धनिकांना त्यांनीं जो उपदेश केला होता तोच उपदेश ते जमीनमालकांना करीत असत. समाजांतील सर्वच धनिक त्यांच्या मालकीच्या व त्यांच्या ताब्यांतील संपत्तीचे विश्वस्त आहेत आणि ती संपत्ति व ती मालमत्ता त्यांनीं केवळ स्वतःच्या उपभोगासाठीं न वापरतां, समाजाच्या, विशेषतः समाजांतील गरजू, दलित व दरिद्री जनते-च्या कल्याणाकरितां वापरली पाहिजे असा सिद्धान्त ते वारंवार प्रतिपादीत असत. परंतु त्याची व्यापक प्रमाणावर अंमलबजावणी करण्याचा प्रयत्न त्यांनीं केला नाहीं. तशी परिस्थितीच त्या वेळेस नव्हती.

स्वातंत्र्योत्तर कालांत उपस्थित झालेल्या प्रश्नांची अहिंसात्मक मार्गांनीं उकल करण्याची जबाबदारी गांधीजींच्यानंतर त्यांच्या सहकाऱ्यांवर व अनुया-यांवर येऊन पडली. ती जबाबदारी उचलण्यास १९५१ सालीं विनोबाजी पुढें आले. जमिनीवरील परंपरागत मालकी हक्क नष्ट करून ती कसणाऱ्यांना वांटण्याचा एक मोठा कूटप्रश्न होऊन राहिला होता. केवळ भारतांतच नव्हे तर आशियांतील शेतीप्रधान राष्ट्रांतून हा प्रश्न फार महत्त्वाचा व निकडीचा झाला होता. या देशांच्या आर्थिक व विशेषतः औद्योगिक विकासामागें उपभोग्य वस्तूंची व इतर कच्च्या मालाची उत्पादनवाढ होणें आवश्यक होतें. उत्पादनवाढ करण्या-












साठीं शेतकऱ्याला प्रेरणा मिळेल अशा रीतीनें जमीन-मालकीचा प्रश्न सोडविणें अगत्याचें झालें होतें. यापूर्वी, सशस्त्र क्रांतीच्या द्वारा सत्ता हातीं घेतल्यानंतर जमीनीची खाजगी मालकी नष्ट करणें व तिचे सामुदायिकीकरण ( Collectivasation ) करून यांत्रिक शेतीच्या द्वारा प्रचंड उत्पादन करणें हा एक पर्याय रशियामध्यें अवलंबिला गेला होता. त्यानंतर आतां चीनमध्यें त्याच मार्गाचें अवलंबन करण्यांत येत आहे. चीनमध्यें जरी अजून जमीनी-चें सामुदायिकीकरण करण्यांत आलें नसलें तरी तेथील कम्युनिस्ट पक्षाला अंतर्गत यादवीच्या द्वारा सशस्त्र क्रांति करूनच सत्ता हातीं घेणें भाग पडलें होतें. अर्थातच हा मार्ग भारतांत अवलंबावयाचा म्हटलें कीं वर उल्लेखिलेला साधनशुचितेचा प्रश्न उपस्थित होतो. जमीनीची मालकी विनामोबदला नष्ट करावयाची व जमीनीचें वांटप करावयाचें हें साध्य ठरलें खरें. पण तें अंमलांत कसें आणावयाचें ? हजारों वर्षांच्या अर्थव्यवस्थेनें व राज्यव्यवस्थेनें जी मालकी हक्काची भावना मान्य करून तिची जोपासना केली आहे ती सहजासहजीं उखडून टाकणें सोपें नाहीं. गेल्या चाळीस वर्षांचा इतिहास असें दर्शवितो कीं तसा प्रयत्न केला गेल्यास आपली सर्व शक्ति किंबहुना प्राण पणाला लावून मालकवर्ग आपल्या मानीव हक्कांचें संरक्षण करण्यास तयार होतो. अर्थात् जुनी अर्थव्यवस्था व जुनीं मूल्यें बदलण्या-साठीं प्रस्थापित सरकारविरुद्ध सशस्त्र बंडाचा मार्ग स्वीकारावयाचें ठरविलें तर देशांत भयंकर अंतर्गत यादवी सुरू होते. त्यांतून हिंसा, द्वेष, अत्याचार व अंतीं एकपक्षीय हुकूमशाही – अशी एकामागून एक अनेक अरिष्टें उद्भवतात व तीं टाळणें अशक्य होतें. लोकशाही पद्धतीनें विधिमंडळाच्या द्वारा कायदे करवून मालकी हक्काचें हस्तान्तर करण्याचें ठरविलें तेंहि अत्यंत दूरापास्त असल्याचें आढळून येतें. निवडणुकीच्या मार्गानें विधिमंडळांत जाऊन बस-लेले जनतेचें तथाकथित प्रतिनिधि बहुसंख्य खऱ्या-खुऱ्या दरिद्री श्रमजीवी जनतेचे प्रतिनिधि नसता-तच. जमीनविषक अथवा अन्य कोणत्याहि मालकी हक्कांवर बंधनें घालण्यास म्हणजे पर्यायानें स्वतःच्याच हितसंबंधांवर जाणूनबुजून कुऱ्हाड चालविण्यास ते सहसा तयार होत नाहींत. अर्थात् क्रांतीची गति अपरिहार्यपणें मंद होते. पाश्चात्त्य देशांना आपापला औद्योगिक विकास करून घेण्यास जी सवड व फुर-सत मिळाली ती आज आर्थिक दृष्ट्या अप्रगत देशांना मिळणें शक्य नाहीं हें उघड आहे.

### भूदानाचें व्यापक दर्शन

आर्थिक क्रांति घडवून आणण्याची आपल्या देशांत अशी निकड असल्यामुळें मंदगतीनें व टप्प्याटप्प्यानें समाजव्यवस्था बदलूं पाहणारें आधुनिक पक्षनिष्ठ लोकशाहीचें तंत्र आपल्या येथें निरुपयोगी ठरूं पाहात आहे. आर्थिक समतेची भूक भागविल्या-शिवाय श्रमजीवी वर्गाला अधिक उत्पादनाची प्रेरणा मिळणार नाहीं व अधिक उत्पादन झाल्या-शिवाय संपत्तीच्या समान वांटपाला कांहीं अर्थ राहाणार नाहीं. अशा दुष्टचक्रांत देशाच्या आर्थिक प्रगतीचा गाडा अडकून बसल्यासारखा दिसत होता. तो पुढें चालवावयाचा म्हटलें तर प्रथम ज्या उत्पा-दनसाधनांच्या साहाय्यानें आज देशांतील जवळ जवळ सत्तर-पंचाहत्तर टक्के जनता आपली कशीबशी उपजीविका करीत आहे, त्या जमीनीचें न्याय्य वितरण होणें अत्यावश्यक आहे हें विनोबाजींनीं ओळखलें. पस्तीस वर्षांपूर्वी स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं उपयोगांत आणावयास साधनांबाबत हिंदी राजकीय नेत्यांपुढें असाच पेंच पडला होता. दहशतवाद्यांचें सशस्त्र बंडाचें राजकारण व नेमस्तांचें सनदशीर राज-कारण स्वातंत्र्यप्रयत्न पुढें नेण्यास असमर्थ ठरलें होतें. अशा प्रसंगीं अहिंसात्मक प्रतिकाराचा म्हणजे-च असहकाराचा व सत्याग्रहाचा अपूर्व व अभिनव मार्ग गांधीजींनीं देशाला दाखवून दिला व कुजत











पडलेला राजकीय डाव फोडून स्वातंत्र्यसंग्रामाचा मार्ग मोकळा करून दिला. तसेंच आज जमिनीचा प्रश्न सोडविण्यासाठीं नैतिक व आध्यात्मिक पायावर आधारलेली भूदानयज्ञाची अभिनव चळवळ सुरू करून विनोबाजींनींहि आर्थिक समानता प्रस्थापित करण्याच्या प्रश्नाला तोंड फोडलें आहे.

गंगोत्रीच्या उगमाप्रमाणें या चळवळीची सुरवात प्रथम अत्यंत लहान प्रमाणावर झाली. परंतु विनोबाजींनीं स्वतःच म्हटल्याप्रमाणें त्यांचा तो वामनावतार होता. तीनचार वर्षांच्या आंतच हें आंदोलन वाढतां वाढतां देशव्यापी झालें. त्याची केवळ प्रादेशिक व्याप्तीच वाढली असें नव्हे, तर जमीनीच्या मालकी हक्काप्रमाणेंच त्यांतील सिद्धान्त इतर सर्व प्रकारच्या संपत्तीवरील मालकीला लागू आहेत हें विनोबाजींनीं अगदीं स्पष्ट केलें. भूमिदानाची व्याप्ति वाढतां वाढतां त्यांत संपत्तिदान, साधनदान, समयदान, बुद्धिदान आणि शेवटीं तर जीवनदान इत्यादि सर्व प्रकारच्या दानांचा समावेश झाला. "तेन त्यक्तेन भुञ्जीथाः" या महान् औपनिषदीय मंत्राची शिकवणच ते देऊं लागले. हिंसात्मक मार्गांनीं घडवून आणलेली आर्थिक क्रान्ति हजारों वर्षें जतन केलेल्या मानवी मूल्यांचाच नाश करते; तसेंच केवळ कायद्यानें अनिष्ट समाजव्यवस्थेंत बदल करण्याचें ठरविलें तर प्रगति टप्प्याटप्प्यांनीं व फार मंद होते. म्हणून सामाजिक व आर्थिक विषमतेच्या मुळाशीं वैचारिक घाव घालणारा, अन्यायमूलक अर्थव्यवस्था टिकवूं पाहाणाऱ्या धनवानांच्या सदसद्विवेकबुद्धीला विचार-प्रसारानें आवाहन करून त्यांची धर्मभावना व त्यागबुद्धि जागृत करणारा व अशा रीतीनें एका अत्यंत नाजूक झालेल्या प्रश्नाबाबत देशांत होणारी अंतर्गत यादवी टाळणारा हा श्रेष्ठतम अहिंसक मार्ग विनोबाजींनीं दाखवून दिला.

विनोबाजींची भाषाशैली अत्यंत सूत्रमय व सूचक असते. गांधीजींना अभिप्रेत असलेल्या अहिंसात्मक समाजरचनेच्या अंतिम साध्यासाठीं समाजजीवनांत जी आमूलाग्र क्रान्ति करावी लागणार आहे तिची भूदानयज्ञ ही केवळ एक सुरुवात आहे हें त्यांनीं आपलें जीवनदान देतांना मोठ्या खुबीनें अगदीं सहज प्रगट केलें. भूदानयज्ञाचें जमीनवांटपाचें बाह्य व तात्कालिक उद्दिष्ट पूर्ण झाल्या-नंतर "ग्रामोद्योग-प्रधान अहिंसात्मक समाज-रचने"चें पुढचें ध्येय गांठावयाचें आहे. श्री. जय-प्रकाशजींच्या आवाहनाला प्रत्युत्तर म्हणून बोधगयेला ज्यांनीं ज्यांनीं जीवनदान दिलें त्यांना आपल्या-पुढील ध्येयाची स्पष्ट कल्पना असावी व त्याकरितां त्यांनीं तेव्हांपासूनच सर्व दृष्टींनीं बद्धपरिकर असावें यासाठीं त्यांनीं ती घोषणा केली. जीवनदान्यांचे प्रणेते श्री. जयप्रकाशजी आजपर्यंत समाजवादी अर्थव्यवस्थेचा पुरस्कार करीत असत. विनोबाजींनीं केलेल्या घोषणेमुळें आतां तेहि अर्थातच "भूदान-यज्ञमूलक ग्रामोद्योग-प्रधान अहिंसक क्रान्ति" घडवून आणाऱ्या सर्वोदयी अर्थव्यवस्थेचे पुरस्कर्ते झाले आहेत हें विशेष आहे.

## विकेंद्रित ग्रामोद्योगप्रधान अर्थव्यवस्था

सत्य-अहिंसादि शुद्ध साधनांवरील भर हा जसा सर्वोदयी जीवनदर्शनाच्या मूलग्राहित्वाचा निदर्शक आहे तसाच विकेंद्रित ग्रामोद्योगप्रधान अर्थव्यवस्थे-बाबतचा आग्रह हा सर्वोदयी तत्त्वज्ञानाची आधुनिक-तमता आणि पुरोगामिता सिद्ध करणारा आहे. वरवर विचार करणाराला चरख्याच्या व इतर ग्रामो-द्योगांच्या पुनरुज्जीवनासाठीं गांधीजींनीं केलेले आटोकाट प्रयत्न हे देशाला मध्ययुगीन अर्थव्यवस्थे-कडे नेणारे म्हणून प्रतिगामी वाटतात. याचा अर्थ एवढाच आहे कीं गांधीजींनीं पुरस्कारिलेल्या ग्रामोद्योगप्रधान अर्थव्यवस्थेवर जे प्रतिगामित्वाचा आरोप करतात त्यांची विचारपद्धति स्थितिशील (static) आहे, गतिशील (dynamic) नाहीं.








विज्ञान व यंत्रशास्त्र यांच्या विकासामुळें गेल्या दोनशें वर्षांत केवळ उत्पादनसाधनांतच नव्हे तर सबंध मानवी जीवनांत जी कांहीं प्रचंड क्रान्ति घडून आली आहे, तिच्या फक्त आकर्षक स्वरूपाचें एकांगी ज्ञान त्यांना झालें आहे. दुसऱ्या बाजूचा त्यांनीं विचार केलेला नाहीं. आदर्श साम्यवादी समाजरचनेचें मार्क्सनेंहि जें वर्णन केलें आहे तें एका द्रष्ट्याच्या कल्पनाशक्तीचा विलास म्हणून कितीहि आकर्षक वाटलें तरी त्यांतहि मूलग्राही समग्र विचाराचा अभावच आढळतो. मार्क्स म्हणतो : " साम्यवादी समाज-प्रस्थापनेच्या एका विशिष्ट उच्चतर अवस्थेमध्यें, ज्यावेळीं श्रमविभागाच्या तत्त्वामुळें व्यक्तीला गुलाम बनविणारें आज अस्तित्वांत असणारें उच्चनीचत्व आणि बौद्धिक श्रम व शारीरिक श्रम यांमध्यें आज दिसून येणारी विसंवादिता हीं नष्ट झालेलीं असतील, – श्रमाकडे केवळ पोट भरण्याचें साधन म्हणून आज जें बघितलें जातें त्याऐवजीं ज्यावेळेस श्रम करणें ही जीवनाची एक मूलभूत आवश्यकता मानली जाईल, – ज्या वेळीं प्रत्येक व्यक्तीचा सर्वांगीण विकास झाल्यामुळें समाजाच्या उत्पादक शक्ती कितीतरी पटीनें वाढलेल्या असतील व अशा रीतीनें सामायिक संपत्तीचे झरे ज्या वेळेस दुथडी वाहूं लागलेले असतील, त्याचवेळीं भांडवलदारी समाजांत रूढ असलेली वैयक्तिक मालकी हक्काची संकुचित प्रथा पूर्णपणें बंद झालेली आढळेल व समाज प्रत्येकाला त्यानें केलेल्या कामाबद्दल त्याच्या लायकीप्रमाणें मोबदला देण्याऐवजीं त्याच्या गरजेप्रमाणें मोबदला देण्याची व्यवस्था जाहीर करूं शकेल. " (In a higher phase of Communist Society, after the enslaving subordination of individuals under division of labour and therewith also the antithesis between mental and physical labour, has vanished; after labour from a mere means of life, has itself become of prime necessity of life; after the productive forces have also increased with the all-round development of the individual and the springs of co-operative wealth flow more abundantly, only, then can the narrow horizon of bourgeois right be fully left behind and society inscribe on its banners; – ' From each according to his ability, to each according to his need.'")

आदर्श साम्यवादी अर्थव्यवस्थेचें हें काल्पनिक चित्र भौतिक समृद्धतेंतच मानवाच्या प्रगतीचें सर्वस्व आहे असें मानणाऱ्या सर्वसामान्य माणसांना ग्राह्य वाटलें तर त्यांत आश्चर्य नाहीं. योजना-बद्ध अर्थोत्पादनपद्धतीनें जगांतील राष्ट्रांची उत्पादनक्षमता पुष्कळ पटींनीं वाढेल यांत शंका नाहीं. मार्क्स् हें भविष्य गेल्या शतकांतच वर्तवूं शकला यांत त्याचें एका मर्यादित अर्थानें द्रष्टेपण व्यक्त होतें हेंहि मान्य करण्यास हरकत नाहीं. परंतु योजनाबद्ध अर्थोत्पादनपद्धतीची वाढ होतां होतां जी एक प्रचंड यंत्रप्रधान उत्पादनव्यवस्था अस्तित्वांत येते तिच्यामध्यें मनुष्य हा केवळ एक क्षुद्र घटक म्हणून राहतो, स्वतंत्र व्यक्तित्वाचा त्या अवाढव्य राक्षसी समष्टीमध्यें मागमूसहि राहात नाहीं, किंबहुना त्या डोईजड व्यवस्थेच्या भारानेंच मनुष्याचें मनुष्यत्व चिरडलें जाऊन तोहि यंत्रवत् होतो – याची दखल मार्क्सनें घेतलेली नाहीं. मनुष्याचें मनुष्यत्व व जीवनाचा आनंद ही दुसऱ्यासाठीं, जगण्यामध्यें सामावलीं आहेत.तो कुटुंबासाठीं, गांवासाठीं, समाजासाठीं, राष्ट्रासाठीं आणि कधीं कधीं विश्वासाठीं जगण्यांत धन्यता मानतो. भोगानें नव्हे तर त्यागानें मनुष्याच्या जीवनाचें सार्थक होतें – या सनातन सत्याचें विज्ञान व यंत्रशास्त्र यांची मोहिनी पडलेल्या व त्यांच्या साहाय्यानें










भौतिक जीवन समृद्ध करूं पाहाणाऱ्या आधुनिक मनुष्याला अजून आकलन झालेलें नाहीं. उपभोग्य वस्तूंची समृद्धता असल्यामुळें माणसें एकमेकांशीं स्पर्धा करीत नाहींत, एकमेकांचा हेवादावा करीत नाहींत, एकमेकांशीं युद्धें करीत नाहींत अशी अवस्था एका दृष्टीनें स्पृहणीय तर खरीच. पण त्यांत माणसाच्या माणुसकीचा गौरव नाहीं, माणसांच्या नैतिक उंचीची वाढ नाहीं. कारण खाद्यपेय वस्तूंची विपुलता असली तर पशूहि एकमेकांशीं भांडत नाहींत. अर्थात् यावरून माणुसकीच्या प्रकटीकरणाकरितां दारिद्र्यच स्वीकारणें इष्ट आहे असा कोणी विरोधी निष्कर्ष काढूं नये. परंतु ज्याप्रमाणें एका ठराविक मर्यादेपर्यंत मनुष्याच्या प्राथमिक शारीरिक गरजा भागल्या नाहींत तर तो दीन, लाचार व गुलामी वृत्तीचा होतो, त्याचप्रमाणें एका ठराविक मर्यादेपलीकडे त्यानें आपल्या भौतिक गरजा वाढविल्या व तो समृद्धतेंत लोळूं लागला तरीहि त्याचा निराळ्या रीतीनें अध:पात होतो हा सर्व जुन्या संस्कृतींचा अनुभव आहे. तेव्हां केवळ समृद्धता हें मानवी संस्कृतीच्या प्रगतीचें गमक नव्हे, आणि समृद्धता निर्माण करण्यासाठीं उभी करावी लागणारी अजस्र यंत्रोत्पादनपद्धति शेवटीं माणसाचें व्यक्तित्व नष्ट करून त्याला व्यवस्थेचा गुलाम बनविण्यास कारणीभूत होईल या दोन महत्त्वाच्या कारणांसाठीं यंत्र व विज्ञान् यांच्या साहाय्यानें निर्माण केल्या जाणाऱ्या आधुनिक संस्कृतीला सर्वोदयी तत्त्वप्रणालीचा विचारपूर्वक विरोध आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. ग्रामोद्योगप्रधान संस्कृतीचा आग्रह हा प्रतिगामितेचा पुरावा नाहीं. विज्ञान व यंत्रशास्त्र यांच्या प्रगतीची आणि प्रचंड संभाव्य सुष्ट-दुष्ट शक्तींची पुरेपूर जाणीव असलेल्या एका अद्ययावत् शास्त्रीय, मानवतावादी तत्त्वज्ञानाच्या पुरोगामित्वाचा तो निदर्शक आहे. "भूदानयज्ञमूलक ग्रामोद्योगप्रधान अहिंसक क्रान्ती"च्या घोषणेमागें या तत्त्वज्ञानाची ही अशी प्रभावी प्रेरणा आहे आणि ती आपल्या देशांतील विशिष्ट परिस्थितीमुळें दिवसेंदिवस अधिक प्रभावी ठरणार यांत शंका नाहीं. देशांतील वाढती लोकसंख्या व बेकारीचा प्रश्न जसजसा विकट होईल तसतसे यंत्रप्रधान उत्पादनव्यवस्थेंतील धोके अधिक स्पष्टपणें प्रत्ययाला येतील.

## सहिष्णुता, सत्यनिष्ठा आणि प्रयोगशीलता

अर्थात् कोणी कितीहि महान् द्रष्टा असो, मानवांच्या अंतिम ध्येयाचा त्याला झालेला साक्षात्कार हा अपरिहार्यपणें देशकालपरिस्थितीनें मर्यादित असतो. म्हणून कोणताहि विचार कोणत्याच काळीं परिपूर्ण आहे किंवा तो त्रिकालाबाधित आहे असा दावा करणें अशास्त्रीय होईल. परंतु तरीसुद्धां अमुक एक विचार अमुक परिस्थितींत इतर प्रचलित विचारप्रणालीपेक्षां सापेक्षतेनें अधिक परिपूर्ण आहे असें आपल्याला म्हणतां येईल. शासनमुक्त, शोषणहीन समाज हें सर्वोदयाचें अंतिम साध्य आहे व सत्य व अहिंसा हीं त्याचीं साधनें आहेत. आदर्श साम्यवादी समाजव्यवस्थेंत शासनसंस्था गळून पडेल असें जें मार्क्सनें म्हटलें आहे त्याचाहि अभिप्राय वेगळा नाहीं. परंतु साधनशुचितेच्या सिद्धान्ताची मार्क्सवादी तत्त्वज्ञानाला जोड नसल्यामुळें त्याला जें विकृत स्वरूप आलें त्याचा परिणाम काय झाला व होत आहे हें जग पाहात आहे. याच्या उलट, धार्मिक, नैतिक, सामाजिक, आर्थिक, राजकीय, सांस्कृतिक वा शास्त्रीय – कोणत्याहि दृष्टिकोनांतून सर्वोदयी तत्त्वज्ञानाची छाननी केल्यास तें इतरांपेक्षां अधिक शास्त्रीय, अधिक पुरोगामी व अधिक मानवतावादी आहे असें सिद्ध होईल. गांधीजी, विनोबाजी किंवा सर्वोदयी विचाराचे अन्य प्रणेते सर्वोदयाच्या सिद्धान्तांचें विवेचन अथवा प्रचार करतांना निरनिराळ्या सामाजिक शास्त्रां-( social sciences )नीं रूढ केलेली व आधुनिक सुशिक्षितांस परिचित असलेली अशी परि-








भाषा वापरीत नाहींत ही गोष्ट खरी. परंतु सर्वोदयी तत्त्वज्ञानाचा गाभा इतका बुद्धिनिष्ठ व तर्कशुद्ध आहे कीं मानवी संस्कृतीच्या आजपर्यंतच्या उत्क्रांतीचा व यापुढील मानवी प्रगतीचा सर्व बाजूंनीं विचार करणारा कोणीहि बुद्धिमान् मनुष्य सर्वोदयाच्या सर्वसमावेशक सिद्धान्तांच्या बाबतींत कांहीं मूलभूत स्वरूपाचा आक्षेप घेऊं शकेल असें वाटत नाहीं. कारण, निरनिराळया देशांतील आतांपर्यंतचीं धर्मशास्त्रें, नीतिशास्त्रें, राज्यशास्त्रें किंवा अर्थशास्त्रें यांतून व्यक्त झालेल्या सनातन सद्‌विचारांचा या तत्त्वज्ञानांत अंतर्भाव झाला आहे. बुद्धिवाद, लोकशाही, आर्थिक, सामाजिक आणि राजकीय समता, आंतरराष्ट्रीय सहकार्य व जागतिक शांतता इत्यादि आधुनिक ध्येयतत्त्वांच्या दृष्टीनें तें तत्त्वज्ञान तपासून पाहिलें असतां अगर सहिष्णुता, साधनशुचिता, परस्परप्रेम, मानवता, विज्ञानांतील सत्यनिष्ठ प्रयोगशीलता, अन्यायप्रतिकारांतील शौर्य, तेजस्विता, त्याग आणि उच्च ध्येयवादित्व इत्यादि निरनिराळया काळीं निरनिराळया देशांत मान्यता पावलेल्या कोणत्याहि उदात्त मूल्यांच्या निकषावर तो विचार अगर ते सिद्धान्त घासून पाहिले असतां ते टिकतील इतका खोल अभ्यास, सत्यान्वेषी चिंतन, सूक्ष्म दर्शन, दीर्घ त्याग आणि तपस्या त्या विचाराच्या पाठीशीं उभी आहे. सर्वसामान्यपणें थोर मानल्या जाणाऱ्या व्यक्तींचे विचारहि पुष्कळ वेळां एकांगी दृष्टि, पूर्वग्रह व अभिनिवेश यांनी शबलित किंवा विकृत झालेले दिसून येतात. परंतु सहिष्णुता, सत्यनिष्ठा व निरंतर प्रयोगशीलता यांवर विशेष कटाक्ष ठेवून गांधीजींनीं आणि विनोबाजींनीं आपले विचार अधिकांत अधिक शुद्ध राखण्याचा कसोशीनें प्रयत्न केला आहे. आणि म्हणून त्यांना प्रतीत झालेल्या सिद्धान्तांचें जें एक मूलग्राही समग्र जीवनदर्शन तयार झालें, तें कोणत्याहि बौद्धिक कसोटीला उतरणारें आहे.

प्रतिभा नवनवोन्मेषशालिनी असते असें म्हणतात. या लेखाच्या सुरवातीला म्हटल्याप्रमाणें कांहीं सनातन सत्यांचा मानवी मनाला होणारा आविष्कारहि असाच नव्या नव्या स्वरूपांतून नव्या नव्या व्यक्तींच्या द्वारा होत असतो. हजारों वर्षांच्या भारतीय संस्कृतीमध्यें सत्य व अहिंसा या दोन नीतितत्त्वांचा आविष्कार हरिश्चंद्र, वसिष्ठ, राम, धर्मराज, बुद्ध, ज्ञानेश्वर, तुकाराम आदि पौराणिक वा ऐतिहासिक व्यक्तींच्या जीवनचरित्रांतून झाला आहे. आज विसाव्या शतकांत तो गांधीजींच्या व विनोबाजींच्या द्वारा होत आहे हें व्यापक ऐतिहासिक दृष्टीनें पाहाणाऱ्या विचारवन्तांनीं लक्षांत घेणें आवश्यक आहे. १९२० ते १९४७ च्या दरम्यान महात्मा गांधींच्या नेतृत्वाखालीं झालेला अहिंसात्मक स्वातंत्र्ययुद्धाचा प्रयोग हा एक महान् सांस्कृतिक क्रान्ति घडवून आणणाऱ्या व मानवी इतिहासांत अत्यंत उज्ज्वल ठरणाऱ्या अशा एका नवीन युगाची नांदी होती याची जाणीव आमच्यांतील कांहीं सुशिक्षितांना व विद्वानांना जेवढी व्हावयास पाहिजे होती तेवढी त्यावेळीं दुर्दैवानें झाली नव्हती. परंतु आतां काळ बदलला आहे. म्हणून त्याच क्रान्तीचें महान् कार्य भूदानयज्ञाच्या रूपानें विनोबाजी धीरोदात्तपणें पुढें चालवीत आहेत हें सर्वांनींच व विशेषत: सुशिक्षित तरुणांनीं ओळखून त्यांनीं त्या यज्ञांत आपापाल्या शक्तीप्रमाणें आपला हविर्भाग दिला तर फ्रेंच राज्यक्रान्तीच्या वेळीं वर्डस्वर्थनें काढलेले उद्‌गार या लेखाच्या प्रारंभीं उद्धृत केले आहेत ते उद्गार भूदानयज्ञमूलक ग्रामोद्योगप्रधान अहिंसक क्रान्तीच्या उषःकालीं अधिक सार्थ ठरण्याचा संभव आहे.

---

## भूदान आणि सत्याग्रह

मी जें आज करीत आहे तो सत्याग्रहच आहे. हें माझें उन्हातान्हांत थंडीपावसांत सतत फिरणें, निरंतर लोकांना समजावून देत रहाणें, दरिद्री लोकांकडून दान घेणें—हें सर्व काय आहे ?...... मला सत्याग्रहाची शक्ति उभी करावयाची आहे, गरीबांची शक्ति वाढवावयाची आहे...लहान माणसें मालकी सोडतील तेव्हां मालकी ही गैर आहे हें सिद्ध होईल. तेव्हांच मोठे लोकहि ती सोडतील, एक नैतिक दबाव येईल आणि मग त्यांच्या हृदयांत प्रवेश होईल. नैतिक दबाव हें सत्याग्रहाचें एक अंग आहे.

— आचार्य विनोबा, ३०।१२।१९५४










श्री. गो. बा. देशपांडे

# नाग-विदर्भ आणि भूदान

नाग-विदर्भातील भू-दान-यज्ञआंदोलनाला पू० विनोबांच्या शिवरामपल्लीयात्रेपासूनच सुरवात झाली. शिवरामपल्लीच्या संमेलनास पायीं प्रवास करूनच पोचायचें असें विनोबांनीं ठरवलें. वर्धा सोडतांना लक्ष्मीनारायण-मंदिरांत प्रार्थना-सभा झाली. विनोबांना निरोप देण्यांत आला त्यावेळीं उत्तरादाखल केलेल्या भाषणांत विनोबा म्हणाले : " कदाचित् मी आतां परत येणारहि नाहीं. अहिंसेच्या कसोटीची वेळ हैदराबाद संस्थानांत आली आहे. शोषणाची व भुकेची प्रतिक्रिया म्हणजे तेथें चालू असलेलें हिंसेचें तांडव आहे. आपल्या निष्ठेला तें आवाहन आहे. तेथें पदयात्रा करीतच मी जावयाचें ठरविलें आहे". एक लहानसें दल सोबत घेऊन विनोबा हैदराबाद-संस्थानाकडे जावयास निघाले. संमेलन झालें. मंडळी घरोघर परतली व विनोबा तेलंगणांत शिरले. पोंचमपल्लीला भू-दान-यज्ञ आंदोलनाचा प्रत्यक्ष प्रारंभ झाला. 'विनोबा केव्हां परत येतात, तेलंगणांत काय करतात ? ' हे प्रश्न नाग-विदर्भात अनेक व्यक्तींच्या हृदयांत उठत होते. या विभागांतील लोकांनीं विनोबांचा कर्म-योग प्रत्यक्ष पाहिला व अनुभवला होता, त्यांच्या तालमींत तयार झालेल्या अनेक निष्ठावान् कार्यकर्त्यांचा पुरुषार्थ पाहिला होता, विनोबांचें ऋषितुल्य जीवन अगदीं जवळून पाहिलें होतें. व्यक्तिगत सत्याग्रहाच्या वेळीं त्यांची पहिला सत्याग्रही म्हणून निवड झाली तेव्हां देश ' हा कोण विनोबा ! ' असा प्रश्न विचारीत होता. पण नाग-विदर्भात हा प्रश्न उत्पन्न झाला नाहीं. ' याहून अधिक योग्य निवड होऊं शकत नव्हती ' असा अभिप्राय या प्रान्ताच्या कोनाकोपऱ्यांत व्यक्त केला गेला होता. त्यामुळें विनोबा तेलंगणांत यशस्वी झाल्याविना राहायचे नाहींत, याबद्दल सर्वांना खात्री होती. देशांतील प्रमुख वर्तमानपत्रांत तेलंगणाची त्रोटक बातमीहि नव्हती. पण नाग-विदर्भात मात्र त्यांच्या हालचालीची इत्थंभूत वार्ता असायची. कुणाला न कळतच नाग-विदर्भात भू-दान-आंदोलनाचें वातावरण तयार होत होतें. हैदराबाद संस्थानांतील क्षुब्ध वातावरणाची झळ या प्रान्तांत येऊन पोंहचतच होती. तेथील वणव्याच्या ज्वाळा येथें येतात कीं काय अशी साधार भीति येथें उत्पन्न झाली होती. त्यामुळें एकीकडे भीति व दुसरीकडे गौरवपूर्ण, आशायुक्त कुतूहल अशा संमिश्र भावनांची हालचाल या प्रान्तांत अनुभवाला येत होती. भावनांच्या संयोगांतून या प्रान्ताच्या लोकमानसाची तयारी होत होती. अशा स्थितींत पू० विनोबा तेलंगणांत यश पदरीं घेऊन परतले. सेवाग्रामला, पू० गांधीजींच्या झोंपडीत विनोबांची सर्वोदययात्रा समाप्त झाली.

लवकरच विनोबांनीं योजना समितीशीं बोलणीं करायला दिल्लीला जावयाचें ठरविलें. तेलंगणांतून येतांना ते चांदा, वरोडा, हिंगणघाट, वर्धा या मार्गानें आले. दिल्लीला जातांना त्यांनीं वर्धा, गुमगांव, नागपूर, सावनेर, पांढुर्णा, छिंदवाडा या मार्गानें जावयाचें ठरविलें. दक्षिण टोंकापासून उत्तर टोंकापर्यंत विनोबांची पदयात्रा झाली. आंदोलनाचा तो केवळ आरंभकाल होता. विनोबा नागपूरला आले. अनेक कार्यकर्ते जमीनमालकांच्याकडून दानपत्रें भरून घ्यायला गेले. कांहींनीं 'विचार करतों' म्हटलें, कांहींनीं दानपत्रें लिहून दिलीं. तेव्हां सहावा हिस्सा, दहावा हिस्सा याचा कांहीं विधिनिषेध नव्हता. ज्याला जितकें द्यायचें तितकें त्यानें द्यावें, असा प्रकार होता. तरीपण एक दानशूर गृहस्थ भू-दान मागायला गेलेल्या एका प्रतिष्ठित कार्यकर्त्याला म्हणाले, ' तुम्ही सांगाल तेवढें लिहून देतों. संकोच करूं नका '. बिचाऱ्या कार्यकर्त्यालाच प्रश्न पडला कीं 'काय मागावें ? किती मागावें ?' मोठा हिय्या करून त्यांनीं शंभर एकरांची मागणी केली. दानशूर गृहस्थांनीं ' तथास्तु ' म्हटलें. गोष्ट विनोबांचे कानीं गेली तेव्हां ते म्हणाले : " हरिश्चन्द्राचा जमाना येत आहे. मी मागायला गेलों असतों तर शंभर एकर ठेवून बाकीची सर्व दानांत द्या असें म्हटलें असतें " यावरून वारा कोणीकडे वहात जाणार याची चाहूल या प्रान्ताला सर्वांत प्रथम लागली. फार प्रचार नसतां, कुणाची विशेष मदत नसतां मध्यप्रदेशांत त्यावेळीं एकूण आठ हजार एकर भू-दान प्राप्त झालें. प्रान्त सोडतांना विनोबांनीं एक भू-दान-समिति नियुक्त केली. तिचें नांव त्यांनीं 'शून्य-समिति' ठेवलें. थोडयाच अवधींत जमीनीचें वांटपहि करण्यांत आलें. जवळजवळ १ हजार एकर जमीन वाटण्यांत आली.








विनोबा दिल्लीला पोंचले. तेथून उत्तर प्रदेशांत गेले. उत्तर प्रदेशांत पांच लक्ष एकर जमीन मिळाली. मध्यप्रदेशांत विधायक कार्यकर्त्यांची तर खाणच. विनोबांचे अनेक महान् साथी या प्रान्तांत ! अ. भा. चरखा-संघाचें कार्यालय येथें, अ. भा. ग्रामोद्योग संघ येथें, अ. भा. तालीमी-संघ, गो-सेवा-संघ, अ. भा. सर्वसेवासंघ — एकूणएक विधायक संस्थांची अ. भा. कार्यालयें येथेंच. त्यामुळें येथें कार्यकर्ते नाहींत असें कसें म्हणावें ? पण काम तर वाढेना. कॉं. कमिट्यांचे ठराव झाले. त्यामुळें राजकीय पक्षाचें सहकार्य नाहीं असेंहि म्हणतां येईना. अशा स्थितींत पू० कृष्णदासजी जाजू यांनी उमरेड, रामटेक, सावनेर, काटोल या तालुक्यांत प्रथम दौरा केला. सभांना यथातथा उपस्थिति होती. लवकरच काटोल तालुक्यांतील तरुण मंडळींनीं कार्याला आरंभ केला. विदर्भांत आचार्य दादा धर्माधिकारी व दादाभाई नाईक यांनीं दौरा केला. वर्धा जिल्ह्यांत विनोबांचे एक बालमित्र श्री. बाबाजी मोघे यांनीं कार्याला सुरवात केली. यवतमाळ जिल्ह्यांत डॉ. मोरे व श्री. शंकरलालजी यांनीं एकशेंवीस दिवसांची विदर्भ-भू-दान-पदयात्रा काढली. ता. ८ नोव्हें. १९५१ ला टॉलस्टॉयजयंतीच्या शुभमुहूर्तावर ही यात्रा सुरू झाली. सामान्य मंडळींनी आरंभिलेला हा प्रथम प्रयत्न अपेक्षेबाहेर यशस्वी झाला. सर्व वऱ्हाडांत या यात्रेचे पडसाद उठले. अमरावती-जिल्ह्यांत, अचलपूर तालुक्यांत, बुलढाणा जिल्ह्यांत, मलकापूर तालुक्यांत, यवतमाळ तालुक्यांत, पदयात्रा सुरू झाल्या. भंडारा जिल्ह्यांतील भंडारा तालुक्यांत, आर्वी व हिंगणघाट तालुक्यांत, नागपूर जिल्ह्यांतील काटोल तालुक्यांत, हळूंहळूं कार्याला आरंभ झाला. हळूंहळूं कार्यकर्ते एकत्रित येऊं लागले. राजकीय पक्षाचे स्थानिक पुढारी थोडें थोडें लक्ष घालूं लागले.

याचवेळीं पू० शंकरराव देव यांनीं नाग-विदर्भांत पदयात्रा करण्याचें ठरविलें. पदयात्रेची पूर्वतयारी करण्यासाठीं व वातावरण निर्माण करण्यासाठीं आचार्य दादा धर्माधिकारी व दादाभाई नाइक यांनीं विदर्भांतील सर्व तालुक्यांचा दौरा केला. शंकररावांच्या पदयात्रेच्या वार्तेनें वातावरणांत बराच उत्साह निर्माण झाला. पदयात्रा बुलढाणा-जिल्ह्यांतील मलकापूरपासून सुरू होऊन सेवाग्रामला समाप्त व्हावयाची असें ठरलें. बावीस दिवसांत दोनशें चाळीस मैल अंतर चालून जावयाची योजना तयार झाली. ता. १० फेब्रुवारी ५३ ला पदयात्रा सुरू झाली. मलकापूरला दान अगदीं अल्प मिळालें. पण सभा मात्र अगदीं प्रचंड झाली. खामगांव, अकोला, अमरावती, यवतमाळ या प्रमुख गांवीं मुक्काम होता. प्रत्येक ठिकाणीं महिला, विद्यार्थी, कार्यकर्ते यांच्या खास सभा व्हायच्या व शिवाय प्रचंड जाहीर सभा व्हायची. दानाचा आंकडा वाढत वाढत यवतमाळला १५०० एकर दान जाहीर करण्यांत आलें. प्रत्येक मुक्कामावर जिल्ह्यांतील प्रमुख मंडळी भेटीला यायची. बोलणीं व्हायचीं. पू० शंकररावांचे आदेश घेऊन मंडळी कामाची योजना करून परत जायची. २ फेब्रुवारीला सेवाग्रामला तालीमी संघांत स्वागताचा अत्यंत हृदयस्पर्शी समारंभ झाला व विदर्भाला चालना देणारी पहिली पदयात्रा समाप्त झाली. यात्रेंत एकूण तीन हजार एकरांचें दान मिळालें.

चांदिल-संमेलनांत राष्ट्रसंत तुकडोजीमहाराज यांनीं आंदोलनांत उडी घेण्याचा निश्चय केला व त्याच वर्षीच्या मे महिन्यांत जातीनें खटपट करून त्यांनीं यवतमाळ जिल्ह्यांत अकरा दिवसांचा दौरा आंखला. सर्व पक्षांचें, गटांचें व प्रभावी व्यक्तींचें सहकार्य घेतलें. मोहिमेचा आरंभ पारवा येथें मुख्यमंत्री रविशंकर शुक्ल यांच्या अध्यक्षतेखालीं झाला. पहिल्या दिवशीं तीनहजार एकर जमीन मिळाली. अकराव्या दिवशीं समारोपाचा सोहळा यवतमाळ येथें साजरा करण्यांत आला. त्या दिवशींपावेंतों एकूण अकरा हजार एकर जमीन भू-दानांत मिळाली होती. यवतमाळ जिल्ह्यांत मोठे जमीनदार पुष्कळ, जमीन हलक्या दर्जाची व कार्यकर्ते अनेक असल्यामुळें हा विक्रम झाला असें म्हणण्यांत आलें. महाराजांच्या व्यक्तित्वाचा प्रभाव, कालानुरूप मागणी व आंदोलनासाठीं तत्पूर्वी करण्यांत आलेलें कार्य या गोष्टी नजरेआड करण्यांत अर्थ नाहीं. लवकरच महाराजांनीं अकोला जिल्ह्यांत सात दिवसांची मोहीम आंखली. सात दिवसांत २१०० एकर जमीन मिळाली. मोहिमेचा सर्व खर्च अकोला-निवासी लोकांनीं केला. अ. भा. महिलापरिषदेच्या श्री. राधादेवी गोयनका यांनीं बरेच श्रम घेतले. अकोला जिल्ह्यांत जमीन फारच सुपीक आहे. पण तेथेंहि अपेक्षेबाहेर यश आलें.












## नाग-विदर्भ आणि भूदान

चांडिलसंमेलनानंतर पू. शंकरराव देव यांनीं पुनः रायगडपासून नागपूरपावेतों पदयात्रा केली. पावसाळा असतांना देखील हजारों लोक सभांना येत असत. पदयात्रेंत एकूण ४० दिवसांत पांच हजार एकरांचें भू-दान मिळालें.

बोध-गया-संमेलनानंतर सप्टेंबर १९५४ मध्यें पू. विनोबाजींच्या वाढदिवसापासून गांधीजींच्या जन्म-दिवसापर्यंत ( हिंदु तिथीप्रमाणें ) प्रान्तांतील प्रत्येक तालुक्यांत पदयात्रा घेण्याचा निर्णय जुलै महिन्यांत वर्धा येथें जीवनदान देणाऱ्या कार्यकर्त्यांच्या शिबिरांत घेण्यांत आला. त्याप्रमाणें विदर्भांतील सर्व तालुक्यांत पदयात्रा निघाल्या. नागपूर-विभागांतील चांदा जिल्ह्यांत व नागपूर-तालुका सोडून सर्वत्र पदयात्रा निघूं शकल्या. मेळघाट तालुका म्हणजे आदिवासी वस्तीचा विभाग. त्या तालुक्यांत फक्त पांच दिवसांत १००० हजार एकर जमीन मिळाली. तेथील पदयात्रेचें नेतृत्व भू-दान-मंडळाचे एक सदस्य श्री. राजेन्द्र मालपाणी यांनीं केलें होतें.

वर्धा येथील महिला-आश्रमांतील विद्यार्थिनी व माधान येथील कस्तुरबा-केंद्रांतील विद्यार्थिनी यांनीं अनेकवार भू-दान कार्यांत बहुमोल सहकार्य दिलें आहे. 'कस्तुरबा-पक्ष' साजरा करण्यासाठीं सर्व केन्द्रांतून सभोंव-तालच्या प्रदेशांत पदयात्रा काढण्यांत आल्या होत्या. छोटेसें कलापथक तयार करण्यांत आलें होतें.

प्रान्तांतील अनुभवी कार्यकर्त्यांनीं एकत्रित येऊन स्थानिक मंडळींच्या मदतीनें एका सप्ताहाच्या अवधींत तालुक्यांतील प्रत्येक गांवीं जाण्याचा अभिनव उपक्रम प्रथम मूर्तिजापूर तालुक्यांत करण्यांत आला, नंतर यवत-माळ जिल्ह्यांतील केळापूर तालुक्यांत करण्यांत आला. केळापूर तालुक्यांत एका आठवड्यांत ८ हजार एकर जमीनीचें दान मिळालें. ४० टोळ्या आठवडाभर फिरत होत्या. ही मोहीम श्री. चंदुसिंग नाईक यांनीं ठरविली व पार पाडली. तशाच प्रकारची दुसरी मोहीम त्यांनींच दारव्हा तालुक्यांत नुकतीच पार पाडली. तींत ३३२५ एकर जमीन मिळाली.

कार्यकर्त्यांचें प्रान्तीय शिबिर प्रथम परंधाम ( पव-नार ) येथें झालें ( १९५२ ). त्यावेळीं १६ कार्यकर्ते उपस्थित होते. ऑगस्ट १९५४ मध्यें वर्धा येथें झालेल्या शिबिरांत १५४ कार्यकर्ते उपस्थित होते.

पू० विनोबांच्या गेल्या वाढदिवसापासून ( सप्टें. १९५४ ) प्रान्तव्यापी अशा दोन पदयात्रा काढण्यांत आल्या. एक ब्रह्मणपूरपासून निघून महाकोशल विभागांतून ६०० मैलांचा प्रवास करून बैतुल येथें ११० दिवसानंतर समाप्त झाली. या पदयात्रेंत प्रां. भू-दानसमितीचे संयोजक श्री. दादाभाई नाईक, स्वर्गीय ठा. प्यारेलालसिंग, स्व. कु. शांताताई डोंगरे ही मंडळी होती. दुसरी टोळी नागपूर येथून निघाली. तीत भू-दान-यज्ञसमितीचे सह-संयोजक, श्री. नारायणराव जवरे व नाना भिसे ही मंडळी होती. कु. शांताताई डोंगरे पदयात्रा करीत असतांनाच बिलासपूर येथें मेंदूच्या मलेरियानें स्वर्गवासी झाल्या. ठाकूर प्यारेलालसिंग हृदयक्रिया बंद पडून जबलपूर येथें पदयात्रेचा पडाव असतांना स्वर्गवासी झाले.

नाग-विदर्भांत भू-दानचळवळीचें पाऊल एकसारखें पुढें पडत आहे. येत्या जूनच्या आंत प्राप्त झालेल्या बहुतांश जमीनीचें वितरण केलें जाईल. कार्यकर्त्यांची संख्या वाढावी यासाठीं विशेष प्रयत्न केले जातील. खेड्यांतील भूमिहीन वर्ग व शहरांतील भूमिहीन मध्यमवर्ग यांतून कार्यकर्ते निघा-वेत असा प्रयत्न केला जाणार आहे. विद्यार्थ्यांचीं पथकें सुट्टीच्या वेळीं काढतां यावीत असा प्रयत्न सुरू आहे. भू-दात्यांनीं स्वतः भू-दानाचे कार्यकर्ते बनावे असा प्रयत्न चालू आहे. हजारों भूमिहीनांच्या प्रचंड सभांतून 'जमीन कुणाची ? कसेल त्याची ', 'जमीन कुणाची ? देवाची, गांवाची ' – हे उद्घोष मालकीचें सिंहासन हादरवून सोडीत आहे. वितरणाचे आतांपावेतो अनेक कार्यक्रम प्रस्तुत लेखकानें घडवून आणले आहेत. भूमि-मालकांच्या हृदयांतील परमेश्वराचें भूमि-प्राप्तीच्या वेळीं दर्शन घडलें. गरीब, दीन, दारद्री मजुरां-च्या हृदयांतील दरिद्र-नारायणाचें दर्शन वितरणाच्या वेळीं होत आहे. त्यागावांचून गरीबांची एकी नाहीं हें सूत्र प्रत्यक्षांत अंमलात येत आहे. दगडाला पाझर फोडील व खडकाला हादरवून सोडील असे दोन्ही गुण या पद्धतींतून प्रकट होत आहेत. शे. का. पक्षाचें विरोधी वातावरण असणाऱ्या जळगांव तालुक्यांत अनेक कार्य-कर्ते बाहेर पडत आहेत. आतां सर्वत्र एकच उद्घोष आहे : 'बोयेगा सो खायेगा '. स्वयंस्फूर्तीनें भूमिहीन म्हणत आहेत : 'जमीन खरीदणें पाप आहे. '. उभीं








पिकें असलेल्या शेतावरील कायद्यानें संरक्षण दिलेला ताबा सोडणारी एकशेंसाठ गांवकरी मंडळी प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहतांना हरिश्चन्द्राच्या दातृत्वाची आठवण आल्याविना राहिली नाहीं. या आंदोलनामुळें विदर्भ-नागपूरचा गरीब माणूस खडबडून जागा झाला आहे.

मलकापूर, खामगांव, जळगांव, बाळापूर, अकोला, आकोट, मूर्तिजापूर, अमरावती, अचलपूर, मंग्रूळनाथ, चांदूर, मोर्शी, यवतमाळ, केळापूर, पुसद, दारव्हा, वणी, वर्धा, हिंगणघाट, आर्वी, वरोडा, नागपूर, काटोल या तालुक्यांत भूदानकार्यार्थ संपूर्ण वेळ देणारे तीसपेक्षां अधिक कार्यकर्ते आहेत.

मध्यप्रदेशांत मिळालेल्या एकूण जमीनीपैकीं अर्धी-अधिक जमीन नाग-विदर्भांत प्राप्त झाली आहे. नाग-विदर्भांत भूदानांत प्राप्त झालेली भूमि व तिचें वितरण यांचें कोष्टक खालीं दिलें आहे.

---

## नागविदर्भांत डिसेंबर १९५४ अखेर झालेली भूदानप्राप्ति व भूवितरण

| | प्राप्त एकर | वितरण (एकर) | कुटुंबसंख्या |
|---|---|---|---|
| नागपूर | ४४६२·३१ दानपत्रें (९८२) | ५०९·७७ | १७९ |
| भंडारा | १२७६·८१ दा. प. (३६२) | ४७·९४ | १३ |
| वर्धा | ७५३५·११ दा. प. (१८८६) | १६५३·७९ | ३०५ |
| चांदा | १६१२·६२ दा. प. (२६७) | १५४·०५ | २८ |
| अमरावती | २१३५·२३ दा. प. (५९८) | १६८·१५ | ३३ |
| बुलढाणा | १२९६·८० दा. प. (१११) | २९२·५३ | ५६ |
| आकोला | २६४९·५२ दा. प. (३३६) | — | — |
| यवतमाळ | २९४१२·९१ | ७०० | १३० |
| | ५०३८१·३१ | २५२६·२३ | |

श्री. वैकुंठलाल मेहता

# श्री. शंकरराव देव यांची सहकारी शेतीची योजना

श्री. शंकरराव देव यांच्या वयाला ६० वर्षे पुरीं होत आहेत. ६० वर्षे पूर्ण झाल्यावर वानप्रस्थाश्रम स्वीकारण्याचा विचार मनांत येतो. पण श्री. शंकररावांसारख्या मनानें आणि देहानें उत्साही असलेल्या कर्मयोगी व्यक्तीच्या बाबतींत हा विचार देखील करणें कठीण आहे. तसें पाहिलें तर ते संन्यासीच आहेत. आणि पुढील किती तरी वर्षे त्यांच्या हातून सक्रिय सेवा घडायची आहे. प्रस्तुत लेखांत त्यांच्या-पुढें — आणि आपल्यापुढें देखील — जीं अनेक कार्ये करावयाचीं पडलीं आहेत, त्यांतील विशिष्ट कार्याबाबत ऊहापोह करावयाचा आहे. आज त्यांचें सर्व लक्ष्य त्या कार्याकडेच लागलेलें आहे. पूर्वी देखील त्यांचा बराच वेळ या कार्याच्या चिंतनांत व्यतीत होत असे.

आचार्य विनोबाजी भावे यांनीं आपली भूदान-यज्ञाची मोहीम सुरू करण्यापूर्वी श्री. शंकरराव देव यांनीं पुढें मांडलेले विचार सध्यां मजपुढें आहेत. श्री. देव १९५० सालच्या आपल्या एका वक्तव्यांत म्हणतात : " जमीन ही निसर्गदत्त आहे. ती कांहीं मनुष्यनिर्मित नाहीं. " जमीनीवर समाजाचा अधिकार आहे. व्यक्तींना त्यासंबंधांत कांहीं हक्क तेवढे असूं शकतील. उदाहरणार्थ, शेतीची लागवड करणें, जमीनीबाबत हक्क सुपूर्द करणें, समाजानें ठरविलेल्या अटीनुसार ते हक्क विकणें इत्यादि. वरील तत्त्वानुसार श्री. शंकरराव देव यांनीं शेतीसुधारणेचा एक आराखडा आंखला होता. आणि आज जरी कुळकायदा आणि शेतीसंबंधींचे दुसरे कायदे झाले असले आणि भूदानयज्ञ-चळवळीनें दृष्टिकोन बदलेला असला तरी देखील श्री. शंकरराव देव यांनी तेव्हां मांडलेला आराखडा आजहि विचारांत घ्यावयास हरकत नाहीं.

## सहकारी शेतीचें महत्त्व

भूदानयज्ञ-चळवळीचे देशांतील निरनिराळया भागांत वेगवेळे पडसाद उठलेले आहेत. पण श्री. विनोबाजी नेहमीं म्हणतात त्याप्रमाणें भूदान-चळवळीचें यश जमीन मिळण्यांत नसून जमीनीच्या समान वांटपांत आहे. भूहीनांना जमीनी देण्यांत येत असतांना त्या संबंधांत नवेच प्रश्न निर्माण होतात. आणि हे प्रश्न आपण हेरले पाहिजेत. श्री. शंकरराव देव यांनीं ते प्रश्न पांच वर्षापूर्वी अचूक हेरले होते. खरोखरीं या प्रश्नांचा उकल योजनाबद्ध पद्धतीनें आणि व्यवस्थितपणें व्हावयाला पाहिजे. या प्रश्नांचा उकल करतांना आपल्यापुढील दृष्टिकोन आणि कार्यपद्धति मूळ कार्यक्रमाच्या अंगभूत तत्त्वांशीं जुळती असली पाहिजे. तीं तत्त्वें अशीं : (१) जमीनीची अंतिम मालकी समाजाची आहे. (२) ज्या व्यक्तीकडे जमीन लागवडीला आणण्याचा हक्क आहे त्यानें जमीनीवर खपलें पाहिजे. (३) आणि ज्यांना लागवडीसाठीं जमीन नाहीं, त्यांना ज्यांच्याजवळ वाजवीपेक्षां अधिक जमीन आहे त्यांनीं ती दिली पाहिजे. या जमीनीच्या फेरवांटपांत ज्यांना तात्पुरती किंवा कायमची जमीन मिळणार नाहीं त्यांना उपजीविकेचें दुसरें साधन मिळवून दिलें पाहिजे. १९५० सालीं श्री. शंकरराव देव यांनीं जेव्हां आपला शेतीसंबंधीचा कार्यक्रम पुढें मांडला तेव्हां अशाच प्रकारचे विचार, दृष्टिकोन व कार्यपद्धति त्यांच्यापुढें होती. श्री. शंकर-

रावांनीं आपल्या कार्यक्रमांत सहकारी शेतीला फार महत्त्वाचें स्थान दिलें आहे. भूदानयज्ञचळवळींत जमिनीचें वांटप करीत असतां जर किमान प्रमाणापेक्षां कमी जमीन वांटण्यांत आली तर तो जमीनीचा तुकडा चरितार्थक्षम कसा होऊं शकेल हा एक प्रश्नच आहे. अशा न परवडणाऱ्या लहान जमीनीच्या तुकड्यांबाबत श्री. शंकरराव देव यांची सूचना अशी कीं, हे लहान तुकडे सहकारी शेतींत विलीन करून घ्यावेत व अशा जमीनी सहकारी शेतीपद्धतीनें लागवडीखालीं आणाव्या. त्या जमिनीवर मालकी समाजाची राहील पण जमीन लागवडीखालीं आणण्याचा हक्क मात्र व्यक्तीचा असेल. त्यामुळें लागवडीखालील जमीनीच्या घटक तुकड्याचें क्षेत्रफळ वाढेल आणि शेतीचीं कामें अधिक उत्तमपणें करतां येतील. हीं शेतीचीं कामें सहकारसंघटित समाजाच्या जीवनांतील केंद्रस्थानें बनतील अशी कल्पना आहे.

## ग्रामीण औद्योगिक सहकारी संस्था

शेतीची फेरवांटणी करण्यांत आली तर कांहीं कामें संयुक्तपणें करावीं लागतील आणि शेतमजुराची पद्धति बंद होईल. त्याचा एक परिणाम असा होईल कीं आतांपर्यंत अर्धवट ज्यांना काम मिळत होतें ते बेकार होतील म्हणजे प्रच्छन्न असलेली अर्धवट रोजगारी उघड उघड बेकारी म्हणून प्रकट होईल. शेतीरोजगारीच्या घडणींत जेव्हां असा बदल घडून येईल तेव्हां व त्यावर श्री. शंकररावांचा उपाय असा कीं, जमीनीची वांटणी करून सहकारी शेती अमलांत आणतांना त्याबरोबरच ग्रामीण औद्योगिक सहकारी संस्था स्थापन करण्याचें कार्य जोरानें सुरूं झालें पाहिजे. ह्या औद्योगिक सहकारी संस्थांना मूळ धरतां यावें म्हणून प्रतिस्पर्धी स्वरूपाच्या मोठ्या उद्योगधंद्यांवर नियंत्रणें घातलीं पाहिजेत आणि विकेंद्रित उत्पादनासाठीं कांहीं क्षेत्र राखून ठेवलें पाहिजे. शासनसंस्थेनें ग्रामीण औद्योगिक सहकारी संस्थांना संरक्षण तर दिलेंच पाहिजे पण त्याखेरीज त्यांना कच्चा माल, पती-( credit )संबंधींच्या सोयी आणि माल बाजारांत ठेवणें आणि त्यांची विक्री यासंबंधांतहि इतरांच्या मानानें अधिक सवलती देण्याचें धोरण ठेविलें पाहिजे.

आतां देशांतील निरनिराळया भागांत भूदानयज्ञचळवळ जोरांत चालूं आहे. शेतीसुधारणांच्या योजनेमुळें ग्रामीण अर्थव्यवस्थेंत परिवर्तन घडून येत आहे. म्हणून श्री. शंकरराव देव यांनीं तयार केलेल्या कार्यक्रमाची जेवढी १९५० सालीं गरज होती तेवढीच किंबहुना अधिकच गरज आजहि आहे. राष्ट्रीय नियोजनसमितीचा सर्वसाधारण दृष्टिकोणहि जवळजवळ असाच आहे. मुंबई-राज्यानें एकट्यानें सहकारी शेतीच्या विकासाच्या योजना आंखल्या आहेत. हें एवढें राज्य वगळलें तर इतरत्र अशा प्रकारच्या शेतीउत्पादनाच्या संघटनांच्या बाबतींत केवळ सदिच्छेव्यतिरिक्त अधिक कांहीं झालेलें दिसून येत नाहीं. मुंबई राज्याचाहि या बाबतींतला अनुभव यासंबंधीं कोणताहि निर्णय देण्याइतका दीर्घकालीन नाहीं. १९५२–५३ च्या ( ' सहकारी ' ) वर्ष अखेर मुंबई राज्यांत २४६ सहकारी शेती संस्था अस्तित्वांत होत्या. त्यांचे एकंदर सभासद ७२७१ होतें आणि त्यांनीं ७५,६७४ एकर क्षेत्र व्यापलें होते. ह्या संस्थाचे तीन भिन्न प्रकार होते : संयुक्त ( joint ) शेती, कूळ ( tenant ) शेती आणि सामुदायिक (collective) शेती –. या प्रत्येक प्रकारच्या संस्थांचे आंकडे अनुक्रमें १०१, ६१ व ८४ असे होते. या सहकारी संस्थांचा एकंदर परिणाम काय झाला याचें मूल्यमापन करणें सुरूं आहे. पण या निरनिराळया संस्था स्थापन करण्यांत निरनिराळी परिस्थिति कारणीभूत झाली असल्यानें त्यांतून एक सर्वसाधारण निर्णय काढणें सोपें नाहीं. इतर राज्यांतून अशा संस्था फारच कमी आहेत, आणि त्यांपैकींहि बऱ्याच संस्था स्थापन होऊन पुरीं दोन वर्षें देखील झालीं नाहींत, म्हणून त्यांच्या

बाबतींत तर प्राथमिक पाहणी करण्याचा विचार करण्यांतहि अर्थ नाहीं.

### व्यक्तिगत उत्पन्नाची पातळी वाढली पाहिजे

देशाच्या संपत्तींत शेतीसंवर्धनानें भर पडावी अशी आपली सर्वांचीच इच्छा आहे. मात्र त्याचबरोबर हल्लींपेक्षां अधिक मोठा वांटा शेतींत खपणाऱ्यांना मिळावा, शिवाय त्यांना निव्वळ भरणपोषणासाठीं केवळ शेतीवर अवलंबून रहावें लागूं नये, त्याबरोबरच त्यांना ग्रामीण उद्योगधंद्यांच्या स्वरूपांत इतर प्रकारचे रोजगारीचे मार्ग उपलब्ध करून देणें आवश्यक आहे. अशा परिस्थितींत श्री. शंकरराव देव यांनीं ५ वर्षांपूर्वी महाराष्ट्रासाठीं म्हणून जो कार्यक्रम पुरस्कारिला तो केवळ महाराष्ट्रांतच नव्हे, केवळ मुंबई राज्यांतच नव्हे, तर सर्व भारतांत — आणि विशेषत: ज्या भागांत जमीनदारीसारख्या पद्धती नष्ट झाल्या आहेत अशा भागांत एक अग्रगण्य गणला जाईल इतका तो मोलाचा आहे. रशियांत एका जमान्यांत सर्व शेतकऱ्यांना सामुदायिक शेतीला जुंपण्यांत आलें होतें. उलट इस्राईलसारख्या देशांत तरुण मंडळी धार्मिक भावनेनें प्रेरित होऊन शेती व सामाजिक विकासयोजनांचीं कामें करण्यास उद्युक्त झालीं आहेत. हे देश सोडले तरी दुसऱ्या अनेक आणि विशेषेंकरून पूर्व युरोपांतील देशांतून तेथील शेतकऱ्यांना, तेथील राष्ट्राच्या अर्थव्यवस्थेंत जो बदल झाला त्याचा परिणाम म्हणून, कोणत्याना कोणत्या प्रकारच्या तरी संयुक्त शेतीच्या प्रकाराचा अवलंब करणें भाग पडलें आहे व अशा प्रकारें राष्ट्रीय उत्पन्नांत भर घालून आपलें जीवनमान वाढवावें लागलें आहे. गेलीं ५० वर्षे भारताचें व्यक्तिगत उत्पन्न एकाच पातळीवर स्थिर आहे. ग्रामीण भागांत शेती आणि ग्रामोद्योग यांवर जगणारे कोट्यवधी लोक आहेत. त्यांना स्वतःच्या उत्पन्नांत आणि राष्ट्रीय संपत्तींत भर घालण्याची संधि ज्या योगें मिळेल अशा प्रकारें आपल्या ग्रामीण संघटनांत परिवर्तन घडून आल्याखेरीज भारताच्या व्यक्तिगत उत्पन्नाची पातळी उंचावणार नाहीं हें उघड आहे. श्री. शंकरराव देव यांच्या सारख्या संन्यस्तवृत्तीच्या सज्जनाला, विशेषत: ते वानप्रस्थाश्रमाच्या उंबरठ्याजवळ असतांना हा दृष्टिकोन फारच भौतिक स्वरूपाचा वाटण्याचा संभव आहे. पण ते वास्तववादी असल्यामुळें त्यांना तो विचारार्ह वाटेल असा मला विश्वास आहे.

---

## कार्यकर्ते कोठून आणायचे ?

प्रत्येक आंदोलनाचा मुख्य आधार म्हणजे कार्यकर्ते होत. म्हणून प्रश्न हा पडतो कीं सतत काम करणारे कार्यकर्ते कोठून आणायचे ? – तीन प्रकारचे कार्यकर्ते मिळूं शकतील : एक म्हणजे विद्याध्ययनानंतर गृहस्थाश्रमांत प्रवेश करण्यापूर्वी कांहीं काळ समाजसेवा करणारे. दुसरे म्हणजे घर सोडून देऊन वानप्रस्थ बनलेले लोक. तिसरा प्रकार म्हणजे घरांत राहून देखील निर्लिप्तपणें जीवन घालविणारे प्रयत्नशील वानप्रस्थी. – अशा सेवकांमुळें समाजाला स्फूर्ति सारखी मिळत रहाते. ... विषयवासनेच्या जे पाठीमागें लागतात, त्यांच्या मनांत क्रान्ति-अभिलाषा असणें अशक्य आहे. क्रान्तिदेवीला सवत खपत नाहीं. विषयासक्ति देखील अशी आहे कीं तिलाहि एकाग्रता पाहिजे असते. म्हणून ज्यांनीं जीवनदान दिलें आहे त्यांनीं आपण वरील तीन पैकीं कोणत्या प्रकारांत बसतों याचा विचार करावा.

— आचार्य विनोबा

( ३१।१२।५४ )








प्रा. ध. रा. गाडगीळ : अनु. – डॉ. य. कृ. सोवनी

# जमीनविषयक धोरण आणि भूदान-आंदोलन

[ अलाहाबाद येथें ता. २६ ते २८ डिसेंबर १९५४ ला ' भारतीय शेती-अर्थशास्त्र-संस्थे'ची पंधरावी वार्षिक परिषद भरली होती. त्या परिषदेचे अध्यक्ष प्रा. **धनंजयराव गाडगीळ** यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत जमीनधोरणाचें व शेतीविषयक समस्यांचें विस्तृत व साधार विवेचन केलें आहे. या भाषणांत भूदान-आंदोलनाबाबतहि त्यांनीं आपले विचार प्रगट केले आहेत. प्रा. गाडगीळांच्या अध्यक्षीय भाषणांतील भूदानविषयक भागाचा समग्र अनुवाद येथें दिला आहे. – का. सं. ]

गेल्या कांहीं वर्षांत आचार्य विनोबा भावे यांनीं सुरू केलेल्या व प्रत्यक्ष त्यांच्याच नेतृत्वाखालीं चालू असलेल्या भू-दान-आंदोलनाचा या ठिकाणीं थोडा विचार करणें जरूर आहे. या चळवळीची कल्पना इतकी स्वतंत्र, तिचे मार्ग इतके अभिनव व उद्दिष्ट एवढें क्रांतिकारक आहे कीं तिचा अर्थ समजून तिची योग्य भूमिका लक्षांत येण्यासाठीं विशेष श्रम घेणें जरूर आहे. म्हणून चर्चेस सुरुवात करण्यापूर्वी माझ्या कल्पनेप्रमाणें या आंदोलनाचीं मला वाटतात तीं प्रमुख लक्षणें सांराशरूपानें मी येथें देत आहे. मी या विषयासंबंधींचें कांहीं मूळचें लिखाण, तसेंच त्यावरील कांहीं विद्वत्तापूर्ण भाष्यें अगर टीकाटिप्पणी वाचल्या असल्या तरी यासंबंधींचें माझें ज्ञान अपूर्ण असण्याचा संभव आहे याची मला जाणीव आहे. तथापि, मी जो सारांश येथें देत आहे, तो बराचसा यथायोग्य असून या आंदोलनाच्या मूलभूत सिद्धांतांचा चुकीचा अर्थ अगर विपर्यास माझ्याकडून होणार नाहीं अशी अपेक्षा आहे.

## भूदान-आंदोलनाचीं उद्दिष्टें व कार्यक्रम

विद्यमान समाजांतील एकंदर सामाजिक अन्यायाविरुद्ध निर्माण होणाऱ्या तीव्र बंडखोर भावनेंतून तसेंच भारतांतील असहाय व पददलित जनतेसंबंधींच्या प्रगाढ करुणाबुद्धींतून या चळवळीचा उगम झाला आहे असें म्हणतां येईल. भारतांतील खेडोंपाडीं पसरलेल्या, दारिद्र्यांत पिचणाऱ्या बहुसंख्य जनतेला तात्काळ कांहीं मदत मिळावी व त्यांच्या भावी जीवनांत आशेचा एखादा किरण त्यांना दिसावा यासाठीं सामाजिक क्रांतीस चालना देण्याचा एक प्रयत्न या चळवळीच्या द्वारां करण्यांत येत आहे. या चळवळीचे प्रारंभिक प्रमुख सिद्धान्त असे कीं सर्वसाधारणपणें ग्रामीण जनतेची, विशेषतः भूहीन ग्रामीण वर्गांची भारतांत आज अत्यन्त दुरवस्था असून शहरी वर्गांकडून ग्रामीण समाजाची सतत लुबाडणूक होत आहे, राजकीय सत्ता व आर्थिक सामर्थ्य आणि सामाजिक बहुमान ही क्वचितच त्यांच्या वांट्यास येतात, म्हणून ही परिस्थिति बदलून हा तोल सुधारल्याशिवाय देशांत शांति अगर सुबत्ता नांदणें शक्य नाहीं. सुरुवातीस भूहीन मजुरांच्या तांतडीच्या प्रश्नांकडे या चळवळीनें लक्ष पुरविलें असलें तरी संपत्तिदान, जीवनदान या मार्गांनीं तिची जी वाढ होत आहे ती लक्षांत घेतां तिचें पर्यवसान अखेर एकंदर सामाजिक अन्यायाविरुद्धच्या सर्वंकष चळवळींत होत आहे असें दिसून येतें. ग्रामीण समाजांतील प्रत्येक कुटुंबास निर्वाहासाठीं लहानसा का होईना शेतीचा तुकडा देणें हें भूदानाचें मुख्य उद्दिष्ट होय. प्रत्येक कुटुंबास कांहीं उपजीविकेचें साधन मिळून समाजांत आपणांस कांहीं स्थान आहे ही भावना त्यांच्यामध्यें निर्माण व्हावी हा यांतील मुख्य उद्देश आहे. भूदानचळवळीच्या पुरस्कर्त्यांना जी ग्रामीण पुनर्रचना अभिप्रेत आहे तीमध्यें ग्रामीण उद्योगास प्रोत्साहन देऊन खेड्यांतील अर्थव्यवस्था बऱ्याच प्रमाणांत स्वावलंबी व्हावी हेंहि एक उद्दिष्ट आहे. पण ग्रामीण समाजाचें पुनर्वसन करण्याचा एक मार्ग एवढ्याच दृष्टीनें या उद्दिष्टांना महत्त्व आहे कीं त्यांना कांहीं स्वांगभूत वेगळीं मूल्यें आहेत ह्याचा स्पष्ट उलगडा होत नाहीं. शहरी अर्थरचनेला आपला तसा विरोध नाहीं असें विनोबाजी वेळोवेळीं बोलतात










म्हणून हा संशय निर्माण होतो. त्यांच्या मतानें ग्रामीण व शहरी समाजविभागांत योग्य रीतीनें श्रम-विभागणी होणें शक्य आहे, पण ती न्याय्य व्हावी व कोणाचीहि त्यामुळें लुबाडणूक होऊं नये. तसेंच यंत्रांचा वापर करण्यास त्यांचा तत्त्वतः विरोध असल्याचेंहि दिसून येत नाहीं. त्यांचा जो विरोध आहे तो बराचसा यंत्र हें आज एका बाजूनें लुबाडणुकीचें साधन झालें आहे व दुसऱ्या बाजूनें सत्तेच्या केंद्रीकरणाचेंहि तें साधन बनलें आहे, याला आहे.

सध्यांच्या जमीनमालकांनीं स्वखुषीनें आपल्या जमीनीचें दान करण्याबाबत त्यांच्याकडे मागणी करणें हा या भूदान-आंदोलनाचा प्रत्यक्ष कार्यक्रम आहे. देणगी अगर दानधर्म या सामान्य अर्थानें 'दान' शब्द येथें वापरला जात नाहीं हेंहि त्यांनीं स्पष्ट केलें आहे. 'दान' याची व्याख्या 'दानं संविभागः' 'दान म्हणजे योग्य अगर न्याय्य वांटणी' अशी ते करतात आणि वांटणीबाबतचा आजचा अन्याय दूर करण्याच्या दृष्टीनें लोकांनीं खुषीनें दान करावें असें ते म्हणतात. या दानक्रियेमागील विचारसरणी अशी : इतरांचें दैन्य व दुःख याची आपणांस जाणीव झाल्यानें त्यांच्याबद्दल सहानुभूति व दया निर्माण होते आणि या दयार्द्र बुद्धीनें आपण विचार करूं लागलों म्हणजे विद्यमान सामाजिक अन्यायांची आपणांस जाणीव होते आणि मग त्याबाबत आपलीहि कांहीं जबाबदारी आहे अशी आपणास जाणीव होऊन शक्य तेवढ्या प्रमाणांत हा अन्याय दूर करण्यास आपण प्रत्यक्ष कार्यप्रवृत्त होतों. स्वतःच्या जमिनीचा पंचमांश, षष्ठांश अगर असाच कांहीं हिस्सा प्रत्येकाकडून मागण्यांत येतो त्यामागील दानप्रवृत्त करणारी विचारसरणी वरीलप्रमाणें आहे. अशा रीतीनें स्वखुषीनें व जाणीवपूर्वक आपल्या मालकीच्या जमिनीचा कांहीं भाग जमीन नसणाऱ्यासाठीं दान करून जमिनीच्या फेरवांटणीच्या कार्यक्रमास सुरुवात होते.

ही दानांत मिळालेली जमीन भूमिहीनांना वांटून देण्यांत येते. खुषीनें दान मिळविण्याची ही चळवळ इच्छित ध्येयसिद्धीसाठीं पुरेशी पडेलच असें मानलें जात नाहीं. अखेर कदाचित् कायद्याच्या साहाय्यानेंहि तें साध्य करावें लागेल. पण हे कायदे म्हणजे जनतेच्या इच्छेचें अंतिम प्रकटीकरण व जनतेच्या चळवळीची अंतिम परिणति असेंच चळवळीचे नेते मानतात. लोकांची सदसद्विवेकबुद्धि जागृत होऊन जमिनीच्या फेरवांटणीस सर्वसामान्य पाठिंबा मिळावा, त्यांतून एक जनशक्ति निर्माण व्हावी, हा या चळवळीचा अपेक्षित असाच एक परिणाम आहे, निदान तिचें तें एक प्राथमिक उद्दिष्ट आहे असें दिसून येतें. फेरवांटणीच्या पद्धतीबाबतहि विशिष्ट हठवाद किंवा कांटेकोर नियम असल्याचें दिसून येत नाहीं. दानांत मिळालेली गांवांतील एकंदर जमीन त्या गांवांतील लोकांच्या इच्छेप्रमाणेंच वांटली गेली पाहिजे एवढाच त्याचा मथितार्थ. विनोबाजींचा व्यक्तिशः, सहकारी पद्धतीवर विशेष भर आहे असें बोललें जातें. प्रत्येक कुटुंबाकडे थोडीशी भाजीपाला करण्यापुरती जमीन ठेवून गांवांतील बाकीची सर्व जमीन सहकारी पद्धतीनें कसली जात आहे, अशी ग्रामीण अर्थरचना विनोबाजी पसंत करतात. तसेंच जमीन धारण करण्याची कमाल व किमान मर्यादा असणें जरूर आहे असेंहि ते मानतात. तथापि स्वेच्छेवर अधारलेली ही चळवळ जमिनीच्या फेरवांटणीच्या सर्वसामान्य प्रश्नांचा फारसा विचार करूं शकणार नाहीं हें लक्षांत घेऊन प्रत्येक भूमिहीनाला आज जमिनीचा एक लहानसा तुकडा मिळाला तरी ते समाधान मानतात. सामाजिक अन्याय दूर करण्याच्या दृष्टीनें तें एक पुढचें पाऊलच होईल, तसेंच त्यामुळें समाजिक स्थैर्य निर्माण होऊन ग्रामीण समाजाची आर्थिक पुनर्रचना करणेंहि शक्य होईल असें ते मानतात.

भूदान-आंदोलनाचीं उद्दिष्टें व कार्यक्रम यासंबंधानें मला जें अवगत झालें तें मी येथें सारांशानें उद्धृत केलें आहे. आतां त्याचें थोडेंफार समीक्षण करणें जरूर आहे. हें काम कठीण असून अत्यंत नम्रतेनें व थोडें भीतभीतच मी त्यास हात घालीत आहे. आपल्या समाजांतील सर्व अनर्थांचें मूळ असणाऱ्या या राजकीय व आर्थिक सत्तेच्या केंद्रीकरणाच्या मूलभूत प्रश्नास हात घालणारी सर्वांत मोठी शक्ति विनोबाजींच्या रूपानें आज वावरत आहे. एवढेंच नव्हे तर स्वतंत्र भारतांत या प्रश्नास हात घालणारी तीच एकमेव शक्ति आहे. ज्या निधडेपणानें व सर्वंकष रीतीनें त्यांनीं हें कार्य आरंभिलें आहे व त्याबरोबरच आपल्या परंपरागत सामाजिक मूल्यांनाहि ते जो इतका








नवा जिवंत अर्थ देत आहेत त्यामुळें यच्चयावत् भारतीयांना या चळवळीबद्दल उत्स्फूर्त सहानुभूति असणारच. तथापि, आपल्या चिकित्सक बुद्धिवादी परंपरेमुळेंहि आपणावर कांहीं जबाबदारी येत आहे हें आपण विसरतां कामा नये. या चळवळीची एकंदर भूमिका अचूक आहे किंवा कसें, तिचीं उद्दिष्टें कितपत योग्य आहेत, चळवळीचा कार्यक्रमहि आपणांस योग्य मार्गानें नेतो कीं नाहीं, तसेंच इष्ट ध्येयापासून विचलित करणारी कोणतीहि प्रतिक्रिया या चळवळीमुळें होत नाहीं ना, याचें आपण चिकित्सक बुद्धीनें समीक्षण करणें जरूर आहे.

## जमिनीची भूक

ज्या भूमिकेवरून ही चळवळ सुरू झाली आहे तिचें परीक्षण करतां ती पूर्णपणें साधार आहे हें दाखविणें शक्य आहे. ज्या वस्तुस्थितीच्या जाणिवेंतून या चळवळीचा उगम झाला ती वस्तुस्थिति आंकडेवार पुराव्यानेंहि सिद्ध होण्यासारखी आहे. उदाहरणार्थ, ग्रामीण पत-पाहणी (Rural Credit Survey)-च्या अहवालांतील माहिती येथें दोन महत्त्वाच्या बाबतींत पुराव्यादाखल उद्धृत करणें शक्य आहे. जमिनीची भूक व त्याचबरोबर आढळून येणारे अतिशय लहान आकाराचे शेतीचे तुकडे ही वस्तुस्थिति त्या पाहणी-वरून सिद्ध होते. ज्यांना मध्यम व लहान शेतकरी म्हणून संबोधिलें जातें त्यांच्याकडील अत्यंत लहान आकारमानाच्या शेतीचा या अहवालांत वरचेवर उल्लेख करण्यांत आला आहे. तथापि या गोष्टी आतां सर्वांच्या माहितीच्या झाल्या आहेत.

या पाहणींत अप्रत्यक्ष रीत्या उपलब्ध झालेला महत्त्वाचा पुरावा ही जमिनीची भूक केवढी आहे हें चांगल्या रीतीनें दर्शवितो. तुमची कर्जाची गरज केवढी आहे व कर्ज मिळाल्यास तें तुम्ही कोणत्या कारणीं लावाल असे प्रश्न या पाहणींत शेतकऱ्यांना विचारण्यांत आले होते. या प्रश्नांना त्यांनीं जीं उत्तरें दिलीं आहेत त्यावरून हें चांगलेंच स्पष्ट होतें. खालच्या थरांतील म्हणजे गांवांतील शेतकऱ्यांची त्यांच्याकडे असलेल्या शेतीच्या आकारमानाप्रमाणें क्रमवारी लावली असतां खालच्या अर्ध्या शेतकऱ्यांची कर्जाची बरीचशी गरज जमीनखरेदीसाठीं असल्याचें आढळून आलें. सर्वसाधारण शेतकरीकुटुंबाची जमीन-खरेदीसाठीं लागणाऱ्या कर्जाची सरासरी गरज त्यांनीं दिलेल्या उत्तरावरून प्रत्येकीं ३०० रु. हून बरीच अधिक असल्याचें दिसून येतें. तसेंच खालच्या अर्ध्या थरांतील शेतकऱ्यांची, त्यांच्या कर्जाच्या एकूण गरजे-पैकीं ४० टक्क्यांहून अधिक गरज जमीनखरेदीसाठीं होती हेंहि त्यांनीं दिलेल्या उत्तरावरून आढळून येतें. ज्या वर्षी ही पतपाहणी केली गेली त्या वर्षांत माहिती देणाऱ्या या शेतकरी कुटुंबांनीं प्रत्यक्ष जमीनखरेदीसाठीं किती रक्कम खर्च केली त्याचे आंकडे पाहतां ह्या माहितीचें विशेष महत्त्व लक्षांत येईल. खालच्या थरांतील शेतकऱ्यांचा हा सरासरी प्रत्येकीं खर्च १२ रु. होता तर त्यांची जमीनखरेदीसाठीं लागणाऱ्या कर्जाची सरासरी गरज प्रत्येकीं ३३३ रु. होती. जमीन-खरेदी एवढ्या अल्पप्रमाणांत होण्याचें कारण कर्जाचा पुरवठा नाहीं हें जेवढें आहे तेवढेंच विकत घेण्यास जमीनहि फारशी उपलब्ध नाहीं हेंहि आहे. म्हणून कर्जपुरवठा होऊं शकला असता तर जमिनीची अधिक प्रमाणावर खरेदी झाली असती असें म्हणतां येणार नाहीं. प्रत्येकास आणखी जमीन खरेदी करावयाची इच्छा आहे पण खरेदीसाठीं नवी जमीन उपलब्धच नाहीं. अशी परिस्थिति असल्यास कर्जपुरवठ्याची कितीहि सोय केली तरी प्रत्येकास आणखी जमीन खरेदी करतांच येणार नाहीं. पण त्याबरोबरच या शेतकऱ्यांनीं दिलेल्या उत्तरावरून त्यांना याची निकड केवढी आहे हें विशेषतः खालच्या थरांतील शेतकरी सर्वांत अधिक महत्त्व जादा जमीनखरेदीस देतो ह्यावरून स्पष्टपणें दिसून येतें. अशा रीतीनें ग्रामीण पतपाहणी – अहवालांतील माहितीवरून ही जमिनीची भूक पुराव्यानिशीं सिद्ध होते.

## भूमिहीन मजुरांची भयंकर हलाखी

ग्रामीण पतपाहणीमध्यें उपलब्ध झालेल्या बिन-शेतकरी वर्गाच्या आर्थिक स्थितीबाबतची अन्य माहितीहि या आंदोलनाच्या भूमिकेस पुष्टि देणारीच आहे. या पाहणीमध्यें बिनशेतकरी वर्गांत, शेती न कसणाऱ्या सर्व ग्रामीण वर्गांचा समावेश होतो. जे स्वतः शेती करतात – मग कितीहि लहान जमिनीचे तुकडे त्यांच्याजवळ असोत – त्यांचा समावेश शेतकरी वर्गांत होतो. अशा रीतीनें या पाहणींतील बिनशेतकरी वर्गांत ज्याचेजवळ स्वतःच्या कसवटीखालीं जमीन नव्हती










अशा ग्रामीण भागांतील व्यापारी, सावकार, कारागीर व मजूर लोकांचा अंतर्भाव होतो. हा वर्ग जरी संमिश्र असला तरी त्यामध्यें बहुसंख्या कारागीर व मजूर वर्गांचीच प्रामुख्यानें होती. कर्ज काढणें व फेडणें, कुटुंबखर्च, भांडवली खर्च, ठेवी अगर शेअर यांमध्यें गुंतविलेला पैसा, भांडवली उद्योगांतील नक्त नफा यासंबंधीं पहाणींत दिलेल्या माहितीवरून किंवा आर्थिक परिस्थितीचें निदर्शन करणाऱ्या दुसऱ्या कोणत्याहि त्यांच्या व्यवहारांवरून या वर्गाची स्थिति शेवटच्या ३० टक्के शेतकऱ्यांपेक्षां हलाखीची होती असेंच आढळून येतें. म्हणजे गांवांतील सर्व शेतकऱ्यांचा त्यांच्याकडे वहितीस असलेल्या जमिनीच्या क्षेत्रानुसार अनुक्रम लावून सारख्या संख्येच्या दहा भागांत त्यांची विभागणी केली असतां, शेवटच्या तीन विभागांतील शेतकऱ्यांपेक्षां म्हणजेच गांवांतील खालच्या तीस टक्के शेतकऱ्यांपेक्षां त्यांची स्थिति अत्यंत हलाखीची होती असें दिसून येतें. थोड्याफार संमिश्र वर्गासंबंधींची ही सरासरी आंकडेवारी आहे. कारण या बिनशेतकरी वर्गांत व्यापारी, सावकार इत्यादि वर्गांचाहि समावेश केला आहे. यावरून भूमिहीन मजूराची व खालच्या प्रतीच्या ग्रामीण कारागीरवर्गाची आर्थिक स्थिति या सरासरीहूनहि खालावलेली आहे हेंच सिद्ध होतें. विनोबाजी या वर्गांच्या स्थितीकडेच प्रामुख्यानें आपलें लक्ष वेधतात. कारण अत्यंत लहान शेतकऱ्यांच्या स्थितीपेक्षांहि या वर्गांची आर्थिक स्थिति भयंकर खालावलेली आहे. अशा परिस्थितींत जमिनीचा अगदीं लहान तुकडा जरी मिळाला तरी आपली स्थिति सुधारेल अशी या भूमिहीन वर्गाची साहजिक भावना होते व निर्वाहाचें हें खात्रीचें साधन आपणांस मिळेपर्यंत आपली स्थिति सुधारणें शक्य नाहीं असेंहि त्यांना वाटतें.

## मागासलेलें अर्थोत्पादनतंत्र

म्हणून आंकडेवार माहिती व सर्वसामान्य अनुभव हीं दोन्हीं लक्षांत घेतां भूदान-आंदोलनाच्या आधारभूत भूमिकेस पाठिंबाच मिळतो. भूमिका योग्य आहे असें एकदां ठरल्यानंतर मग तिचे मार्ग व तिचीं उद्दिष्टें कितपत योग्य आहेत याचें परीक्षण करणें जरूर आहे. याबाबतींतहि असें म्हणतां येईल कीं समाज स्थितिप्रिय राहून त्याच्या वाढत्या लोकसंख्येबरोबर अर्थोत्पादनतंत्रामध्यें कोणताहि प्रगतिकारक यांत्रिक बदल होणार नसेल तर भूदानचळवळीच्या उद्दिष्टाप्रमाणें जमिनीची फेरवांटणी करावीच लागेल. साध्या कृषीवलसमाजांत जमिनीची ही फेरवांटणी वारंवार होत आलीच आहे. समाजास उपलब्ध असणारी एकंदर साधनसंपत्ति व कुटुंबसमूहांच्या अगर व्यक्तिगत कुटुंबांच्या गरजानुसार ही वांटणी सतत होत आली आहे. आणखी पुढें जाऊन असेंहि म्हणतां येईल कीं लोकसंख्येच्या बेसुमार वाढीमुळें ज्या समाजाच्या एकंदर अर्थोत्पादनतंत्राचा विकास मागें पडला आहे तेथेंहि हेंच विधान लागूं होतें. स्थिर उत्पादनतंत्र व वाढती लोकसंख्या असणाऱ्या समाजांत विशेषतः शेतकरी-विभागांत जवळजवळ हीच परिस्थिति आढळते. गेल्या शतकांतील भारतांतील परिस्थिति जवळजवळ अशीच होती. अधिकृत पुरावा उपलब्ध होतो त्यावेळेपासून म्हणजे १८८० पासून असा एक ओघ दृष्टोत्पत्तीस येतो कीं निर्वाहासाठीं शेतीव्यवसायावर अधिकाधिक लोकसंख्या अवलंबून राहूं लागली व त्या मानानें लागवडीखालील शेतीचें क्षेत्र मात्र वाढलें नाहीं व उत्पादनपद्धतींत तंत्रविषयक सुधारणाहि अगदीं मंद गतीनें होत राहिली. सुरवातीस जमीनीवर अवलंबून असणाऱ्यांची संख्या मोठी होती एवढेंच नव्हे तर एकूण लोकसंख्येपैकीं बरेंच मोठें प्रमाण शेतीवर अवलंबून असणाऱ्यांचें होतें. अलीकडील कांहीं वर्षांत हा ओघ थांबला असून शहरी लोकसंख्येची वाढ ग्रामीण लोकसंख्येपेक्षां अधिक जलदीनें होऊं लागली आहे. व्यवसायपरत्वें लोकसंख्येची तुलनात्मक माहिती येथें देणें शक्य नाहीं, कारण शिरगणतीच्या माहितींत याबाबत अनेक चुका राहून गेल्या आहेत. तथापि अलीकडील कांहीं वर्षांत शेतीवर अवलंबून असणाऱ्या लोकसंख्येच्या प्रमाणांत किंचित् घट झाली असली व शहरी लोकसंख्येची अधिक जलदीनें वाढ होण्याकडे स्पष्टपणें कल दिसून येत असला, तरी शेतीवर अवलंबून असणारी एकूण लोकसंख्या हळूहळूं वाढतच गेली आहे व पुढेंहि ती वाढत राहील असें दिसतें. त्याचा परिणाम भारतांत अलीकडील कांहीं वर्षांत जमिनीच्या सतत वांटण्या होऊन जमीनधारणेचें सरासरी आकारमान हळूंहळूं कमी कमी होण्यांत झाला व पूर्णपणें भूमिहीन वर्ग अधिकाधिक प्रमाणांत वाढूं लागला. भूदान-चळवळीनें या वस्तुस्थितीचीच फक्त

दखल घेतली असून आहे ही स्थितीच राहणार असेल तर भूमिहीनाला प्राथमिक निर्वाहाचें साधन जी जमीन व अवजारें तीं अजीबात मिळाणार नाहींत अशी वस्तुस्थिति राहतां कामा नये असा या चळवळीचा आग्रह आहे व प्रामुख्यानें हा प्रश्न सामाजिक न्यायस्थापनेचा आहे, या दृष्टीनें समाजानें या चळवळीकडे पाहणें जरूर आहे असें ते म्हणतात. भारतांतील आहे ही परिस्थिति लक्षांत घेतां, तसेंच जलद आर्थिक विकासाचे कार्यक्रम सुरूं करण्यास अगर जमिनीच्या प्रश्नाची तर्कशुद्ध सोडवणूक करण्याचे कोणतेहि अन्य उपाय योजण्यास आपलें सरकार उघड उघड असमर्थ आहे हें दिसत असतांना भूदानाचा दृष्टिकोण अगर मार्ग अप्रस्तुत, गैरलागू किंवा चुकीच्या दिशेकडे जाणार आहे असें म्हणून त्याची वासलात कदापि लावतां येणार नाहीं.

ही चळवळ मोठ्या क्षेत्रावर फैलावली तर त्याचा परिणाम मोठ्या शेतांचें सरासरी आकारमान थोडेसें कमी होण्यांत होईल हें उघड आहे. तसेंच, सर्वसाधारण आकारमानाच्या किंवा त्याहून कमी आकारमान असणाऱ्या शेतीचें क्षेत्रहि थोडेंसें घटेल व अतिशय लहान आकाराचे नवे शेतीघटक मोठ्या प्रमाणावर निर्माण होतील. प्रथमदर्शनीं हे सर्व परिणाम अनिष्ट, असमाधानकारक आहेत असें म्हणतां येईल. तथापि खरा प्रश्न हा आहे कीं आज जी परिस्थिति आहे त्यापेक्षां किंवा विद्यमान ओघ लक्षांत घेतां पुढें जी परिस्थिति निर्माण होईल त्यापेक्षां ते अधिक असमाधानकारक आहेत किंवा कसे ? अतिशय लहान आकाराचे नवे शेतीघटक मोठ्या प्रमाणावर निर्माण करणें ही गोष्ट अनिष्ट हें निःसंशय. परंतु याला दुसरा पर्यायच नसेल म्हणजे भूमिहीनांना आजच्याप्रमाणेंच दुसरा कोणताहि धंदा किंवा उदरनिर्वाहाचें पुरेसें साधन नसतांना व जीवनांत कसलीहि आशा अगर उत्साह नाहीं अशा परिस्थितींत आजच्याप्रमाणेंच जीवन कंठण्याखेरीज दुसरा पर्याय नसेल तर शेतीचे नवे लहान तुकडे निर्माण होऊं देणें ही वाईट गोष्ट आहे असें म्हणतां येईल का ? उलट, सध्यांच्या त्यांच्या स्थितींत यामुळें थोडीफार का होईना सुधारणा होत आहे असें म्हणणें योग्य ठरेल ? या दृष्टीनें पाहतां शेतीच्या सरासरी आकारमानांत थोडी घट होणें किंवा मोठ्या शेतीचें आकारमानहि थोडेसें कमी होणें ही गोष्ट वाईट आहे असें म्हणतां येणार नाहीं. मोठ्या जमीनमालकांची जमीन लहान शेतकऱ्यांकडे किंवा भूमिहीनांकडे जावी असेंच या चळवळीस विशेषेंकरून अभिप्रेत आहे, व सरासरी आकारमानाच्या किंवा त्याहून खालच्या प्रतीच्या शेतकऱ्यांकडून जें दान घेतलें जातें तें केवळ लाक्षणिक असून जनशक्ति निर्माण होण्यास मदत व्हावी हाच त्यांतील प्रमुख उद्देश आहे हें शेवटीं लक्षांत घेतलें म्हणजे या एकंदर चळवळीची वास्तव भूमिका कळून येते. उत्पादनपद्धतींतील यांत्रिक बदल किंवा आर्थिक विकास यासंबंधानें कांहीं गोष्टी गृहीत धरूनच वरील चर्चा केली आहे. व त्याकडे आतां लक्ष पुरविणें जरूर आहे.

### वर्तमान परिस्थितींतील कांहीं गृहीतकृत्यें

याबाबत पहिलें गृहीत कृत्य असें कीं जमीनीचा अगदीं लहान तुकडा जरी भूमिहीनास मिळाला तरी त्यामुळें त्याच्या आर्थिक दर्जांत अगर दृष्टिकोणांत मूलगामी बदल घडून येतो; तसेंच लहान शेतकऱ्याच्या शेतीच्या क्षेत्रांत थोडी का होईना भर पडली तरीहि त्याचा प्रत्यक्ष बराच मोठा मानसिक परिणाम होत असतो. शेतमजुरीचें काम मिळण्याची जेथें अत्यंत अशाश्वती आहे, मिळणारी मजूरीहि जेथें अत्यंत कमी आहे व ग्रामीण कारागीरवर्गांचे धंदेहि जेथें सतत खालावत चालले आहेत ह्या परिस्थितींत स्वतःच्या चरितार्थाचें साधन म्हणून एक लहान तुकडा जरी त्यास मिळाला व त्यावर थोडें कां होईना तो धान्य निर्माण करूं लागला तरी त्यामुळें त्याच्या आर्थिक, सामाजिक व मानसिक स्थितींत परिणामकारक बदल घडून येणें शक्य आहे. तसेंच मोठ्या प्रमाणांवर जमिनीची वांटणी होऊं लागली म्हणजे आज वर्गावर्गांतील विनिमयाचा जो तोल ढांसळला आहे तोहि सुधारेल. या चळवळीमुळें आपणांस शेतीसाठीं पुरेसे मजूर मिळणार नाहींत अशी जी भीति मोठ्या जमीनमालकांना वाटत आहे व त्यामुळें भूदानचळवळीस त्यांचा विरोध असल्याचें जें बोललें जातें त्यावरून ही शक्यता दृष्टोत्पत्तीस येते.

दुसरें गृहीतकृत्य म्हणजे उत्पादनाचें साधन म्हणून देशांतील सर्व शेतीक्षेत्राची जवळजवळ संपूर्ण वांटणी करणें शक्य आहे. म्हणजे दुसऱ्या अर्थानें शेती-

उत्पादनाबाबत आकारमानाशीं संबद्ध असणारे जे आर्थिक फायद्याचे प्रश्न आहेत त्यांकडे दुर्लक्ष केलें तरी चालेल. हें गृहीतकृत्य फार मोठें हें खरें, तथापि अगदीं साधी अर्थरचना व यंत्रविरहित साधें उत्पादन-तंत्र हीच या चळवळीच्या पुरस्कर्त्यांची विचारसरणी असल्यास हें गृहीतकृत्य ओघानेंच येतें. आणि आज आपल्या देशांतील शेतकऱ्यांच्या बऱ्याच्या मोठ्या वर्गाचे बाबतींतहि गृहीत धरलेलें साधें उत्पादनतंत्र व साधी अर्थरचना यापेक्षां वेगळी परिस्थिति असल्याचें आढळून येत नाहीं. काढलीं जाणारीं बरींच पिकें, मशागतीची पद्धत, तेवढ्याच क्षेत्रांत अधिक पीक काढण्यावर दिला जाणारा भर इत्यादि सर्व गोष्टी प्रत्यक्ष पाहतां त्या समानतेनें खालच्या दर्जाच्या असून मोठी शेती व लहान शेतीचा तुकडा यांच्या दर एकरीं उत्पादनांत फारसा फरक असल्याचें दिसून येत नाहीं. या परिस्थितींत निरर्थकपणें उधळली जाणारी साधन-संपत्ति म्हणजे मानवी श्रम ही होय. परंतु आपण अशाच परिस्थितीचा विचार करीत आहोंत कीं जेथें श्रमिकाला उपजीविकेचें अन्य साधनच उरलेलें नाहीं. शेवटीं, शेतीव्यवसायाच्या प्रश्नांची उपेक्षा करणारें सरकारचें आजचें धोरण व केवळ शेतीविस्तार अगर प्रकल्पयोजनावर दिला जाणारा भर हीं लक्षांत घेतां मोठ्या आकारमानाच्या शेतीच्या आर्थिक फायद्याकडे त्यांनीं पूर्णपणें दुर्लक्ष केलें आहे असेंच म्हणावें लागेल. प्रचाराचे जोडीस कर्जपुरवठ्याची थोडी पुनर्घटना केली म्हणजे शेतीक्षेत्राच्या विद्यमान विभागणींतहि अपेक्षित साध्य गांठतां येईल अशी कल्पना असेल तर मग आणखी थोड्या अधिक समप्रमाणांत ही विभागणी झाली तरी देखील तें साध्य गांठणें कठीण होण्याचें कांहींच कारण नाहीं.

हीं गृहीतकृत्यें एकदां मान्य केल्यानंतर व मीं वर विवेचन केल्याप्रमाणें तीं टिकणारीं आहेत हें पाहिल्या-नंतर, तसेंच सरकारच्या चालू धोरणांतहि तीं अनुस्यूत असल्याचें दिसून आल्यानंतर, आर्थिक उत्पादनाच्या प्रश्नापेक्षां सामाजिक न्यायाच्या विचारास अग्रहक्क दिला जाणें अवश्यच ठरतें. या परिस्थितींत भूदानचळवळ पूर्णपणें योग्य आहे एवढेंच नव्हे तर सरकारची बेफिकिरी व दुर्बलता लक्षांत घेतां, अपेक्षित सामाजिक परिवर्तन घडवून आणण्याचें ही चळवळ हेंच एकमेव साधन उरतें. याचा अर्थ असा नव्हे कीं जलद आर्थिक विकासाच्या योजना कार्यवाहींत आल्या तरीहि व त्यांच्याशीं जुळणारें शेतीधोरण आंखलें तरीहि भूदान चळवळीचीं तात्कालिक उद्दिष्टें व तिचा कार्यक्रम यांचा स्वीकार करणें जरूर आहे. वस्तुतः असें दाखवितां येईल कीं, या चळवळीचीं अशीं कांहीं अंगें आहेत कीं ज्यांमुळें विकासयोजनांच्या कार्यक्रमांत अडथळा निर्माण होण्याचा संभव आहे तसेंच या चळवळीच्या अशा कांहीं प्रतिक्रिया आहेत कीं त्यांमुळें भावी प्रगतीच्या मार्गांत गंभीर अडचणी निर्माण होण्याचाहि संभव आहे. या विषयाची चर्चा पुरी करण्यापूर्वी ह्या गोष्टीकडे थोडें लक्ष पुरविणें जरूर आहे.

जलद आर्थिक विकासाच्या योजनेंत, तसेंच त्यास जुळेल अशा शेतीधोरणांत उत्पादनाचें आधुनिक प्रगत तंत्र व थोडीफार गुंतागुंतीची अर्थरचना ह्या गोष्टी गृहीत आहेत. म्हणून ह्या विकासयोजनांत व शेती-धोरणांत मोठ्या आकारमानांतील आर्थिक फायद्यांकड दुर्लक्ष करणें शक्य नाहीं. मग ओघानेंच येतें कीं ज्या चळवळीमुळें देशांतील लहान आकारमानाच्या शेतीची तुकड्यांची संख्या वाढते तिचा परिणाम विकासयोज-नांच्या विरुद्ध दिशेनेंच होणार. तसेंच जमिनीच्या एकं-दर क्षेत्राची विचारपूर्वक आंखणी करून कोणत्या पिका-साठीं तिचा वापर करावा यासंबंधींच्या प्रश्नाकडे भूदान-चळवळ कांहींच लक्ष देत नाहीं. या प्रश्नाशीं तिला कांहींच कर्तव्य दिसत नाहीं. परंतु विकासयोजनेचे हे दोन्ही प्रमुख भाग असून भूदानचळवळीनें त्यांचें महत्त्व कमी केल्यामुळें विकासमार्गांत अडथळा निर्माण होण्याचा संभव आहे. या चळवळीचे पुरस्कर्ते यावर असें म्हणतील कीं सद्यःस्थितींत आमच्या कार्यक्रमाचें जें क्रमप्राप्त स्वरूप आहे तें बदललेल्या परिस्थितींतहि तसेंच राहण्याचें कांहीं कारण नाहीं व त्यामुळें कांहीं अडथळा होण्याचेंहि कारण नाहीं. या चळवळीचा परि-णाम म्हणून वाढत्या प्रमाणांत व विविध प्रकारची रोज-गारी देणाऱ्या तसेंच ग्रामीण समाजांत जास्त सुरक्षितता व अधिक समानता आणणाऱ्या विकासयोजना व धोरण हातीं घेण्यास सरकार उद्युक्त झालें तरीहि तिच्या अंतिम साध्याच्या दृष्टीनें ती पुष्कळ यशस्वी झाली असें म्हणतां येईल व तिला आपला आजचा कार्यक्रम तसाच पुढें चालू ठेवण्याचीहि गरज राहणार नाहीं.








## मालकीहक्काबद्दलची भावना प्रबल होण्याचा संभव

या चळवळीच्या एका संभाव्य परिणामाबद्दल मला विशेष भीति वाटते आणि त्यास वरील उत्तर पुरेसें ठरणार नाहीं. हा संभाव्य परिणाम म्हणजे जमिनीसंबंधाच्या मालकी हक्काची भावना अधिक तीव्र होणें हा होय. खाजगी मालमत्तेचे हक्क विशेषतः उत्पादनसाधनांची खाजगी मालकी नष्ट करणें जरूर आहे या विचारसरणीवर भूदान-चळवळ आधारलेली आहे ही गोष्ट खरी. जमिनीबाबत या चळवळीची घोषणा ' सब भूमि गोपालकी ' अशीच आहे. परंतु या चळवळीचा जो प्रत्यक्ष कार्यक्रम आहे त्याचा परिणाम मात्र लोकांच्या खूपच मोठ्या संख्येला जमीनमालकीचे हक्क बहाल करण्यांत होतो. शिवाय दानाची मागणी करतांनाहि जमिनीच्या मालकी हक्कांची अधिक समतेनें वांटणी करण्याची भाषा उपयोजिली जाते. जे दान देतात ते आपल्या दानद्वारा उत्पादनसाधनांच्या सामाजिक मालकीच्या तत्त्वास पाठिंबा देतात असेंहि नाहीं. उलट, दान देऊन आपलें एक सामाजिक कर्तव्य पार पाडल्यानंतर न्याय्य मालकी हक्काबाबतची त्यांची भावना अधिकच प्रबल होते. व्यावहारिक अडचणींमुळ भूदान-चळवळीच्या पुढाऱ्यांना सहकारी किंवा सामुदायिक मालकीच्या तत्त्वावर जोर देणें शक्य होत नाहीं. या चळवळीचें मूलभूत तत्त्वज्ञान पाहतां त्यांनीं यावर जोर देणें क्रमप्राप्तच असलें तरी ज्या ठिकाणीं गांवांतील सर्व जमीन दान मिळाली आहे त्याखेरीज अन्य कोठेंहि त्यांना यावर जोर देणें शक्य झालेलें नाहीं. हें एकदां मान्य केल्यानंतर भूदान-चळवळीचा मुख्य परिणाम अतिशय लहान जमीन धारण करणाऱ्या नव्या शेतकऱ्यांचा मोठा वर्ग निर्माण करण्यांत होतो ही वस्तुस्थिति मान्य करावीच लागेल. त्याबरोबरच जमिनीमुळें जी सामाजिक प्रतिष्ठा व आर्थिक मूल्य त्यांना येते त्यामुळें जमिनीसंबंधींची मालकी हक्काची भावनाहि सामान्यतः तीव्र होते. मध्यस्थाचें उच्चाटन व कुळांना जमिनीची मालकी मिळण्याची कायदेशीर तरतूद या उपक्रमांसह एकंदर परिस्थिति विचारांत घेतां असें दिसून येतें कीं देशाच्या मोठ्या क्षेत्रांत जमीनमालकी मोठ्या प्रमाणावर विखुरलेली नव्हती व बऱ्याच मोठ्या शेतकरीवर्गाकडे ते वहीत असलेल्या जमिनीचे मालकी हक्क नव्हते अशी जी परिस्थिति होती तींत झपाट्यानें बदल होत असून वहितींतील बहुतेक सर्व क्षेत्रांची मालकी प्रचंड संख्येच्या लहान लहान शेतकऱ्यांकडे जात आहे. त्यांनीं आपले नवार्जित मालकी हक्क जिवापाड जपण्याचा प्रयत्न करणें शक्य आहे. हें माझें विवेचन मध्यस्थाचें उच्चाटन इत्यादींसारख्या उपक्रमाविरुद्ध नाहीं. त्या आवश्यक अशाच प्राथमिक सुधारणा आहेत असें माझें मत आहे. परंतु त्यामुळें लोकांच्या ज्या भावना होतात व त्याचे जे अनिष्ट परिणाम होतात ते टाळण्याचा प्रयत्न होणें जरूर आहे, या उद्देशानेंच मी हें विवेचन केलें आहे.

## कम्युनिस्टांचा अनुभव

विद्यमान परिस्थितींतून जीं संकटें अगर धोके निर्माण होण्याचा संभव आहे त्याकडे डोळेझांक करणें शहाणपणाचें ठरणार नाहीं. कम्युनिस्टांनीं तेलंगणांत जो धुमाकूळ घातला त्यामुळें ही भूदानचळवळ जन्मास आली. म्हणून यासंबंधांत कम्युनिस्ट इतिहासप्रणालीकडे थोडी नजरफेक करणें येथें उपयुक्त होईल. हा इतिहास सतत हेंच दर्शवितो कीं जमिनीची फेरवांटणी करण्याची चळवळ प्रथमतः जनतेचा पाठिंबा मिळविण्यासाठीं व जनतेंत उत्साह निर्माण करण्यासाठीं आरंभिली जाते, नंतर लगेच उत्पादनसाधनांचें सामाजिकीकरण, सामुदायिकीकरण यांच्या आणि अशाच इतर कार्यक्रमांच्या दिशेनें हालचाल सुरू होते आणि हें सर्व करतांना नुकतीच ज्यांना जमीन देण्यांत आली त्यांच्याकडून ती हिसकावून घेण्याचा प्रसंग येतो. या नंतरच्या उपक्रमामुळें नेहमींच भयंकर अरिष्टें ओढवलीं आहेत. सामुदायिकीकरणाच्या दिशेनें जी पहिली मोठी चळवळ रशियांत सुरू झाली तो रशियन क्रांतीच्या इतिहासांतील अतिशय आणीबाणीचा काळ होता, असें मानलें जातें. तसेंच युद्धोत्तर कालांत दक्षिण व पूर्व यूरोपांतील कम्युनिस्ट राष्ट्रांनाहि सामुदायिकीकरणाचा प्रश्नच सर्वांत अत्यंत कठीण आहे असें आढळून आलें. कम्युनिस्टांचें हें धोरण कितीसें योग्य होतें अगर त्यांची त्याबाबत कोणती विचारप्रणाली होती यामध्यें येथें आपणांस शिरण्याची कांहींच जरूरी नाहीं. मला एवढेंच सुचवावयाचें आहे कीं कम्युनिस्टांचा हा अनुभव ही एक गंभीर पूर्वसूचना असून तिची आपण दखल घेणें जरूर आहे. शीघ्र-










विकासी अर्थरचना गृहीत धरून आपण विचार करीत असलों तर जमीनमालकीचें आणखी विखरण करणें अवश्य किंवा योग्य आहे, अशी कोणतीहि परिस्थिति आज भारतामध्यें नाहीं. जमिनीची वांटणी अगर तिचा वापर करण्याच्या योजना आंखण्याबाबत सरकार-चा अधिकार आज सर्वत्र मानला जात आहे. माझ्या मतें ही परिस्थिति बिघडवून जमीनमशागतीच्या घटकांचा नवा नमुना निर्माण करण्याच्या सरकारी प्रयत्नास विरोध होईल अशी परिस्थिति निर्माण करणें बिलकूल शहाणपणाचें ठरणार नाहीं. हें जर घडलें तर अशा विरोधास तोंड देण्याचें आमच्या सरकारचें अत्यल्प सामर्थ्य लक्षांत घेतां या प्रश्नाची सोडवणूक जवळजवळ अशक्य होईल असेंच म्हणावें लागेल. म्हणून या बाजूकडे विशेष लक्ष देणें ही भूदान-चळवळीच्या पुढाऱ्यांची खास जबाबदारी आहे असें मला वाटतें. आणि सामाजिक व सामुदायिक दृष्टिकोणा-वरील त्यांचा उद्घोषित जोर लक्षांत घेतला तर त्यांचें हें कर्तव्यच ठरतें. कारण ते जें करतात किंवा बोलतात त्याचा लोकांच्या भावनांवर परिणाम होतो आणि त्यांनीं प्रत्यक्ष जें साध्य केलें त्यापेक्षांहि तो फार मोठा असण्याचा संभव आहे.

## आर्थिक विकासयोजनेच्या दृष्टीनें भूदान-दृष्टिकोन हा अयुक्त

आर्थिक विकासयोजनांच्या दृष्टीनें आपण विचार करीत असलों तर त्या परिस्थितींत भूदानाचा दृष्टि-कोन अयुक्त आहे असें मी कां मानतों हें पुनः सांगतों. उत्पादनसाधनांची समान वांटणी करून उत्पन्नाची समान वांटणी साधण्याचा भूदानाचा प्रयत्न आहे. कुटुंब हाच उत्पादक घटक असलेली साधी अर्थरचना गृहीत धरून ते या प्रश्नाचा विचार करतात. अधिक प्रगत अर्थरचना असेल तर त्यांची ही विचारसरणी कशी गैरलागू ठरते हें संपत्तिदानाची त्यांची कल्पना पाहतां स्पष्ट होतें. संपत्तिदान हें शहरी अर्थसंघटनेच्या क्षेत्रांतील भूदानाचें प्रतिरूप असें ते मानतात. परंतु शहरी अर्थसंघटनेंतील सत्तेच्या केंद्रीकरणाचा प्रश्न मोठ्या मालकाकडून लहान मालकांना अशी कोणतीहि साधी देवाण करून सुटण्यासारखा नाहीं. शहरी अर्थरचनेंत, सर्वांत अधिक फायदा ज्यांना मिळतो, ज्यांचें आर्थिक सामर्थ्यहि मोठें असतें आणि ज्यांचें राजकीय क्षेत्रांतहि खूप वजन असतें अशा संघटनांच्या ताब्यांत सर्व महत्त्वाच्या जागा असतात व जमिनी-प्रमाणें त्यांची साधी वांटणी करणें शक्य नसतें. या सर्व संघटना अत्यंत गुंतागुंतीचे असे एकात्म घटक असतात. उदाहरणार्थ, वाहतूक करणाऱ्या संघटना, विद्युदुत्पादन, मोठ्या प्रमाणावरील देशांतर्गत व आंतरराष्ट्रीय व्यापार, कर्ज व भांडवलपुरवठा करणाऱ्या संस्था, औद्योगिक क्षेत्रांतील सर्व मोठे यंत्रोद्योग, अशा ह्या संघटना होत. त्यांचा कोणताहि एखादा तुकडा वेगळा काढून दुसऱ्याला देणें शक्य नसतें. खाजगी मालकांच्या हातीं होणारें हें संपत्तीचें व सत्तेचें जें हें केंद्रीकरण त्याचें निवारण करण्याचा प्रश्न ह्या बाबतींत एकाच मार्गानें सोडवितां येतो. तो मार्ग म्हणजे या सर्व एकात्म घटकांची मालकी समाजहिततत्पर अशा नव्या किंवा जुन्या संस्थांकडे देणें हा होय. या परि-स्थितींत संपत्तिदान केल्यानें केंद्रित झालेल्या उत्पादन-साधनांची मालकी अगर त्यावरील ताबा वांटला गेला अगर त्यांचें समाजीकरण झालें असा कोण-ताहि परिणाम घडून येत नाहीं. चालू मिळकतीचा कांहीं भाग देणें एवढा एकच परिणाम घडून येतो आणि अशा रीतीनें अत्यंत हीन स्वरूपाचा असा हा दानधर्म होतो. विकासयोजनेंतील शेती-उत्पादनासाठीं आधुनिक प्रगत तंत्रांचा अधिकाधिक उपयोग करून घ्यावाच लागेल. तसेंच अधिक गुंतागुंतीच्या अर्थसंघट-नांचाहि त्यांना आश्रय घ्यावा लागेल. म्हणून या बाबतींतहि न्याय्य वांटणीचे प्रश्न उत्पादनसंघटनेच्या प्रश्नापासून अगदीं अलग ठेवले पाहिजेत. उपलब्ध होणाऱ्या उत्पादक साधनसंपत्तीचें प्रमाण व प्रगत तंत्रांचा अधिकाधिक वापर करण्याची शक्यता ह्या दोन गोष्टींवरून उत्पादनपद्धतीचा नमुना निश्चित व्हावा. आर्थिक व सामाजिक धोरण वांटणीच्या प्रश्नांचा विचार स्वतंत्रपणें करूं शकेल. उत्पादनपद्धतीचा जो नमुना असेल त्या अनुरोधानें शेतीचे घटक बनविले गेले पाहिजेत.

---








श्री. जयप्रकाश नारायण

# भूदान आणि विश्वशान्ति

प्रचलित समाजव्यवस्थेकडे जर आपण नजर टाकली तर किती व्यापक प्रमाणावर समाजांत हिंसा चालू आहे याचें आपणांस दर्शन होतें. या समाजांत मानवाचें मानवाकडून, जातीचें जातीकडून, राष्ट्राचें राष्ट्राकडून शोषण चालू आहे. कोठें सरंजामशाही आहे, कोठें भांडवलशाही आहे, कोठें वसाहतवाद आहे, तर कोठें हुकूमशाही आहे. जात व वर्ण, धनिक आणि दरिद्री, सुशिक्षित आणि अशिक्षित असेहि भेद आहेत. हीं सगळीं हिंसेचीं प्रकट रूपें होत. हीं जोंपर्यंत आहेत, तोंपर्यंत दुनियेमध्यें हिंसा व युद्ध रहाणार हें उघड आहे.

### भावनांचा संघर्ष

इतिहासांतून हिंसेच्या या अनेक रूपांचें दर्शन होतें. या सर्व हिंसेच्या अनेक रूपांच्या बुडाशीं काय आहे ? त्यांचें मूळ कशांत आहे ?—या प्रश्नांचा विचार करूं लागल्यास आपणास मनुष्याचाच विचार करावा लागेल. मानवाच्या हृदयांत स्वार्थ आहे, लोलुपता आहे, हिंसा आहे. साऱ्या हिंसेचें, क्रूरतेचें, अत्याचाराचें, जुलुमाचें, युद्धांचें मूळ तेथें आहे. जोंपर्यंत मनुष्याच्या हृदयांतून या गोष्टींचें निर्मूलन होणार नाहीं तोंपर्यंत हिंसेपासून, युद्धापासून मुक्ततेची आशा नाहीं.

त्याबरोबर हेंहि ध्यानांत ठेवणें जरूर आहे कीं मनुष्याच्या हृदयांत प्रेम, निःस्वार्थता आणि पराक्रमी, साहसी वृत्ति हींहि आहेत. मानव-हृदयांतील भावनांमध्यें सतत संघर्ष चालू आहे हें इतिहासावरून दिसून येतें. कधीं सद्भावनांचा जय तर कधीं असद्भावनांचा जय होत आला आहे. आपल्या जीवनांत नित्य अनुभवहि हाच येत असतो. आपल्या भावना व तज्जन्य कृती यांमुळें आपली कधीं उन्नति तर कधीं अवनति होत असते.

### विज्ञानानें उपलब्ध केलेलें वैपुल्य

मला असा विश्वास वाटतों कीं, मानवाला जो आतांपर्यंत विशाल अनुभव आला आहे व जीं त्याला विपुल नैतिक व शास्त्रीय साधनें उपलब्ध झालीं आहेत तीं पाहतां मानव वांकडातिकडा रस्ता टाकून सरळ रस्त्यानें मार्गक्रमण करण्यास समर्थ होऊं शकेल. मानवाला आपलें जीवन पूर्ण रीतीनें घालवितां यावें इतकी विपुल साधनसामग्री विज्ञानानें मानवाला उपलब्ध करून दिली आहे; इतकी कीं आतां मानवानें लोलुप व स्वार्थपरायण रहाण्याची आवश्यकता उरलेली नाहीं. पूर्वी मनुष्याला असें वाटत असें कीं, आपण जर आपल्या स्वार्थाकडे पाहिलें नाहीं, तर आपलें नुकसान होईल, आणि तें स्वाभाविकहि होतें. कारण प्रत्येकाला मिळण्याइतकीं साधनें त्यावेळीं उपलब्धच नव्हतीं. परंतु वैज्ञानिक प्रगतीनें आज अशी शक्यता निर्माण केली आहे कीं माणसाला आपल्या गरजा पुरविण्याकरितां अधिकाधिक साधनसंपत्ति प्राप्त करून घेतां येते. परंतु खेदाची गोष्ट ही कीं अजूनहि मानवाचें जीवन स्वार्थानें ग्रस्त आहे; अजूनहि मानवाला विज्ञानपूर्व युगांतल्याप्रमाणें इतरांपेक्षां अधिक मिळविण्याची लालसा आहे. त्यामुळें विपुलता व दारिद्र्य खांद्याला खांदा लावून वावरतांना दिसणें, मानवी जीवन अनेकरूपी हिंसेनें ग्रस्त होऊन जाणें ह्या गोष्टी क्रमप्राप्त झाल्या आहेत.

शिवाय असें कीं पूर्वीच्या मानानें पूर्वीपेक्षांहि मोठी अशी महान् नैतिक समस्या मानवासमोर उभी आहे. पण सुदैवाची गोष्ट ही कीं, माणसाला जशी विज्ञानामुळें विपुल साधनसामग्री प्राप्त झाली आहे तसें त्याला नैतिक साधनहि उपलब्ध झालें आहे. त्याचीच चर्चा प्रस्तुत लेखांत करावयाची आहे.

---

‘ भूदानयज्ञ ’ या पाटण्याहून निघणाऱ्या हिन्दी साप्ताहिकांत ( ५।३।५५ ) प्रसिद्ध झालेल्या लेखाचा हा अनुवाद आहे. — का. सं.

## दोन स्वार्थांमधील संघर्ष

अजूनपर्यंत रोगाच्या मुळाशीं जाऊन प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न झालेला नाहीं. शोषण आणि अन्याय यांच्याविरुद्ध, संघर्ष व स्वार्थपरता यांच्याविरुद्ध, समाजव्यवस्था सुधारण्याचे, समाजव्यवस्थेंत बदल करण्याचे आतांपर्यंत प्रयत्न झाले नाहींत असें नाहीं; अजूनहि तसे प्रयत्न जारी आहेतच. परंतु जीवन श्रेष्ठतर बनविण्याच्या प्रयत्नांमागें श्रेष्ठतर जीवनमूल्यांची प्रेरणा राहिलेली आज दिसून येत नाहीं. एका मानवसमूहाच्या स्वार्थपरतेला व लोलुपतेला विरोध दुसऱ्या मानवसमूहाची स्वार्थपरता व लोलुपता उभी करूनच होत आहे. उदाहरणार्थ, भांडवलशाहीच्या स्वार्थभावनेला विरोध श्रमिकांची स्वार्थभावना तिच्या विरुद्ध उभी करून केला गेला आहे. हा जो दोन स्वार्थांमधील किंवा वर्गांमधील संघर्ष तोच सामाजिक परिवर्तनाचें किंवा सामाजिक उन्नतीचें प्रेरक तत्त्व मानलें गेलें आहे. पण मौज ही कीं, या संघर्षाचे परिणाम – ते हिंसात्मक असोत वा सामोपचारानें घडून आलेले असोत – मधुर झालेले दिसत नाहींत. तात्पर्य, मनुष्यामध्यें मौलिक परिवर्तन किंवा त्याच्या स्वार्थाचें शुद्धीकरण अजून घडून आलेलें नाहीं. दुसऱ्या शब्दांत सांगायचें तर हिंसेचीं मुळें अजून होतीं तशींच शाबूत आहेत!

## हृदयपरिवर्तनाचा मार्ग

मग या समस्या सोडविण्यास जो नवा दृष्टिकोन पाहिजे तो कोणता? तो दृष्टिकोन म्हणजे महात्मा गांधींचा हृदयपरिवर्तनाचा आणि सत्याग्रहाचा दृष्टिकोन होय. वस्तुतः गांधीजींचा हा दृष्टिकोन नवीन नाहीं. मानवतेचे जे महान् शिक्षक-महात्मे होऊन गेले त्यांचा हा पुरातन कालापासून चालत आलेला दृष्टिकोन आहे. महात्मा गांधींनीं त्यांत थोडी सुधारून भर घातली एवढेंच. ज्याप्रमाणें अणुविभजन करणाऱ्या वैज्ञानिकांनीं पूर्वी होऊन गेलेल्या वैज्ञानिकांच्या कार्यांत भर घालून तें पुढें नेलें त्याचप्रमाणें गांधीजींनींहि आपली निर्मिति पूर्वरचित भूमिकेवरच उभारली. हृदयपरिवर्तनद्वारें क्रान्ति पूर्ण करण्याच्या प्रक्रियेंत गांधीजी यशस्वी झाले याचें कारण त्यांच्यापूर्वी दुसऱ्यांनीं असाच प्रयत्न केला होता हें होय. गांधीजींनीं तो प्रयत्न पुढें नेला एवढेंच. ज्याप्रमाणें विज्ञानाच्या क्षेत्रांत अणुविभजन हें एक क्रांतिकारक पाऊल आहे त्याचप्रमाणें नैतिक आणि सामाजिक क्षेत्रांत गांधीजींचा सत्याग्रहाचा आविष्कार हें एक क्रान्तिकारक पाऊल होय. त्यामुळें मनुष्याच्या नैतिक प्रगतीच्या दिशेनें उन्नतीचें एक मोठें दार खुलें झालें आहे.

## गांधीजींचें कार्य विनोबा पुढें नेत आहेत

इतर नीतिशास्त्रवेत्त्यांनीं व्यक्तीच्या जीवनांत सदाचार व सन्मूल्यें कशीं आणावींत याचा उपदेश व नियम केले तर गांधीजींनीं समाज किंवा जनता यांच्या व्यापक क्षेत्रांत व्यापक प्रमाणावर सदाचार व सन्मूल्यें यांचा प्रयोग करून दाखविण्याचा मार्ग दाखविला. त्यांची ही प्रणाली म्हणजे नैतिक मूल्यांना प्रत्यक्ष कार्यांत परिणत करण्याचा एक भरीव कार्यक्रम असून त्या कार्यक्रमाचा अत्यंत मोठ्या व्यापक प्रमाणावर प्रयोग होऊं शकतो. कांहीं विशिष्ट परिस्थितींत वाईटाविरुद्ध ( – वाईट करणाऱ्याविरुद्ध नव्हे – ) अहिंसक असहकार करावयाची कल्पनाहि त्यांच्या विचारप्रणालीमध्यें अंतर्भूत आहे. या प्रणालीच्या प्रयोगाचें मोठ्या व्यापक क्षेत्रांतील एक मनोज्ञ उदाहरण म्हणजे गांधीजींच्या नेतृत्वाखालीं भारतीय स्वातंत्र्याकरितां जो अहिंसक संग्राम झाला तें होय. आज गांधीजींचे महान् शिष्य विनोबा गांधीजींचेंच कार्य पुढें नेत आहेत. दोन स्वार्थांमध्यें लढत लावून नव्हे, तर उलट, हृदयपरिवर्तनाच्या द्वारें किंवा आवश्यक झालें तर असहयोगाच्या द्वारें सामाजिक आणि आर्थिक क्रान्ति ते घडवून आणूं पहात आहेत. हिंसेचें उगमस्थान म्हणजे जें दारिद्र्य, विषमता आणि शोषण त्यांचा जर नायनाट करायचा असेल तर मनुष्यानें लोभाचा आणि स्वार्थाचा त्याग केला पाहिजे. याच विचाराला भरीव व्यावहारिक स्वरूप कसें द्यायचें, याच्यावर एक जनतेचें आंदोलन कसें उभें करावयाचें हा प्रश्न उत्पन्न होऊं शकतो. त्या प्रश्नाचें उत्तर विनोबांनीं दिलें आहे. त्यांनीं एक कार्यक्षेत्र निवडलें असून त्यांत असा कांहीं भरीव कार्यक्रम शोधून काढला आहे कीं त्या कार्यक्रमांत कोट्यवधी लोकांना या विचाराचा प्रयोग करून पहातां येतो. या कार्यक्रमाच्या द्वारें विनोबांनीं जमीनीचा प्रश्न हातीं घेतला आहे. जमीनीचा प्रश्न हा समस्त आशियाचा आजचा निकडीचा प्रश्न आहे. विनोबांनीं सर्वच छोट्यामोठ्या भूमिवानांकडून भूमिहीन मजुरां-








प्रीत्यर्थ जमीनीचा हिस्सा मागितला आहे. त्यांनीं वर्गसंघर्ष टाळून प्रत्येक व्यक्तीच्या समोर एक सरळ विचार ठेवला. तो हा कीं " जमीन ही निसर्गाची देणगी आहे. तिच्यावर सर्वांचा अधिकार आहे. जे तिच्यावर मेहनत करतात त्यांचाहि भाग त्या देणगीमध्यें आहे." या विचारामधूनच एक महान् जनता-आंदोलन स्फुरलें. नवीन जीवनसरणीचीं नवीन जीवनमूल्यें प्रसृत व्हावयास लागलीं. नीतिशास्त्राच्या एका सामान्य सिद्धान्ताला एक भरीव रूप प्राप्त झालें. समाजाच्या प्रत्येक व्यक्तीला भरीव कार्यक्रम मिळाला. माणसा-माणसांमधील परस्पर-संबंधांत, त्यांच्या जीवनमूल्यांत एक नवीन क्रान्ति सुरू झाली आहे.

### अखिल मानवसंस्कृतीच्या दृष्टीनें भूदान-विचाराचें महत्त्व

भूदान आणि संपत्तिदान यांचा जो अद्वितीय प्रयोग चालू आहे त्याचें महत्त्व प्रचलित मानवी संस्कृतीच्या दृष्टीनेंहि पटण्यासारखें आहे. मानवजीवनामधून हिंसेचें निराकरण झालेंच पाहिजे. नाहींतर हिंसेची जी अचाट शक्ति वाढली आहे तिच्यामुळें मानव सामाजच खतम होऊन जाईल! हिंसेचें संपूर्ण निर्मूलन करावयाचें तर त्याकरितां मनुष्याच्या हृदयांतील लोभीपणा आणि स्वार्थपरता यांच्या मुळापर्यंत गेलें पाहिजे. माणसाचा लोभीपणा व स्वार्थ घालविण्याकरितां त्याच्यापेक्षां अधिक लोभी व स्वार्थी शक्ति निर्माण करणें किंवा हिंसेच्या अथवा कायद्याच्या दंड-शक्तीनें त्या स्वार्थाचें दमन करूं पाहणें चूक होईल. उलट त्यामुळें तर माणसाची स्वार्थपरता अधिकाधिक आंतल्या आंत धुमसत राहून नवीं नवीं रूपें धारण करील.

याकरितां प्रभावशाली उपाय म्हणजे दंडशक्तीच्या ऐवजीं हृदयपरिवर्तनाचा उपाय होय. गांधीजींनीं हृदयपरिवर्तनाच्या अशा एका प्रणालीचा आविष्कार करून दाखविला कीं, त्या योगानें मानवी समाजाच्या नवनिर्मितीच्या विचारांत आणि नीतिशास्त्रांत एक क्रान्ति झाली आहे. आचार्य विनोबांचें भूदान व संपत्तिदान हा गांधीजींच्या प्रणालीचा एक सुंदर प्रयोग आहे. त्यांत केवळ या युगापुरतेंच नव्हे तर कायमचेंच विश्वशान्तीचें रहस्य साठविलेलें आहे.

भूदानाचा हा सिद्धान्त प्रत्येक देश व राष्ट्र यांच्या परस्परसंबंधांतहि लागू होऊं शकतो. आज आंतरराष्ट्रीय भूदानाची अत्यंत निकडीची गरज आहे; भूदानाला विपुल क्षेत्रहि आहे. म्हणूनच जगांतील राष्ट्रांनीं, विशेषतः आशियांतील राष्ट्रांनीं, महात्मा गांधींच्या संदेशाचा विचार करून तो आपल्या जीवनांत प्रत्यक्ष उतरविला पाहिजे. आजच काम करायची वेळ आहे. कारण उद्यां कधींच येत नाहीं.

---

प्रा. दे. अ. दाभोळकर यांचे विद्यार्थिमित्र श्री. पी. पी. सुराणा बी. ए. ( ऑ. ) यांनीं बिहारमध्यें गया जिल्ह्यांतील कांहीं गांवांतून हिंडून तेथील भूदानकार्य, भूवितरण या संबंधीं माहिती मिळवून तिच्या आधारें एक टिपण केलें आहे, त्या टिपणावरून पुढील माहिती संक्षिप्त करून घेतली आहे. आपल्या टिपणाचा उपयोग करूं दिल्याबद्दल श्री. सुराणा यांचे आभार. त्यांच्या टिपणाचा सारांश असा :

" गयेच्या पूर्वेला ६४ मैलावर कोवाकोल ठाण्याच्या कक्षेंत ६० गांवें आहेत. येथें दोन वर्षांपूर्वी भूदानकार्य सुरू झालें. ६० गांवांपैकीं ४८ गांवांनीं जमीन दिली आहे. दात्यांची संख्या १५५५ असून त्यांच्या कडून एकंदर २६७७ एकर जमीन मिळाली आहे. आतांपर्यंत जमीनीचें वांटप १२ गांवांतच झालें आहे. वांटलेली जमीन २८५.०७ एकर एवढीच आहे. ती ११० जणांना वांटली आहे. – दानपत्राप्रमाणें प्रत्यक्ष जमीन मोजून पाहिली असतां, कांहीं दानपत्रें खोटींच आढळून आलीं. त्यामुळें मिळालेल्या जमिनीपैकीं सुमारें निम्मे जमीन कमी झाली. एका दानपत्रांत दिलेल्या १००० एकरांपैकीं १७५ एकरच वांटणें शक्य होतें; बाकीची जमीन सरकारनें जंगल म्हणून व गुरचरण म्हणून राखून ठेवलेली आढळली. जमिनीचें वांटप करतांना, संबंध गांवांतील पंचांच्या संमतीनें, जे खरोखरीच भूमिहीन असून ज्यांना उदरनिर्वाहाचें कोणतेंहि साधन नाहीं, त्यांनाच जमीन वांटली गेली. तीन बिघ्यांपेक्षां कोणालाहि कमी मिळूं नये असें धोरण ठरविलें गेलें.

" जयप्रकाशांचा सर्वोदय आश्रम जेथें आहे त्या सोखोदेवरा या गांवीं 'सबै भूमि गोपालकी' या ध्येयानुसार गांवांतील सर्वच म्हणजे ६८ जणांनीं आपली सर्व जमीन गांवाला देऊन टाकली. "

श्री. कृ. र. पटवर्धन

# भूदान-आंदोलन : कांहीं समस्या

१८ एप्रिल १९५१ ला पोचमपल्ली ह्या गांवीं विनोबांना पहिलें दान मिळालें तेव्हांपासून ह्या आंदोलनाची गति, प्रचार सारखा वाढत आहे. कांहीं लाख एकरांचें दान मिळालें. अखिलभारतीय कीर्तीचे जयप्रकाशजींसारखे पुढारी सामील झाले. प्रत्येक प्रांतांत हें लोण पोंचलें, प्रचारहि खूपच होत आहे. उपेक्षा, उदासीनता, औत्सुक्य, कुतूहल, शंका, आदर, सद्भावना, प्रेम ह्या भावना जनसागरांत निर्माण करीत हें आंदोलन पुढें पुढें जात आहे. अशा वेळीं चिंतनशील कार्यकर्त्यांच्या विचाराकरतां कांहीं समस्या पुढें मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

## भू-प्राप्ति

अनेक वेळां असें आढळून आलें आहे कीं जमीन अमुकएक एकर मिळवावयाची आहे या नादांत कोणत्या प्रकारची जमीन मिळत आहे याकडे दुर्लक्ष झालें. मानसिक परिवर्तनाच्या व सामूहिक वातावरण निर्माण होण्याच्या दृष्टीनें कोणत्याहि प्रकारचें दान घेणें अत्यावश्यक आहे ही गोष्ट जरी खरी असली, तरी उत्तम प्रकारची – निदान लागवडीखालीं असलेली व लागवडींत आणतां येईल अशा प्रकारची जमीन मिळविण्याचा आग्रह धरणें जास्त इष्ट ठरेल. केवळ जमीन मिळविणें हा या आंदोलनाचा हेतु नाहीं. भूहीनांचा प्रश्न सोडविणें, ग्रामोद्योगाच्या आधारावर नवग्राम निर्माण करणें असें त्याचें अंतिम उद्दिष्ट आहे. म्हणून हजारों एकर पडीत जमीन घेतल्यानें एकरांचा आंकडा फुगेल परंतु खरें कार्य दुरावेल अशी साधार भीति अनेकांनीं व्यक्त केली आहे. ज्याप्रमाणें थोडेंच पण पौष्टिक अन्न शरीरास हितावह आहे त्याप्रमाणें संख्येपेक्षां गुणाला जास्त महत्त्व भूदानांत असावयास हवें. पडित टाकावू जमीन कशी लागवडीस आणतां येईल, पाण्याची काय व्यवस्था करतां येईल, भांडवल किती लागेल, तें कोठून आणावयाचें, पीक कोणतें येईल, तज्ज्ञांचें सहकार्य कसें मिळेल इत्यादि बाबींचा विचार करण्याइतकी फुरसत भूदानकार्यकर्त्यांजवळ सध्यां तरी दिसत नाहीं.

मध्यप्रदेशांतील एका तालुक्यांतील १२ गांवांचे जमीनींचे आंकडे खालीं दिले आहेत. ते मोठे विचार-प्रवर्तक आहेत.

त्यावरून असें दिसून येईल कीं एकंदर २४४ एकरांपैकीं ११८ एकर आज तरी लागवडीखालीं आणतां येणार नाहीं. एकरीं किमानपक्षीं शंभर रुपये हें भांडवल लक्षांत घेतां ही जमीन लागवडीखालीं आणावयास ११८०० रुपये जमा करावे लागतील. हें

| १ गांव | प्राप्त झालेली जमीन ( एकर ) | पडीत जमीन ( एकर ) | मध्यम जमीन ( एकर ) | उत्तम जमीन ( एकर ) |
|---|---|---|---|---|
| १ | ११ | — | ११ | — |
| २ | ५ | — | — | ५ |
| ३ | ९ | — | ३ | ६ |
| ४ | १२ | १२ | — | — |
| ५ | ४४ | २८ | ११ | ५ |
| ६ | ४३ | १७ | १३ | १३ |
| ७ | १९ | १२ | ७ | — |
| ८ | १७ | ६ | ११ | — |
| ९ | २२ | १२ | १० | — |
| १० | ८ | ३ | ५ | — |
| ११ | ४३ | २८ | १५ | — |
| १२ | ११ | — | ११ | — |
| | २४४ | ११८ | ९७ | २९ |

भांडवल सध्यांच्या स्थितींत त्या खेड्यांतून जमणें सर्वथैव अशक्य आहे. शहरांमधून संपत्तिदानाचें कार्य झपाट्यानें होऊं शकलें तरच कांहीं मार्ग निघण्याची शक्यता आहे.

## भू-वांटप

ज्या गांवांत भूवांटप झालें व भूहीनांच्या आर्थिक परिस्थितींत फरक आढळला त्याच गांवांत मानसिक व सामाजिक परिवर्तन ( social change ) जास्त दिसून येतें. कित्येक वेळां भूहीनांच्या सभेंतून कोणीहि जमीन मागण्यास पुढें येत नाहीं. याचें कारण प्राप्त होणारी जमीन निरुपयोगी आहे, पडीत आहे ह्याची खात्री भूहीनांना असते हेंच होय. म्हणून वांटपाच्या दृष्टीनेंहि चांगली वा बऱ्या प्रकारची जमीन मिळविणें जास्त इष्ट. बऱ्यापैकीं मध्यम जमीनीवर थोडा पैसा खर्च केला असतां चालूं शकतें. साधनहीन शेतकऱ्याला केवळ जमीन देऊन भागत नाहीं. बीं-बियाणें, खत, बैलजोडी, अवजारें, इतर साधनसामग्री ह्यांची खूप आवश्यकता असते. इतकेंहि करून मिळालेल्या जमिनी-वरच पूर्ण गुजराण भूमिहीनाची व त्याच्या कुटुंबाची होऊं शकत नाहीं. कारण पहिलीं कांहीं वर्षे तरी शेतीमधून निघणारें उत्पन्न त्याच्या मजुरीच्या उत्पन्नापेक्षां जास्त असूं शकणार नाहीं. ह्या सर्व गोष्टींचा नीट खुलासा जमीन-वांटपाच्या वेळीं व त्यानंतर वरचेवर भेटून कार्यकर्त्यांनीं केला, तर भूदान-आंदोलनाबद्दलच्या भलत्याच अपेक्षा व चुकीच्या माहितीवर आधारलेले गैरसमज सहज दूर होणें शक्य आहे.

वरील १२ गांवांत भूवांटप झालें आहे. प्रत्येक गांवांतील जमीन प्राप्त झालेले शेतकरी त्यांची कुटुंबां-तींल लोकसंख्या, वार्षिक उत्पन्न व बैलजोडी, खत, नांगर, बीं – बियाणें या दृष्टीनें ते शेतकरी स्वयंपूर्ण होण्यास लागणारें आवश्यक भांडवल, यांचे आंकडे खालीलप्रमाणें आहेत[२].

त्यावरून असें दिसून येईल कीं ४९ शेतकरी खऱ्या अर्थानें स्वयंपूर्ण भूस्वामी होण्यास ( अर्थात् उत्पन्न वा जीवनमान कमी न होतां ) कमींतकमी ४२९१० रुपये (वार्षिक उत्पन्न व भांडवल मिळून) उत्पन्न येईल अशा प्रकारची जमीन हवी. किमान २५००० रु. उत्पन्न दरसाल होईल अशा पद्धतीची हवी. म्हणजेच दुसऱ्या प्रकारें उत्तम प्रकारची १००० एकर जमीन ह्या बारा गांवांतच मिळाली पाहिजे. भू-वांटपांतून भू-हीनांचा प्रश्न सोडविण्याच्या प्रश्नाचें गांभीर्य व बिकट-पणाची कांहींशी कल्पना ह्या १२ गांवांच्या उदाहरणा-वरून येऊं शकेल. आणि तेवढें करूनहि फक्त ४९ भूहीनांचाच प्रश्न सुटला. सर्व भूहीनांचा नव्हे हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

| २ गांव | जमीन मिळालेले शेतकरी | कुटुंबांतील संख्या | उत्पन्न ( वार्षिक ) रु. | आवश्यक भांडवल रु. |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ५ | ८२० | ७०० |
| २ | ३ | १२ | १४८० | ११५० |
| ३ | १ | २ | २५० | ३५० |
| ४ | ६ | २८ | ४२७० | २१०० |
| ५ | ८ | ३६ | ४३०० | २८०० |
| ६ | २ | १४ | १८५० | ७०० |
| ७ | ७ | २७ | २५४५ | २४५० |
| ८ | ३ | १३ | २५१० | ११५० |
| ९ | ३ | १६ | १४४५ | ११५० |
| १० | ४ | २३ | ७१० | १४०० |
| ११ | ३ | १४ | १०६० | ११५० |
| १२ | ७ | ३७ | ४१२० | २४५० |
| | ४९ | २२७ | २५३६० | १७५५० |








## जोडधंदे

वरील बाराहि गांवांतून माहिती जमा करतांना असें आढळून आलें कीं स्वतंत्रपणें ग्रामोद्योगावर जगणारे कोणीहि नाहीं. मुख्य धंदा शेती. जोडधंदा म्हणून करतां येण्यासारखा कोणताहि धंदा शिल्लक राहिलेला दिसत नाहीं. त्यापासून उत्पन्न होत नाहीं. इंग्रजी राज्यांत स्वयंपूर्ण ग्रामव्यवस्था व अर्थव्यवस्था कोलमडून पडली. पण तिच्या जागीं शेतकऱ्याची आर्थिक उन्नति करूं शकेल अशी कोणतीहि रचना, व्यवस्था अमलांत आली नाहीं. त्यामुळें केवळ शेतीच्या उत्पन्नावर अवलंबून राहणें हा एकच पर्याय ग्रामीण जनतेपुढें शिल्लक राहिला. ग्रामोद्योगांची शास्त्रीय पायावर पुनर्रचना करून सर्वसामान्य जनतेला परवडेल अशा प्रकारचें उत्पादन जर खेड्यांतून होऊं शकलें तर भूदान-आंदोलनाचें कार्य फार मोठ्या प्रमाणांत यशस्वी होईल. अन्यथा जमीन-वांटप करूनहि आमच्या ग्रामीण बेकारीचा, गरीबीचा, व असमाधानी जीवनाचा प्रश्न तसाच कायम राहील.

खेदाची गोष्ट अशी आहे कीं, आमच्या इतर क्षेत्रांप्रमाणें शेतकीमध्येंहि आमची विज्ञाननिष्ठा अभावानेंच तळपली. उत्पादन कसें वाढवतां येईल, उत्तम पीक कसें निघेल इत्यादि प्रयोग करण्याची गरज गेल्या हजार वर्षांत आम्हांस कधींच वाटली नाहीं. जपानी भातशेतीचे ( Intensive cultivation ), यंत्रसाहाय्याचें सामूहिक शेतीचे प्रयोग आतां आतां आपल्या देशांत कोठें होऊं लागले आहेत. भूदानयज्ञानें या सर्व प्रयोगांना मोठी चालना दिली आहे. भूदानांत ह्या प्रयत्नांना फारच मोठा वाव आहे. आमचे शेतीतज्ज्ञ, अर्थशास्त्रज्ञ, शेतकरी व संशोधक यांच्या कर्तृत्वाला हें मोठेंच आव्हान आहे. त्याचें उत्तर न मिळेल तर सामाजिक न्याय व समता ह्या थोर उद्दिष्टांबरोबर आवश्यक असणारी उत्पादनवाढ हा प्रधान हेतु दृष्टीआड होण्याची शक्यता आहे.

## हें चित्र व तें चित्र !

एका गोष्टीचें मात्र अतिशय वैषम्य वाटतें. ४० एकर जमीन, स्वतःची बैलजोडी व इतर साधनें असणारा शेतकरीसुद्धां बारा महिने राबतो, दिवस उजाडण्यापूर्वीच शेतांत जातो. दिवसभर काबाडकष्ट करावे, रात्रीं राखण करावी, पावसानें कृपा केली तर ठीकच, नाहींतर दैन्याला पारावार नाहीं ! उभें पीक कोणी कापून नेईल का ही सदैव धास्ती; गुरांची काळजी; धान्याचे भाव काय राहतील ही चिंता; आणि इतकें सारें करून सालअखेर १००० रुपयेहि शिल्लक टाकतां येऊं नये, मुलाचें शिक्षण करतां येऊं नये– ही मध्यम शेतकऱ्यांची स्थिति. मग पांचदहा एकरवाल्यांचें काय वर्णावें ? उलट, शहरांत मात्र ८ तास काम, सर्व सुखसोयी, वैद्यकीय मदत, शिक्षणाचीं विपुल साधनें– काय नाहीं ? कित्येक सरकारी अधिकाऱ्यांना ( सेवकांना ? ) वर्षाला ५०००, १००००, २५००० रु. पर्यंत वेतन असावें. इतका फरक कां ? कोणत्या शास्त्रशुद्ध पायावर ही वांटणी आम्ही केली आहे ? भूदानयज्ञानें हा एक अतिशय मूलभूत प्रश्न विचारी लोकांपुढें टाकला आहे.

आणखी एक महत्त्वाचा प्रश्न अनेकांच्या मनांत रेंगाळत आहे. एवढें मोठें मानसिक परिवर्तन देशांत घडत असतांना ह्या देशांतील तरुण वर्ग धडाडीनें, हिरीरीनें ह्या आंदोलनांत पडतांना कां दिसत नाहीं ? कोणतीहि चळवळ ही निष्ठेनें भारलेल्या शेंकडों तरुणांच्या प्रयत्नांतून, कष्टांतूनच यशस्वी होऊं शकते. शेजारचा चीन, पलीकडचा रशिया यांचे इतिहास तरुणांनीं बदलून टाकले. मग, एक महाराष्ट्रांतील राष्ट्रसेवादलाचा अपवाद सोडला, तर खूप मोठ्या प्रमाणावर तरुणवर्ग ह्या आंदोलनाकडे कां आकर्षिला जात नाहीं ? १९०७, १९२०, १९३०, १९४२ पर्यंत ज्या पद्धतीनें व प्रकारें तरुणांनीं सर्वस्वाचा होम केला तशा प्रवृत्तीची तरुणमंडळी ह्या आंदोलनांत कमी दिसतात. एक गोष्ट खरी आहे कीं ह्या विधायक कार्यांत नांव, झटपट प्रसिद्धि, पुढारीपणा, सत्ता इत्यादि दिसणार नाहीं. पण निष्ठावंत स्वार्थत्यागी तरुणांच्या मनांत ह्या आंदोलनाच्या उपयुक्ततेविषयीं व अंतिम यशाविषयीं एक जबर शंका असावी असें दिसतें. तसेंच संघटनेच्या बाजूवर भूदान-आंदोलनांत फारसें लक्ष दिलें गेलेलें नाहीं.

तेव्हां जमीन किती मिळेल, कशी मिळेल, वांटप कसें करावें, भांडवल कसें जमा करतां येईल ह्यापेक्षांहि कर्तबगार तरुण ह्या आंदोलनाकडे कसे खेंचतां येतील, त्यांची संघटना कशी निर्माण करावी हीच एक फार मोठी समस्या आहे. तिचें उत्तर जर सांपडूं शकेल तर भूदानांतील इतर समस्या सोडविण्याचा मार्ग सुलभ होईल.








श्री. दि. के. बेडेकर

# यज्ञकल्पनेचा उगम, स्वरूप व पुनरुज्जीवन

भूदानयज्ञाच्या मागें एक मूलगामी भूमिका आहे; केवळ भूमिहीनांना जमीन मिळवून देणें एवढेंच या आंदोलनाचें उद्दिष्ट नसून सर्व साधन-संपत्तीचा उपयोग व्यक्तिस्वार्थासाठीं न होतां समाजासाठीं झाला पाहिजे हा अंतिम हेतु विनोबांनीं स्पष्ट पुढें ठेवला आहे. समाजवाद व जागतिक शांतता यांवर आधारलेली नवी सर्वकल्याणकारी मानवसंस्कृति निर्माण करण्याचें ध्येय हें आधुनिक युगाचें धर्मतत्त्व बनलें आहे. हें आधुनिक तत्त्वच भूदानयज्ञाच्या चळवळीचें अधिष्ठान आहे. आपल्याकडे आधुनिक तत्त्वांना आपलेंसें करून घेतांना परंपरागत कल्पनांचा मागोवा घेण्याची प्रवृत्ति आहे व तिला अनुसरून 'दान' व 'यज्ञ' या प्राचीन कल्पनांशीं या चळवळीचें नातें जोडलें गेलें आहे. या चळवळीच्या आनुषंगिक बाबींची व यज्ञापयज्ञाची चर्चा होत राहीलच, कारण मार्ग व मर्यादा यांची परीक्षा प्रत्यक्ष सामाजिक प्रयोगांतच होत जाते व भूदानयज्ञाच्या आंदोलनाचा हा प्रयोग चालू असतांना त्याची परीक्षा व मोजमाप होत राहणें इष्टच आहे.

प्रस्तुत लेखामध्यें मात्र या आनुषंगिक बाबींचा व यज्ञापयज्ञाचा विचार केलेला नसून ज्या प्राचीन यज्ञ-कल्पनेचा आधार विनोबांनीं घेतला आहे त्या कल्पनेसंबंधीं चर्चा केली आहे. 'यज्ञ' ही केवळ कल्पना नसून एक सामाजिक तत्त्व आणि आचार म्हणून उद्‌भवलेली संस्था आहे व तिचा उगम ज्ञात संस्कृतींच्या फार पूर्वी झालेला आहे, किंबहुना या प्राचीनतम मूलाधार अशा संस्थेंतूनच मानवी संस्कृतीचा महावृक्ष निर्माण झालेला असून मिसर, आर्य, द्राविड, ग्रीक इत्यादि ज्ञात संस्कृतींच्या शाखा सापेक्षतया अगदीं अलीकडच्या काळांत विस्तारल्या आहेत. ज्या विश्वकुटुंबाचें स्वप्न आज विनोबांसारखे ध्येयवादी पहात आहेत त्या कुटुंबप्राय एकजीव मानवसमूहाची एक प्रथमावस्था अज्ञात अशा भूतकाळांत प्रत्यक्ष नांदत होती. त्या अवस्थेमध्यें 'यज्ञा'चा जन्म झाला असून मग या यज्ञांतून देव, राजा, जातिकल्पना, खाजगी मालमत्ता इत्यादि प्रमेयांचा व प्रत्यक्ष संस्थांचा जन्म झालेला आहे. यज्ञांतून निघालेल्या द्रौपदीसाठीं जसें महाभारत झालें तसें गेल्या दहावीस हजार वर्षांतील मानवसंस्कृतीचें महाभारत एका प्राचीनतम अशा यज्ञांतून निघालेल्या या बीजतत्त्वांभोंवतीं गुंफलें गेलें आहे. यज्ञसंस्थेसंबंधीं अशी एक भूमिका प्रस्तुत लेखामध्यें वाचकांपुढें मांडावयाची आहे.

## 'यज्ञा'ची सार्वदेशिक व्याप्ति

आपल्याकडे असा एक समज दृढ असणें साहजिक आहे कीं 'यज्ञ' ही संस्था फक्त भारतीयांची आहे. आर्यांच्या धार्मिक व सामाजिक जीवनांत यज्ञाला अग्रस्थान आहे व अनार्य हे यज्ञहीन होते असें आर्यांनीं म्हटलेलें आहे. पण प्राचीन संस्कृतींचा व बर्बरावस्थेंत नांदणाऱ्या मानवसमूहांचा अभ्यास करून जें ज्ञान उपलब्ध झालें आहे तें जमेस घेतां असें दिसतें कीं 'यज्ञ' ही सार्वत्रिक आढळणारी संस्था आहे. पांचीं खंडांत असा एकहि समूह आढळत नाहीं कीं ज्याच्या जीवनांत या ना त्या स्वरूपांत यज्ञाचें तत्त्व अंगीकारलेलें नाहीं. यज्ञविधीचा प्रपंच कोठें प्रगल्भ व सुसंस्कृत आढळतो तर कोठें त्या विधीचें रूप तोकडें व ओबडधोबड आढळतें, परंतु या विधीचें ज्ञान शिष्ट किंवा बर्बर अशा सर्व समाजांत हमखास दिसून येतें.

यज्ञविधीचीं प्रगल्भ व प्राथमिक, किंवा संस्कृत व प्राकृत रूपें सार्वत्रिक आढळतात असें म्हणतांना या विधीची एक मूळ किंवा लक्षणासारखी व्याख्या करावी लागते. ती व्याख्या अशी करतां येईल: आपल्याला प्रिय असलेलें कांहींतरी हवन करून या हवनापासून कांहींतरी शक्ति ( किंवा इष्टवस्तु ) मिळविण्यासाठीं 'यज्ञ' हा एक कल्पित विधि असतो. 'कल्पित' किंवा ज्ञानपूर्वक रचलेला विधि म्हणण्याचें कारण असें







कीं नित्याच्या रोखठोक देवघेवीपेक्षां या हवनविधीचें स्वरूप वेगळें असतें. नुसती देवाणघेवाण पशूहि करतात, त्यांत ' कल्पित ' कांहीं नसतें. मनुष्यप्राणी हा कल्पना करणारा आहे म्हणून त्याच्याकडूनच हा ' कल्पित ' विधि होऊं शकतो. यज्ञामध्यें 'भय' ' आश्चर्य ' या प्राणिभावनांसारखें सहजजात असें कांहीं नाहीं, उलट मानवी कल्पकतेचा तो एक विशिष्ट व विलक्षण आविष्कार आहे.

यज्ञाची किंवा बलीची कल्पना दैवतें आणि पितर यांच्या अस्तित्वाच्या कल्पनेवर आधारलेली आहे, किंबहुना, प्रथम मृत पितरांच्या आत्म्यांचें अस्तित्व व नंतर दैवतांचें अस्तित्व मानवानें कल्पिलें व मग पितरांना व देवांना तोषविण्यासाठीं बली अर्पण करण्याची दुय्यम कल्पना निघाली असें मत आज रूढ आहे. प्राचीन धर्मकल्पनांचा उगम संशोधितांना प्रथम देव व मग यज्ञ ( किंवा बली ) असाच क्रम युरोपीय संशोधकांनीं स्वीकारला व त्यांचें मतच आपल्याकडेहि ग्राह्य धरण्यांत आलें. सृष्टिरचनेविषयीं व सूर्य, पर्जन्य इत्यादि नैसर्गिक शक्तींविषयीं मानवाच्या हृदयांत कुतूहल, कृतज्ञता व प्रसंगीं भय उत्पन्न होऊन या भावनांचें मूर्तीकरण झालें व या मूर्तीनाच दैवतरूपें लाभलीं ही उपपत्ति युरोपीय व भारतीय विद्वानांनीं मानलेली दिसते. परंतु ही उपपत्ति बरोबर आहे काय ? हा प्रश्न विचारांत घेण्यासारखा आहे.

आपल्या परंपरेंत असें मानलेलें आढळतें कीं देवांसाठीं किंवा देवांपासून ' यज्ञ ' निघाला नसून, उलट, ' यज्ञा'पासून देव निघाले आहेत. या परंपरागत उपपत्तीचें मर्म आपण शोधलें पाहिजे. 'ईश्वर' या कल्पनेवरच सर्वस्वीं आधारलेली खिस्ती धर्मकल्पना ज्यांच्या हाडींमासीं रुळलेली होती अशा युरोपीय संशोधकांना भारतीय यज्ञपरंपरा नीट ठाऊकच नव्हती व तिचें मर्म कळणें तर अशक्यच होतें. परंतु, त्या परंपरेचा आज भारतीय संशोधकांनीं विचार करावयास हवा. मानवी धर्मकल्पनांचें मूळ ' भय ' ' कौतुक ' ' कृतज्ञता ' इत्यादि सहज प्रवृत्तींत नसून व दैवतांच्या किंवा ईश्वराच्या कल्पनेंत नसून तें यज्ञकल्पनेंत आहे ही गोष्ट आपण भारतीयांनीं ओळखली पाहिजे व त्या दिशेनें संशोधन केलें पाहिजे. फ्रेझर प्रभृतींच्या रूढ कल्पनांचें खंडन करून यज्ञ-कल्पनेला मानवी धर्मविचारांचा मूळ स्रोत व आधार मानण्याचें पाऊल कांहीं युरोपीय विद्वानांनीं आधींच टाकलें आहे. लॉर्ड रॅगलन् व होकार्ट प्रभृति संशोधकांच्या विचारांची दिशा धरून पुढील लेखांत यज्ञाचें स्वरूप विशद करण्याचा मी प्रयत्न केला आहे.

## नरमेध हाच प्रथम यज्ञ

दैवतसृष्टि कल्पिण्याच्या आधीं मानवानें यज्ञ निर्माण केला हें जर खरें असेल तर या विधीचा मूळ अर्थ व प्रयोजन तरी काय होतें, ह्या प्रश्नाचा विचार आपल्याला करावयाचा आहे. त्यासाठीं यज्ञाचें मूळ रूप पाहूं लागल्यास एक विलक्षण गोष्ट आपल्या नजरेस पडते ती अशी कीं, हवनाच्या वेगवेगळ्या पद्धतींतून प्राचीनतम अशा पुरुषमेधाचें आद्य रूप डोकावूं लागतें. गौतमबुद्धाच्या काळीं यज्ञामध्यें पशूंची हिंसा होत होती व नंतरच्या काळांत खऱ्या पशूंच्या ऐवजीं पिठाचा पशु करून त्याचा बळी देण्याची कल्पना रूढ होऊं लागली, — अर्थात् या अहिंसातत्त्वाचा अवलंब सार्वत्रिक झाला नाहीं व नंतर पशुयाग होत राहिलेच. परंतु खऱ्या पशूऐवजीं त्याची प्रतिमा करण्याचा जो मार्ग अवलंबिला गेला तसाच एक प्रकार फार प्राचीन काळांत झाला, ही गोष्ट महत्त्वाची आहे. खरा पशु हा ज्याप्रमाणें एक प्रतीक म्हणून हवन केला जात होता त्याप्रमाणें बकरा किंवा घोडा हा पशूहि मुळांतील नरमेधांत बळी जाणाऱ्या मनुष्यबळीची प्रतिमा किंवा प्रतिनिधि होय, ही गोष्ट मानल्याखेरीज प्राचीन यज्ञविधीचा अर्थ लागत नाहीं व अश्वमेधामधील








महिषी-अश्व-संनिवेशासारख्या प्रयोगांचें मर्म कळूं शकत नाहीं. बर्बरावस्थेंतील लोकसमूहांमध्यें, इतरत्र व खुद्द भारतामध्येंहि, नरमेध करणाऱ्या लोकसमूहांचीं उदाहरणें आजहि सांपडतात, आणि नरमेधाची प्रथा असणें हा बर्बरावस्थेचा पुरावा समजला जाणेंहि साहजिक आहे. त्यामुळें नरमेधाच्या प्रथेबद्दल आर्यांच्या यज्ञसंस्थेंत जें अवशेषरूपानें शिल्लक असेल त्याच्याकडे दुर्लक्ष करण्याची आज प्रवृत्ति आहे, किंवा नरमेधाची चाल द्राविडांमध्यें होती असें म्हणून आर्यांच्या यज्ञसंस्थेला नरमेधाच्या 'पापा'पासून निर्लेप राखण्याची प्रवृत्ति आहे. पण 'नरमेध' ही यज्ञसंस्थेचा उगम समजून घेण्याची गुरुकिल्ली आहे असें मानण्याइतका पुरावा आज जगभर विखुरलेल्या मानवसमूहांच्या धर्मविधींचा अभ्यास करून गोळा केला गेला आहे. 'यमा'चें आत्मबलिदान, पुरुषसूक्तांत व इतरत्र आढळणारी 'पुरुष'कल्पना, इत्यादि गोष्टींवरून आपल्या यज्ञसंस्थेच्या बुडाशींहि नरमेधाचें आद्य रूप मानावें लागेल.

## नरमेधाचा उदात्त आशय

धर्माचा उगम मानवाला दैवी चैतन्याचा साक्षात्कार होण्यांत आहे असें मानणाऱ्या परंपरेच्या अभिमान्यांना किंवा तो उगम मानवाच्या निसर्गशक्तींविषयींच्या कुतूहलांत आहे असें मानणाऱ्या बुद्धिवाद्यांना नरमेधासंबंधींचें वरील मत पाखंडीपणाचें वाटेल व धर्माचें घोर विडंबन वाटेल. परंतु, नरमेधाचा खरा आशय व उदात्त अर्थ समजून घेतला तर हा गैरसमज दूर होईल. 'नरमेध' म्हणजे कोठल्या तरी माणसाला बकऱ्याप्रमाणें वेदीवर चढवून ठार मारणें नव्हे; किंवा श्री. डांगे यांनीं म्हटल्याप्रमाणें टोळ्याटोळ्यांतील चकमकींत कैद केलेल्या शत्रुपक्षीय माणसांची कत्तल करणें नव्हे. नरमेध हा असा निर्घृण व्यवहार नसून एक उदात्त विधि म्हणून निर्माण झाला आहे. म्हणूनच त्या विधीचें स्वरूप नीट समजावून घेतलें पाहिजे.

नरमेधामध्यें बळी जाणारा पुरुष हा स्वेच्छेनें, सर्वांच्या कल्याणासाठीं स्वतः बळी जाणें आवश्यक आहे हें उमजून, आपल्या देहाचें बलिदान करीत असें. 'लोकांच्या कल्याणासाठीं मी माझा प्रिय देह अर्पण करतों' असें यम म्हणतो व बळी होऊन अमृतत्वाला व देवत्वाला पोंचतो असें यमसूक्तांत म्हटलेलें आहे. नंतरच्या पशुयज्ञामध्येंहि वेदीकडे चालविलेला पशू जर मागें सरकला किंवा त्याच्या गळ्यांतील दोरी ताणली गेली तर तो पशु स्वेच्छेनें न जाणारा व म्हणून अमेध्य ठरतो याचेंहि इंगित हेंच आहे. सारांश, नरमेधामध्यें **स्वेच्छेनें केलेल्या आत्मबलिदानाचें उदात्त तत्त्व** आहे व म्हणूनच मानवाच्या सर्व धार्मिक, नैतिक व समाजधारणेच्या कल्पनांचा विस्तार या यज्ञबीजापासून झालेला आहे.

## आत्मबलिदान कशासाठीं ?

लॉर्ड रॅगलन् व होकार्ट प्रभृति संशोधकांच्या यज्ञविषयक विचारांची ओळख करून घेत असतांना नरमेधाच्या वरील टप्प्यापर्यंत मी पोंचलों व येथें एक अवघड प्रश्न उभा राहिला. नरमेधामध्यें आपले प्राण अर्पण करणारा यज्ञपुरुष हा दधीची ऋषीप्रमाणें लोकांना वंद्य वाटत असे व त्याच्यावर अनन्य भक्ति ठेवून लोक त्याला आपला राजा मानीत. अशा रीतीनें, 'राजा' म्हणून ठराविक काळ नांदावयाचें व मग पर्वकाळीं होणाऱ्या यज्ञांत बळी जावयाचें ही प्रथा सुरू झाली. 'राजा' आणि त्याचे पुरोहित व अंगरक्षक (क्षत्र) अशी एक नवीनच संस्था त्या प्राचीन एकजिनसी लोकसमूहांत निर्माण झाली. ह्या साऱ्या घडामोडींचा व प्रक्रियेचा सूक्ष्म अभ्यास वरील दोन संशोधकांनीं केलेला आहे. परंतु प्रश्न असा पडतो कीं एका पुरुषानें स्वेच्छेनें बळी जाण्यानें आपल्या समूहाचें कल्याण होईल ही कल्पनाच मुळांत कां उत्पन्न झाली ? कांहीं तरी गूढ अतर्क्य

अशी शक्ति ( किंवा द्रव्य ) या बलिदानापासून निर्माण होते या समजुतीमुळें ही नरमेधाची प्रथा रूढ झाली असें गृहीत धरून केलेलें विवेचन समाधानकारक ठरत नाहीं, कारण त्यांत प्राचीन मानवाच्या पदरीं आपण एक निराधार कल्पना व श्रद्धा बांधतों.

तेव्हां एकाच्या आत्मबलिदानावर आधारलेला व सर्व समाजाला आवश्यक व पोषक वाटणारा हा नरमेध कोणत्या प्रेरणेनें निघाला याविषयीं कांहींतरी सयुक्तिक उपपत्ति असली पाहिजे.

तशी एक उपपत्ति अश्वमेधांतील एका मंत्राच्या आधारानें देण्याचा प्रयत्न मी पुढें केला आहे. तो मंत्र असाः--

प्रजापतिः प्रजाः सृष्ट्वा प्रेणाऽनुप्राविशत् । ताभ्यः पुनः संभवितुं नाशक्नोत् । सोऽब्रवीत् । ऋध्नवदित्सः । यो मेतः पुनः संभरदिति । तं देवा अश्वमेधेनैव समभरन् । ततो वै त आर्ध्नुवन् । योऽश्वमेधेन यजते । प्रजापतिमेव संभरत्यृध्नोति । पुरुषमालभते ॥

( तैत्तिरीय ब्राह्मण ३।९।८ )

" प्रजापतीनें प्रजा निर्माण केल्या व त्यांच्यामध्यें तो प्रेमामुळें विलीन झाला. पण नंतर त्याला पुन्हां बाहेर येऊन आपले (संभरण) भाग एकवटणें अशक्य झालें. तो म्हणाला ' यांतून मला बाहेर आणून मला माझी पूर्वस्थिति व एकता जो प्राप्त करून देईल तो समृद्धि पावेल'. तेव्हां देवांनीं अश्वमेध केला व या मार्गानें प्रजापतीचें संभरण केलें. त्यामुळें देव समृद्ध झाले. "

वरील मंत्रामध्यें यज्ञानें साधणाऱ्या ' संभरणा'चा अर्थ स्पष्ट होतो. शक्ति किंवा तेज आपोआप विखरत जातें व क्षीण होतें व पुन्हां कांहीं प्रयत्न करून तें उजळावें व समृद्ध करावें लागतें. हा क्रम चंद्राच्या वृद्धिऱ्हासांत, वनस्पतींच्या व पशूंच्या जीवनांत, ऋतुचक्रांत किंबहुना सर्व वस्तुजातांत दिसतो. आज एका अखंड चढत्या प्रगतीवर मानवाची श्रद्धा असल्यासारखी दिसते. पण विश्वामध्यें चक्राकार गति, वृद्धिऱ्हास, जन्मस्थितिनाश यांचें साम्राज्य अबाधित चालूं आहे. प्राचीन मानवाचें मन या विश्वक्रमाशीं एकरूप होतें. त्याचें जीवितच या एकरूपतेवर आधारलेलें होतें. त्याचें समूहजीवन अंतर्गत दृढतेच्या आधारावर कमी किंवा जास्त समृद्ध होत होतें. ही अंतर्गत दृढता, म्हणजे माणसांना एकमेकांविषयीं व समूहाविषयीं वाटणारी निष्ठा, कमीजास्त होण्यावर प्राचीन समूहांचें व प्रत्येक व्यक्तीचें सर्वस्व अवलंबून होतें.

या दृढतेसाठीं ' जनानां संगमनाय ' देह अर्पण करणारा यम यज्ञपुरुष झाला व मर्त्य मानवकोटींतून देवकोटीला पोंचला. मृत्यूला स्वेच्छेनें पतकरणारा यम मृत्यूला जिंकून अमर होतो याचें कारण त्यानें आपल्या बलिदानानें मानवांना एकत्र आणून दृढतम स्नेहबंधनानें प्रबळ केलें होतें; मानवसमूहाला संजीवन व अमरत्व दिलें होतें.

समूहाच्या अंतर्गत दृढतेला समृद्ध व तेजस्वी करण्यासाठीं एका हुतात्म्याला आपला प्राण द्यावा लागतो ही गोष्ट आजच्या जीवनांतहि आपल्याला अनुभवास येते; किंबहुना, मानवसमाजाची प्रगति अशा हुतात्म्यांच्या बलिदानानें व त्यांना समाजानें अर्पण केलेल्या श्रद्धेनेंच झालेली दिसत आहे. आज हें बलिदान राष्ट्रासाठीं किंवा आंतरराष्ट्रीय मानवधर्मासाठीं व्हावें लागतें. प्राचीनतम मानवसमूहांतहि ह्या बलिदानाची गरज होतीच. या नित्याच्या व्यवहाराला प्राचीन मानवानें एका विधीचें रूप दिलें, हाच यज्ञविधीचा (व नरमेधाचा) अर्थ होय.

## समूहाची क्षीणता व ' संगमन '

वरील दिशेनें यज्ञविधीच्या उगमाची कथा सांपडूं शकेल काय ? साऱ्या ज्ञात संस्कृती अगदीं अलीकडच्या वाटाव्यात इतक्या पुरातन अज्ञात भूतकाळांतील ही कथा आहे. तिच्या बाबतींत पुरावा








किंवा आधार कोठून सांपडणार ? तेव्हां केवळ कल्पनेवर विसंबून त्या उगमकथेचा शोध घ्यावयास हवा. भूतलावर केव्हां व कोठें ही कथा घडली हें कधीं आपल्याला कळेल ही आशाहि सोडून द्यायला हवी. पण असें कांहींतरी घडलें असावें : एका ठिकाणीं एकजीव असा एक समूह नांदत होता. प्रजा वाढत गेली आणि निर्वाहासाठीं या समूहांतून प्रथम एक मग दोनतीन असे उपसमूह पांगत गेले. अशा रीतीनें एका विस्तृत जानपदांत, समजा, पांच समूह नांदू लागले. या पंचजनांमध्यें एकरक्तसंबंधाचें दृढ नातें होतें पण एकाचे पांच समूह विखुरल्यामुळें जुन्या एकजीवपणाला क्षीणता आली होती. परंतु वणवा, रानटी श्वापदांचे हल्ले, पूर, सांथीचे रोग अशा सामूहिक संकटांना तोंड देण्यासाठीं हे पंचजन पुन:पुन्हां एकत्र येत होते. सूर्य आणि चंद्र यांचीं ग्रहणें यासारखे अनपेक्षित प्रसंग व शरद्-ऋतूंतील पौर्णिमेसारखे प्रसंग या पंचजनांना एकत्र येण्याचे ' पर्व ' काळ होते. नवजात बालकांसाठीं आनंदोत्सव व मृतांसाठीं शोक हे प्रसंगहि सामुदायिक भावनाविष्काराचे क्षण असत.

एकत्र येऊन विखुरलेल्या शक्ती व भावना समृद्ध व दृढ करण्याचे हे प्रसंग या पंचजनांना लाभत असत व या प्रसंगानंतर पुन्हा त्यांची अलग स्वायत्त जीवनरहाटी चालत असे. यांतूनच एका नवनिर्मितीचा पाया घातला गेला. मानवी मन व बुद्धि बाह्याचा आकार घेत असतांनाच त्याला वांछित आकार देण्यासाठीं धडपडत असते. जें प्रसंगवशात् घडत जातें त्याचें आकलन करीत असतांना आपल्या अनुभवाला नवें स्वतःचें कल्पित रूप देण्यांतच मानवाचें सारें सामर्थ्य आहे व ह्या रूपनिर्मितींत त्याच्या संस्कृतीचें व सुखदुःखाचें वैशिष्ट्य आहे.

पंचजनांच्या एकत्रीकरणाचे प्रसंग आपोआप व निरनिराळ्या कारणांनीं येत होते; त्यांना नियमित व संघटित रूप देण्याचें पहिलें पाऊल या पंचजनांतील नेत्यांनीं घेतलें असेल व यांतच मुद्दाम रचलेल्या यज्ञविधीचा उगम आहे. आजचा दसऱ्याचा किंवा दिवाळीचा सण हा असाच एक निर्मित विधि-दिन आहे. किंबहुना, या आजच्या सणांचें मूळ त्या अतिप्राचीन पंचजनांच्या समूहोत्सवांच्या विधिदिनांतच आहे. या विधि-दिनाच्या महोत्सवांत काय ' घडविण्याची ' इच्छा त्या पंचजनांनीं केली असेल ? अर्थात्, या ठिकाणीं मानवी प्रज्ञेमध्यें वास्तवाला नाटयरूपानें रूपसंपन्न करण्याची जी कलात्मकता आहे तिचा विचार केला तर असें दिसेल कीं समूहावरील महान् संकटें व त्यांचें निवारण, तसेंच उत्कट आनंदाचे व शोकाचे प्रसंग आणि नृत्य, गायन, यौवनाचा उल्हास व मीलन इत्यादि सर्व घटकांचा समावेश करणारे एक **महानाटय या विधि-दिनाच्या प्रसंगीं** घडविण्यांत आलें असेल.

या महानाटयाचा किंवा समूहजीवनाच्या नित्य-नैमित्तिक अनुभवांतून उत्कट तेवढें वेंचून रचलेल्या जीवनाच्या या महाकाव्याचा विचार करतांना आपण आजकालचा शिष्टसंस्कृत मानव विसरून समूह-जीवी मानवच डोळयासमोर धरला पाहिजे. त्याच्या जीवनांत नाटय किंवा काव्य ही केवळ अलिप्तपणानें उपभोगण्याची गोष्ट नव्हती; उलट, सर्वांनीं सहभागी होऊन **मूर्त व जिवंत नाटय** घडविण्याची शक्ति त्या मानवसमूहांत होती.

त्या महानाट्यालाच ' यज्ञ ' हें रूप प्राप्त झालें व त्याच्या जिवंत मूर्तीकरणासाठीं यज्ञपुरुष व यज्ञस्त्री या मिथुनाच्या **जीवन-मृत्यूचा प्रत्यक्ष प्रसंग** ही मध्यवर्ती घटना ठरली. यम व यमी हें मिथुन असें यज्ञमिथुन आहे. आणि अशा मिथुनालाच बळिराजा व त्याची महिषी मानून समूहानें शिरोधार्य मानलेलें आढळतें. ज्या समाजांत सर्वजण फक्त स्नेहबंधनानें बांधलेले व समान होते, तेथें यज्ञसंभव असें हें मिथुन समूहाच्या उत्कट आदराचें, प्रेमाचें व

गाढ भक्तीचें स्थान होऊन बसलें. या मिथुनाचें विरहमीलन, जीवनक्रम व अंतिम बलिदान हा सारा विषय समूहाच्या श्रद्धेची व काव्याची प्रेरणा ठरली. आज जगांतील सर्व लहानमोठीं महाकाव्यें म्हणजे यज्ञमिथुनाच्या जीवनमृत्यूवरील उत्कट भक्तिगीतें व शोकगीतें आहेत. राम व सीता, पांडव व द्रौपदी हीं योनिसंभव सामान्य माणसें नसून यज्ञसंभव मिथुनें आहेत. कारण यांच्या कथा म्हणजे प्राचीनतम यज्ञमिथुनाच्या कथांचीच वेगवेगळीं रामायणें व महाभारतें आहेत. राज्याभिषेक, राज्यत्याग, वनवास, असुरांशीं युद्ध ( व नायिकेचें अपहरण झालें असल्यास तिची मुक्तता ), पुन्हा राज्यारोहण व मग गूढ अनाकलनीय तऱ्हेनें नायक व नायिका यांचा देहत्याग हा क्रम कमीजास्त फरकानें जगांतील सर्व महाकाव्यांत आढळून येतो. यावरून वरील उपपत्तीला बळकटी येते व साऱ्या मानवसंस्कृतीचें उगमस्थान आपल्याला या एका यज्ञसंस्थेंत दिसूं लागतें.

## राजदंड, ऐश्वर्य व विषमता

मानवसंस्कृतीचें मूळ यज्ञसंस्थेंत आहे व तीच पहिली समाजसंस्था आहे ही गोष्ट फार संक्षेपानें येथवर मी मांडली. ही उपपत्ति कल्पनेनेंच बसविलेली आहे व तिला शास्त्रीय प्रमेयाचेंहि महत्त्व नाहीं. सिद्धान्तरूपानें तिचें समर्थन करण्याइतका पुरावा तर कधींकाळीं मिळेल अशी आशा करणें कठीण आहे. परंतु, ही उपपत्ति मानली तर कांहीं प्रश्न सुटतात असें मला वाटतें. उदाहरणार्थ, राजदंडाच्या उद्भवाचा प्रश्न घ्या. एकजीव अशा समूहजीवनांत तीनचार लाख वर्षें रुळलेल्या मानवसमाजानें आपल्या डोक्यावर राजा, पुरोहित व क्षत्रिय यांची सत्ता कशी बसूं दिली ? याचें उत्तर देतांना केवळ मूठभर व्यक्तींनीं समाजाला फसवून किंवा जरब दाखवून सत्तेचें जोखड त्याच्या मानेवर ठेवलें ही गोष्ट अगदीं असंभाव्य वाटतें. मग काय झालें असावें ? तर समूहमनाला प्रिय, श्रेष्ठ व तारणकर्ता वाटणारा, यज्ञांत स्वतःचें बलिदान करणारा, यज्ञपुरुषच राजदंडाचा अधिकारी झाला असावा व त्याच्याच बरोबर यज्ञाचें मार्गदर्शन व रक्षण करणारे लोक ब्राह्मण व क्षत्रिय म्हणून समाजानें शिरोधार्य मानले असावेत.

परंतु, एकदां एकजीव वर्गरहित समाजांत ही संस्था निर्माण झाल्यावर पुढचा तिचा इतिहास मोठा भीषण आहे. कारण हाच खाजगी मालमत्ता, सिंहासनें व वर्णवर्चस्व यांसाठीं घडलेला रक्तपाताचा इतिहास आहे. सर्व भूमि समूहाची होती तेव्हां आपसांतील रक्तपाताचें कारण नव्हतें; पण प्रथम यज्ञभूमीचें क्षेत्र अलग पडलें व त्यावर यज्ञपुरुष व त्याचे पुरोहित व रक्षक यांचें स्वामित्व स्थापन झालें. यज्ञभूमीच्या पावित्र्याचें संरक्षक कवच धारण करणाऱ्या या नव्या स्वामित्वाची भूक वाढत गेली व ऐश्वर्य सांठत गेलें. समूहजीवनाची रूढ श्रद्धा अढळ राहिली व ऐश्वर्याचा दिमाख वाढत गेला. ही क्रिया हजारों वर्षें चालत राहिल्यानंतर आज ज्ञात असलेले ईजिप्तचे पिरॅमिड बांधणारे राजे, वेदमंत्रांची संहिता करणारे ऋषी व इतर प्राचीन सुसंस्कृत समाज क्षितिजावर आले.

## यज्ञाचें ' पुनरुज्जीवन '

समूहजीवनाच्या ' संभरणा'साठीं यज्ञपुरुषानें केलेल्या बलिदानामुळें श्रद्धेय व पवित्र झालेला यज्ञ हाच पुढें राजदंड, वर्गवर्चस्व आणि खाजगी मालमत्ता या भयंकर संस्थांचें उगमस्थान बनला. या संस्थांच्या विकासाला यज्ञाचें पवित्र कवच नुसतें उपयोगी पडलें असें नव्हे तर त्याच्या अभावीं त्या निर्माणहि झाल्या नसत्या. बलिदानाच्या पवित्र व

---

१ या विषयाचें विस्तृत विवेचन करणारा प्रबंध सन १९५० च्या प्राच्यविद्या परिषदेपुढें मी मांडला होता व तो भांडारकर प्रा. वि. सं. मंदिराच्या पत्रिकेंत Vo. 31, 1950 या अंकांत आहे.



अनुक्रमणिका






उदात्त कर्मांतून आजची सर्व हिंसा व अनीति जन्म पावली व अजस्र रूप घेऊं शकली हें दृश्य जितकें विस्मयकारक आहे तितकेंच दुःखदायक आहे. पण ज्या मंथनांतून अमृत निघावें त्यांतूनच हालाहल निघावें असाच मानवी कर्तृत्वाला शाप आहे असें आजवरच्या सांस्कृतिक इतिहासावरून दिसतें. आजच्या अणुशक्तीचें सर्वसंहारक रूपहि विज्ञानाच्या पवित्र ज्ञानमंथनांतून निर्माण झालेलें दिसत नाहीं काय ?

अर्थात् अमृताबरोबर हालाहल निर्माण होणें हा कांहीं अटळ नैसर्गिक नियम नव्हे. मानवी मनांत शुद्ध व दुष्ट, उदात्त व हीन, मंगल व हिंस्र अशा द्वंद्वांचें कायमचें अस्तित्व असल्यानें प्रगतीचा मार्ग असा रक्तमय होत जातो एवढाच निष्कर्ष आजपर्यंतच्या या इतिहासावरून निघतो. तसेंच, मनुष्यसमाजानें आजवरचा हा रक्तलांछित भूतकाळ समजावून घेतला व हिंस्र प्रवृत्तींवर मात केली तर पुन्हा एकदां यज्ञसंस्थेचें मूळ अविकृत रूप निर्माण करतां येईल; यज्ञसंस्थेला जन्म देणारी राजदंडहीन, वर्गवैषम्यरहित व उत्पादनसाधनांच्या सामूहिक मालकीमुळें आजच्या अनर्थांना टाळून सर्वांना समृद्धीचा लाभ करून देणारी समाजरचना मानवाला पुन्हा निर्माण करतां येईल. यज्ञसंस्थेचें पुनरुज्जीवन या अर्थानें मानवाला करतां येईल व तें जर साधलें तरच आज मानवजात जगूं शकेल.

## समाजक्रांतीचा 'प्रजासूय' यज्ञ

अर्थात्, मूळ यज्ञसंस्थेला जन्म देणारें प्राचीन समूहजीवन आज जसेंच्या तसें पुन्हा निर्माण होणार नाहीं हें खरें, कारण अशी नुसती पुनरावृत्ति इतिहासांत कधीं घडत नाहीं. परंतु, आज समाजक्रांतीच्या अग्निदिव्यांतून जर मानवजातीनें आपला कायाकल्प करून घेतला तर विज्ञानानें समृद्ध होऊं शकणारें व पांचीं खंडांतील कोट्यवधी मानवांना एका भ्रातृभावाच्या स्नेहबंधनानें एकत्र आणणारें विश्वकुटुंब निर्माण होऊं शकेल. ही समाजक्रांति म्हणजे एक महान् यज्ञच असून विनोबाजींनीं यालाच 'प्राजासूय' यज्ञ असें म्हटलें असावें. या यज्ञामुळें आपण जगाच्या ज्ञानाचें व समृद्धीचें 'दान' म्हणजे सर्वकल्याणकारी वांटणी करूं शकूं. जिला आजवर आपण 'संस्कृति' 'संस्कृति' म्हणत आलों आहोंत तिचें या 'प्रजासूय' यज्ञांत हवन करून आपण मानवसंस्कृतीच्या खऱ्या उज्ज्वल इतिहासाचा प्रारंभ करूं शकूं. वर्गरहित विश्वकुटुंबी मानवसमाज नांदू लागला म्हणजे खरा मानवी इतिहास सुरूं झाला असें मानावें लागेल, असें साम्यवादाच्या प्रवर्तकानें कार्ल मार्क्सनें म्हटलें आहे, तें याच अभिप्रायानें. या नव्या इतिहासाची नांदी राष्ट्राराष्ट्रांतील शेजारधर्मावर, पंचशीलांच्या समंजस तत्त्वांवर, घडविली जात आहे असें मोठ्या आशेनें आज आपण म्हणूं शकत आहोंत. या समंजसपणानें आपलें अंतर्गत आर्थिक, राजकीय, सामाजिक, भाषिक व इतर प्रश्न सुटूं शकतील काय ? तसे ते सुटावेत यासाठीं भूदानयज्ञाचा प्रयोग आहे. त्याला यश येणें किंवा अपयश येणें ही गोष्ट अनेक घटकांवर अवलंबून आहे व कांहींहि झालें तरी समाजक्रांतीची, किंवा 'प्रजासूय' यज्ञाची पूर्तता मात्र आतां झाल्याशिवाय राहणार नाहीं; असा अंतःसामर्थ्याचा प्रत्यय सर्व राष्ट्रांतील जनतेच्या अंतरंगांत आतां येऊं लागलेला आहे. प्राचीनतम यज्ञांत जनतेसाठीं जीवनाचें बलिदान करणाऱ्या यज्ञपुरुषाचें व यज्ञस्त्रीचें कृतज्ञतापूर्वक स्मरण आज आपण केलें तर आपल्यापुढील या बिकट समाजक्रांतीच्या प्रयत्नांत आपल्याला एका पुरातन त्यागपरंपरेचा आदर्श लाभेल व मानवी हृदयांतील अपरंपार सामर्थ्यावरील आपला विश्वास दृढतर होईल या आशेनें हा विषय इतक्या संक्षेपानें वाचकांपुढें मांडण्याचें धाडस मी केलें आहे.










चर्चा

# भूदान-आंदोलन : तत्त्वज्ञान ध्येय व कार्यपद्धति

[ ' भूदान-आंदोलन : तत्त्वज्ञान, ध्येय व कार्यपद्धति ' या शीर्षकाखालीं प्रा. ना. अ. मावळंकर व प्रा. मा. दि. कानेटकर यांचा लेख याच अंकांत आला आहे. या लेखांत लेखकांनीं भूदान-आंदोलनासंबंधीं कांहीं मूलगामी तात्त्विक शंका घेतल्या आहेत. त्यांनीं उद्‌भूत केलेल्या मुद्द्यांवर चर्चा झाल्यास, भूदान-आंदोलनामागील विचारसरणी स्पष्ट होण्यास व त्या आंदोलनाकडे जागरूकपणें बघण्यास मदतच होईल या अपेक्षेनें, या लेखांतील मुख्य मुद्द्यांसंबंधीं आपलीं मतें संक्षेपानें व्यक्त करण्यास कांहीं लेखकांस विनंति केली. त्यांपैकीं आचार्य शं. द. जावडेकर, प्रा. गोवर्धन पारीख व श्री. ह. कृ. मोहनी यांनीं लेखांतील मुद्द्यांसंबंधीं संक्षिप्तपणें चर्चा केली आहे, ती पुढें दिली आहे. प्रा. मावळंकर व प्रा. मा. दि. कानेटकर यांच्या मूळ लेखाच्या निमित्तानें ही चर्चा आहे. या चर्चेसंबंधीं आपली प्रतिक्रिया प्रा. मावळंकर व प्रा. मा. दि. कानेटकर यांनीं कळविलेली या चर्चेच्या शेवटीं दिली आहे. कां. सं. ]

आ. शं. द. जावडेकर

## नव्या अधिष्ठानावर स्वावलंबी, स्वयंपूर्ण ग्रामराज्यें

या भूदानविशेषांकांत प्राध्यापक मावळंकर व कानेटकर यांचा भूदानआंदोलनाचें तत्त्वज्ञान, ध्येय व कार्यपद्धति यासंबंधी एक लेख आलेला आहे. या लेखांत या आंदोलनासंबंधी कांहीं शंका उपस्थित करून लेखकांनीं त्यांची चर्चा केली आहे. या चर्चें-तून त्यांनीं असा निष्कर्ष काढला आहे कीं या आंदोलनाचें साध्य व साधनें जरी वरकरणी निरप-वाद दिसत असलीं तरी त्याच्या तत्त्वज्ञानांत एक भावनेला आवाहन करणारी घोषणा याच्यापलीकडे विशेष कांहीं नाहीं. तसेंच जी सामाजिक क्रांति करण्यासाठीं म्हणून भूदान-आंदोलन हें साधन बन-विण्यांत आलें आहे तें साधन इतकें अव्यवहार्य आहे कीं आजच्या समाजांतील सर्वसामान्य व्यक्तीं-ना तें पेलण्यासारखें नाहीं. यामुळें या आंदोलनाला १९५७ सालपर्यंत जें फल येईल अशी अपेक्षा आहे तें आधीं येणारच नाहीं. जरी तसें फळ आलें तरी त्यापासून समाजाची प्रगति न होतां पीछेहाटच होईल. ही पीछेहाट होतांना भांडवलशाहीखालीं झालेली समाजाची प्रगति नष्ट होईल व समाज मध्ययुगांत लोटला जाईल. अशी पीछेहाट होत असतांना समाजानें शेंदोनशें वर्षें श्रम करून व भांडवल वेंचून प्रगतीची जीं साधनें निर्माण केलीं आहेत तीं सर्व निरुपयोगी ठरून नाश पावतील. कारण या आंदोलनाला अभिप्रेत असणाऱ्या ग्रामराज्यांच्या अमदानींत आजच्या समाजांतील दळणवळणाचीं साधनें व मोठमोठे कारखाने यांचा कांहींच उपयोग उरणार नाहीं. अशा रीतीनें हें आंदोलन समाजा-ची पीछेहाट करणारें व त्याचें अनहित करणारें ठरणार आहे.

वरील निष्कर्ष ज्या शंका उपस्थित करून व जी विचारसरणी अवलंबून काढण्यांत आला आहे त्या शंकांचें व विचारसरणीचें माझ्या दृष्टीनें निरसन पुढीलप्रमाणें शंका व उत्तर या रूपानें करण्याचा मी प्रयत्न करीत आहे.








शंका:– तुमचें हें भूदान-आंदोलन कशासाठीं आहे व त्याचें साध्य सिद्ध करण्याचें तुमचें साधन कोणतें ?

उत्तर:– सामाजिक क्रांति घडवून आणून वर्ग-विहीन समाज निर्माण करणें हें आमचें साध्य आहे व त्यासाठीं भूमिदान, संपत्तिदान, श्रमदान आणि जीवनदान हीं आमचीं साधनें आहेत. आमचे साध्य व आमचीं साधनें हीं सर्वमान्य होण्याजोगीं असून तीं निरपवाद आहेत. यामुळें हें आंदोलन एक-सारखें वाढत जाऊन त्यांतून संपत्तीचें सामाजिक स्वामित्व आणि वर्गविहीन आर्थिक घटना यांच्या आधारांवर नवसमाज निर्माण होईल अशी आमची निष्ठा आहे. या निष्ठेनें प्रेरित होऊन आम्ही १९५७ सालापर्यंत पांच कोटी एकर जमीन जमीन-मालकांकडून मिळवून ती भूमिहीन बेकारांना वाटून देण्याचें पहिलें कार्य हातीं घेतलें आहे. क्रांतीची ही पहिली पायरी आहे आणि तिच्या-वर चढून जाण्यांत जर समाजाला यश मिळालें तर आमचा विश्वास वाढेल व समाजाला पुढील मार्ग दिसूं लागेल. पायरीपायरीनें क्रांतीच्या शिखरावर चढण्याची ही मोहीम असल्यामुळें तिला आंदोलन म्हणण्यापेक्षां आरोहण हें नांव अधिक साजेल असें विनोबा म्हणतात.

शंका:— तुमचें साध्य व साधनें जर इतकीं निरपवाद व सर्वमान्य होण्यासारखीं आहेत तर तुम्हांला इतका प्रचार करण्याची काय गरज आहे ? इतका प्रचार करूनहि तुम्ही आतांपर्यंत फक्त ३५।३६ लक्ष एकर जमीन मिळविली आहे. तेव्हां तुम्हाला १९५७ सालापर्यंत पांच कोटी एकर जमीन मिळणें वाटतें तितकें सोपें नाहीं. तें कां सोपें नाहीं तें पहा : समाजांत असामान्य विभूतीसारखे जे अना-सक्त सत्पुरुष असतील त्यांना तुमच्या प्रचा-राची कांहींच गरज नाहीं. ते आधींच भूमि व संपत्ति यांच्या पाशांतून मुक्त झालेले आहेत. तेव्हां त्यांच्याकडे जाऊन तुम्ही काय प्रचार करणार ? जे स्थितप्रज्ञ किंवा मुक्त नाहींत पण जे संपत्तीवर किंवा जमीनीवर अनुरक्त आहेत ते तुमच्या प्रचारानें भूमि किंवा संपत्ति यांचें दान कर-ण्यास तयार होणार नाहींत व त्यांच्या दृष्टीनें तें योग्यच आहे. आजच्या समाजाची सर्व उभारणी भूमीच्या व संपत्तीच्या खाजगी स्वामित्वावर झालेली असल्यामुळें व अशा स्वामित्वामुळेंच प्रत्येकास थोडीफार शाश्वती व प्रतिष्ठा आज लाभूं शकते. ही लाभलेली शाश्वती व प्रतिष्ठा हातची सोडून तुमच्या उपदेशाप्रमाणें त्यांनीं भूदान व संपत्तिदान करण्यास उद्युक्त होणें म्हणजे हातचें सोडून पळत्याच्या मागें लागण्यासारखा मूर्खपणा आहे हें त्यांना समजतें. जर आज आपणाला लाभलेली थोडीफार शाश्वती व प्रतिष्ठा नवा समाज प्राप्त करून देणार असेल तर ते भूमिदान व संपत्तिदान करण्यास तयार होतील पण त्याच्या आधीं तसा समाज निर्माण होण्यापूर्वीं 'तुम्ही भूमिदान व संपत्तिदान करा म्हणाल' तर ते तसें करणार नाहींत. तेव्हां आपला प्रचार कमी आहे म्हणून आपणाला यश येत नाहीं या भ्रमांत तुम्ही राहूं नका. तो प्रचार कितीहि असला तरी आजच्या समाजांतील सामान्य व्यक्ती तुमच्या प्रचाराच्या जाळ्यांत सांपडणार नाहींत. सामान्य माणसाच्या कुवतीला न झेपणारें असें तुमचें साधन आहे. असें असल्यामुळें तुम्हांस ५७ सालापर्यंत अपेक्षित यश येणार नाहीं.

उत्तर:– आम्हाला आमचा प्रचार जे स्थितप्रज्ञ आहेत व जे अनुरक्त आहेत अशा दोनहि प्रकारच्या लोकांत करावयाचा आहे. जे स्थितप्रज्ञ आहेत व ज्यांची आसक्ति सुटलेली आहे त्यांना आम्ही सांगतों कीं जे सामान्य लोक जमिनीच्या व संपत्ती-च्या आसक्तींत गुंगून जाऊन घोरत पडले आहेत त्यांना जागे करा व सांगा कीं आतां जर तुम्ही खाजगी संपत्ति व खाजगी जमिनी यांच्या मोहांतून







मुक्त होऊन सामाजिक स्वामित्वावर उभारलेला नवसमाज निर्माण केला नाहीं तर हा संपत्तीचा व जमिनीच्या स्वामित्वाचा मोह तुमचा घात केल्याशिवाय राहणार नाहीं. समाजरचनेंत ही आमूलाग्र क्रांति घडून आली नाहीं तर समाज जिवंतच राहणार नाहीं अशी क्रांतिकारक अवस्था आज प्राप्त झाली आहे. सर्व स्थितप्रज्ञांनीं यावेळीं ही सामाजिक क्रांति घडवून आणण्याच्या कामीं आपलें जीवनदान केलें पाहिजे. ही जागृति करण्याचें क्रांतिकार्य सर्व स्थितप्रज्ञ करूं लागतील तर अपरिहार्य असलेली सामाजिक क्रांति अहिंसेनें घडून येईल, असा प्रचार आम्ही जे स्थितप्रज्ञ आहेत त्यांच्याकडे जाऊन करीत असतों.

याच्या उलट, जे संपत्तीच्या व जमिनीच्या मोहांत गुरफटून शाश्वतीच्या भ्रमांत घोरत पडले आहेत त्यांना आम्ही असें सांगतों कीं तुम्हांला यापुढें या स्वामित्वाच्या हक्कांतून शाश्वती व सुख मिळणें अशक्य आहे. आतां क्रांतिकाळ आलेला आहे. आतां जुन्या घरांत झोंपाल तर त्या घराबरोबर तुमचीं शरीरेंहि भस्मसात् होतील. वडिलार्जित घराला आतां आग लागलेली आहे. त्यांत घोरत पडल्यानें तुम्हाला व तुमच्या मुलाबाळांना सुख व शाश्वती लाभेल असा भ्रम धरूं नका. जागे होऊन खाजगी स्वामित्व विसर्जन करून सामाजिक स्वामित्वाच्या पायावर नव्या समाजाची उभारणी करा. आजपर्यंत या संपत्तीच्या स्वामित्वाला जे बिलगून राहिले ते मुक्त झाले नाहींत तरी जगूं शकत होते. त्यांचें भौतिक जीवन थोडेंतरी सुरक्षित होतें. पण आज या खाजगी स्वामित्वामुळें समाजाच्या भौतिक जीवनालाच धोका उत्पन्न झाला आहे. हा क्रांतिकाळ आहे व या काळांत जे आपल्या स्वामित्वाला कवटाळून शाश्वती व सुख लाभेल अशी आशा बाळगून राहतील ते व्यवहारशून्य व मूर्ख ठरणार आहेत. धनिकांची सामाजिक प्रतिष्ठा आज नष्ट झालेली असून धनिक हे चोर आहेत असा आवाज जगभर घुमूं लागला आहे. केवळ धनिकच चोर आहेत असें नव्हे तर त्यांच्या मालकी हक्काचें संरक्षण करणारे वकील, न्यायाधीश व सरकारें यांचासुद्धां अंतर्भाव त्याच वर्गांत होतो असें सांगण्यापर्यंत विनोबांच्या प्रचाराची मर्यादा गेलेली आहे. यामुळें धनिक व निर्धन या दोनहि वर्गांत एक नवी दृष्टि निर्माण होऊन अपूर्व जागृति होत आहे. अशा क्रांतिकालांत समाजांतील सामान्य व्यक्तींना शाश्वती व सुख यांचा लाभ होऊं शकत नाहीं असा अनुभव येत असल्यामुळें ज्यांना तुम्ही सामान्यजन समजतां तेहि फार मोठ्या प्रमाणावर स्वार्थत्याग करण्यास तयार होतात. जोंपर्यंत प्रस्थापित समाजरचना सुस्थिर व चिरंतन टिकणारी आहे असा अनुभव येत असतो व सर्वांची जीवितयात्रा सुखानें चालू असते तोंपर्यंत सामान्य मनुष्यें संपत्तीच्या व भौतिकसुखाच्या पाशांत गुंतून स्वार्थत्यागास तयार होत नाहींत. पण आतां तशी स्थिति उरलेली नाहीं. भांडवलदारी समाजरचना सर्वत्र पसरत जाणारी बेकारी, विषमता आणि अशाश्वती यांचा अंत करूं शकत नाहीं याचा अनुभव आल्यामुळें समाजवादी आर्थिक रचना आणि ग्रामोद्योगांची संघटना यांच्यावांचून बहुजनसमाजाचे प्रश्न सुटूं शकत नाहींत असें आपलें सरकारहि म्हणूं लागलें आहे. हा सुद्धां आमच्या आंदोलनाचाच एक प्रभाव आहे. जर अहिंसक क्रांतीनें मालकी हक्क खाजगी व्यक्तींकडून काढून ते समाजाकडे देतां आले नाहींत तर ही क्रांति कायद्यानें किंवा हिंसक क्रांतीच्या मार्गानें झाल्यावांचून रहात नाहीं याचीहि जाणीव सर्वसामान्य मनुष्यांना आतां होऊं लागली आहे. अशा रीतीनें मालकी हक्काविरुद्ध आकाशच फाटलें असल्यामुळें धनिकवर्ग भूदान-आंदोलनाला थोडेंफार साहाय्य करून आपली प्रतिष्ठा कायम








करील आणि त्यामुळें भांडवलशाही समाज चिरंजीव होईल असा धोकाहि आतां उरलेला नाहीं. तो धोका लक्षांत घेऊनच आचार्य विनोबा यांनीं आपल्या भूदान-यज्ञाचें ध्येय व साध्य आर्थिक क्रांति हें आहे व ती क्रांति अहिंसेनें घडवून आणणें हेंच आपलें वैशिष्ट्य आहे असा प्रचार धूमधडाक्यानें चालू केला आहे. कोणाकडूनहि भूदान व संपत्तिदानपत्र स्वीकारतांना त्यांना आर्थिक क्रांतीची बरोबर कल्पना दिली पाहिजे असा त्यांचा प्रचारकांना आदेश आहे.

शंका:— म्हणजे तुम्ही भांडवलदारांना वांचविण्यासाठीं व त्यांचें हित करण्यासाठीं हें आंदोलन सुरू केलें आहे असें आमच्यासारख्या व्यक्तींनीं किंवा शेतकरी-कामगारांनीं मानिलें तर तुमचा त्यास विरोध असतां कामा नये.

उत्तर:— आम्ही भांडवलदार व्यक्ती आणि शेतकरी-कामकरी या सर्वांचाच उद्धार व्हावा आणि शेतकरी-कामकऱ्यांनीं भांडवलदार व जमीनदारांची हिंसा करून आपला उद्धार होईल अशा भ्रमांत राहूं नये, हाहि प्रचार आम्ही करीत असतों. आम्ही सर्वोदयवादी व निर्भेळ सत्याग्रही आहोंत. आमच्या मार्गानें भांडवलदार व कामकरी, तसेंच जमीनदार व शेतकरी हे चालूं लागतील तर केवळ वर्गहीन समाज निर्माण होईल इतकेंच नाहीं तर शासनमुक्त समाजाचा मार्गहि स्पष्ट दिसूं लागेल. हिंसेच्या मार्गानें क्रांति झाल्यास बहुजनसमाजाचे पाय एका खोड्यांतून निघून दुसऱ्या खोड्यांत अडकले जातात असा अनुभव इतर देशांतील क्रांत्यांवरून येत आहे. हीहि गोष्ट आम्ही आमच्या प्रचारानें लोकांच्या निदर्शनास आणतों.

शंका:– मग तुम्हाला अद्यापि फक्त ३५।३६ लक्ष एकर जमीनच कां मिळाली ? अशा वेगानें ५ कोटी एकर जमीन मिळण्यास किती वर्षें लागतील ? या अनुभवावरून तुमचें कांहीं चुकत आहे असें तुम्हांस वाटत नाहीं काय ? कीं अनुभवावरून बोध घ्यावा हें तत्त्वच तुम्हांस मान्य नाहीं. अनुभवानें पडताळा आला नाहीं तर केवळ अधिक प्रचार करा ही भाषा तुम्ही किती दिवस वापरणार ?

उत्तर:— अनुभवावरून बोध घ्यावा हें तत्त्व मान्य करूनच आम्ही १९५७ सालपर्यंत आजच्या मार्गानें जावयाचें असें ठरविलें असून या मुदतीच्या अखेरीस आलेल्या अनुभवावरून कोणता बोध घेतां येईल त्याचा विचार करणें यालाच आम्ही शास्त्रीय पद्धति समजतों. दर दिवशीं अनुभवाचा आढावा घेऊन त्यावरून बोध घेणें व रोज नवें धोरण आंखणें बरोबर नाहीं. म्हणून आपल्यासारख्यांनीं इतक्यांतच लोकांचा बुद्धिभेद न करितां या क्रांतिकारक आंदोलनाचें स्वरूप समजून घेऊन १९५७ सालापर्यंत आम्हांस म्हणजे आमच्या कार्यास साहाय्य करावें. म्हणजे पुढें अनुभवाचा आढावा घेऊन नवें धोरण आंखतांना आपल्या विचारांना साहजिकच अधिक महत्त्व प्राप्त होईल. मग आपण आमच्या कार्यास १९५७ सालपर्यंत प्रचाराचें साहाय्य कां करूं नये ? वर्गहीन समाज आणि संपत्तीचें सामाजिक स्वामित्व हीं साध्यें आपणांस संमत आहेत ना ? ही क्रांति घडवून आणण्याचा प्रचार करणेंहि आपलें एक कर्तव्यच आहे.

शंका:—

पण या क्रांतीचें नेतृत्व ग्रामराज्यें स्थापन करावीत असें ज्यांचें मत आहे त्यांच्याकडे असल्यामुळें आम्हांस या आंदोलनास साहाय्य करतां येणार नाहीं. कारण, वर्गहीन समाज स्थापन झाला तरी ग्रामराज्यांमुळें हा समाज मध्ययुगीन बनेल आणि औद्योगिक क्रांतीनें घडून आलेली प्रगति नष्ट होईल. तसेंच ही प्रगति करण्यासाठीं जीं साधनें उत्पादनासाठीं व दळणवळणासाठीं निर्माण झालीं तीं सर्व साधनें नाश पावून समाजाचें भयंकर आर्थिक नुकसान होईल. म्हणून तुमचा प्रचार यशस्वी








झाला तरी तें यश आम्हांस नको आहे. कारण त्या यशामुळें समाजाची प्रगति नष्ट होऊन परागति होणार आहे.

उत्तर:—

आम्ही जीं ग्रामराज्यें निर्माण करणार आहोंत तीं ग्रामराज्यें सर्व समाजाच्या संमतीनें केवळ बहुमतानेंच नव्हें तर सर्वानुमतें करणार आहोंत. अर्थात् ज्याच्यामुळें समाजाची प्रगति नष्ट होईल आणि सर्वांना बेकार व दरिद्री बनावें लागेल अशीं तीं राज्यें असूं शकणार नाहींत हें उघड आहे. सर्वांना उद्योग मिळावा, सर्वांना समान दर्जा व स्वातंत्र्य यांचा उपभोग मिळावा, सामाजिक किंवा आर्थिक वर्गभेद असूं नयेत, जमीन व इतर साधन-संपत्ति समाईक बनून सर्वांना आपापल्या गरजा भागविण्याइतका संपत्तीचा उपभोग घेतां यावा, राजकीय, सामाजिक व आर्थिक दास्य नष्ट व्हावें अशींहि स्वावलंबी आणि अन्नवस्त्रादि आवश्यक गरजांच्या बाबतींत स्वयंपूर्ण ग्रामराज्यें निर्माण करणें असें आमचें ध्येय आहे. अशा राज्यांना मध्ययुगीन असें नांव देऊन आपण असें सुचवीत अहां कीं मध्ययुगांतील ग्रामराज्यें अशा प्रकारें समत्व, बंधुत्व आणि स्वातंत्र्य या तत्त्वांवर चालणारीं सर्वोदयवादीं ग्रामराज्यें होतीं. तीं तशीं असतीं तर त्यांना भांडवलशाही व साम्राज्यशाही यांच्यापुढें हार खाऊन नष्ट व्हावेंच लागलें नसतें. आम्हांस आधुनिक युगांत झालेली प्रगति नष्ट करावयाची नाहीं. वैज्ञानिक प्रगति, लोकशाहीचें राजकारण आणि समाजवादी अर्थघटना यांचा नाश न करितां पण त्यांतील दोष नष्ट करून आम्हांस नव्या समाजाची रचना करावयाची आहे. या कामीं वैज्ञानिक संशोधन, नैसर्गिक शक्ति, यंत्रकला आणि सामाजिक, आर्थिक व राजकीय इत्यादि सर्व व्यवहारांत समत्व, बंधुत्व आणि स्वातंत्र्य यांचा अवलंब या नव्या अधिष्ठानांवरच आमचीं स्वावलंबीं व स्वयंपूर्ण ग्रामराज्यें निर्माण करण्यांत येतील. असें आम्ही करूं तरच आधुनिक भारतांतील जनतेला तीं आकर्षक व स्पृहणीय वाटतील. नाहींतर समाज आमच्या मागून येणारच नाहीं. ग्रामराज्यें आणि ग्रामोद्योग हे शब्द उच्चारल्याबरोबर आम्ही आंधळेपणानें मध्ययुगांत उडी घेणार आहोंत असा आपला गैरसमज करून घेऊं नका.

---

प्रा. गोवर्धन पारीख

## क्रान्ति माणसेंच घडवून आणतात

प्रा. मावळंकर आणि प्रा. कानिटकर यांनीं आपल्या लेखांत भूदान-आंदोलनाविषयीं घेतलेले आक्षेप पुढीलप्रमाणें थोडक्यांत मांडतां येतील :

(१) " भूदान-चळवळींत अभिप्रेत असलेलीं साध्य आणि साधनें सर्वसंमत आहेत " असें म्हटलें जातें. यामुळें या आंदोलनाची प्रगति मंद गतीनें कां व्हावी असा प्रश्न साहजिकच उभा रहातो. विचार व कृति यांतील हें महदंतर मनुष्याच्या दांभिकतेमुळें निर्माण होतें असें म्हणतां येत नाहीं. खरें कारण आंदोलनाच्या एकांगी दृष्टिकोणांतच आढळतें. ज्या प्रत्यक्ष सामाजिक परिस्थितींत शेंकडा ९५ टक्के लोकांचे मनोव्यापार निश्चित होतात त्या परिस्थितीची दखल आंदोलनांत घेतली जात नाहीं. यामुळें कांहीं थोर, नीतिमान् पुरुषांचा वा " स्थितप्रज्ञांचा " अपवाद वगळल्यास इतरांच्या बाबतींत भूमिदान ही नैतिक आचरणाची, कर्माकर्मविवेकाची कसोटी होऊं शकत नाहीं.

(२) भूदान-आंदोलनाची कार्यपद्धति प्रस्थापित अर्थव्यवस्थेच्या चौकटीस हात लावीत नाहीं. ती चौकट कायमच रहाते. किंबहुना, या आंदोलनामुळें ती अधिकच भक्कम होण्याचा संभव आहे. ही कार्यपद्धति प्रतिगामी ठरेलसें वाटतें.









अनुक्रमणिका

( ३ ) ग्रामराज्याचें ध्येय व त्यांत अंतर्भूत झालेली ग्रामोद्योगाची कल्पना यांच्या योगानें "उत्पादन-क्षेत्रांत प्रतिक्रांति" घडून येण्याचा संभव आहे.

( ४ ) "सामान्य मनुष्य हा समाजाचा एक घटक असल्यामुळें त्याचीं मूल्यें व निष्ठा भोंवतालच्या समाजव्यवस्थेतूनच निर्माण झालेल्या असतात. कोणत्याहि समाजव्यवस्थेचें स्वरूप हें परिणामीं त्यांतील अर्थव्यवस्थेवर अवलंबून असल्यामुळें मानवांत बदल घडविणें याचा खरा अर्थ समाजरचनाच बदलणें असाच आहे. एरवीं सत्याग्रहादि साधनांनीं झालेला बदल हा केवळ तात्कालिक आणि गौण, वरवरचा ठरेल, मौलिक रचनेमध्यें नव्हे." तात्पर्य, भूदान ही एक भावनांना आवाहन करणारी घोषणा आहे. इष्ट व मान्य असलेल्या ध्येयाकडे जाण्याचा तोच एक मार्ग आहे हा आग्रह योग्य नव्हे.

प्रस्तुत टीकेला उत्तर देण्याचें कार्य आंदोलनाचे नेते, कार्यकर्ते वा पुरस्कर्ते करतीलच. इतरांना त्यांत पडण्याचें कारण नाहीं. परंतु टीकेचें स्वरूप पाहतां तिच्या संबंधानें वेगळें लिहिणें शक्य व आवश्यक वाटतें. आंदोलनाची तात्त्विक बैठक मान्य करून त्याच्या विचारसरणींतील व कार्यपद्धतींतील अंतर्गत सुसंगति तपासून पहाणारी ही टीका नव्हे; तिची तात्त्विक बैठकच भिन्न आहे हें शेवटच्या मुद्द्यावरून स्पष्ट होतें; आणि हीच गोष्ट इतर मुद्द्यांतहि प्रकट झाली आहे. "तुमची मुळांतील भूमिकाच आम्हांला मान्य नाहीं" असें म्हणून एकमेकांचें म्हणणें निकालांत काढणें अशा प्रकारच्या टीकेंत शक्य असतें. परंतु तो मार्ग सत्यान्वेषणाच्या दृष्टीनें योग्य नाहीं. याकरितां या तात्त्विक बैठकीचाच थोडक्यांत परामर्श घेणें आवश्यक आहे.

प्राध्यापकद्वयांच्या लेखनाची तात्त्विक बैठक मार्क्सवादाची आहे हें उघड आहे. ह्या बैठकीवरूनच त्यांनीं मांडलेले विचार तपासून पहावयास हरकत नाहीं. या बैठकीच्या आधारें त्यांनीं लावलेला "माणूस बदलण्याच्या" कल्पनेचा अर्थ ठीक आहे. पण समाजरचनेंतील हा बदल घडवून आणण्यासाठीं माणसें प्रथम बदलावींच लागतात असें मार्क्सवादच सांगतो. ज्याचा प्रस्थापित अर्थव्यवस्थेंत कोणताहि हितसंबंध गुतलेला नाहीं असा कामगारवर्ग देखील आपण होऊन नव्या रचनेची आवश्यकता स्वीकारीत नाहीं; तो फक्त ट्रेड युनियन्सच्या मार्गापर्यंतच जाऊं शकतो असें लेनिनचें मत असल्याचें प्रसिद्ध आहे. प्रस्थापित अर्थव्यवस्थेंत ज्यांचे हितसंबंध गुंतले आहेत अशांचा बदलहि मार्क्सवादानें "Declassed Intellectuals" त्याग केलेला बुद्धिवादी वर्ग या कल्पनेनें मान्य केला आहे. उलट, अशा प्रकारचीं माणसें निर्माण न झाल्यास प्रस्थापित अर्थव्यवस्था कायमची अस्तित्वांत राहूं शकेल असा संभव मार्क्सवाद सांगतो. तात्पर्य सामाजिक परिस्थितीमुळें समाजरचना बदलत नाहीं; ती बदलण्यासाठीं "भोंवतालच्या समाजव्यवस्थेंतून निर्माण होणाऱ्या मूल्यांचा" त्याग करावयास सिद्ध झालेलीं माणसें निर्माण व्हावीं लागतात, तींच समाजव्यवस्थेंत बदल घडवून आणण्याचे प्रयत्न हातीं घेतात आणि उरलेल्या माणसांनाहि अधिकाधिक संख्येनें बदलूं शकतात; असाच निष्कर्ष वरील विवेचनावरून निघतो. क्रांति माणसच घडवून आणतात. त्यांच्या इच्छाशक्तीचाच तो परिपाक असल्यामुळें ती एक आत्मनिष्ठ (Subjective) घटना आहे असेंहि म्हणतां येतें. त्यासाठीं भोंवतालच्या परिस्थितींतून प्राप्त होणाऱ्या मूल्यांपासून मुक्त झालेलीं किंवा त्या मूल्यांचा त्याग केलेलीं माणसें निर्माण होणें शक्य आहे हें मार्क्सवादाला देखील मान्य करावें लागतें. भूदान-आंदोलन देखील याच विचारावर आधारलेलें आहे असें म्हणावें लागेल. किंबहुना, सगळींच सामाजिक परिवर्तन घडवून आणूं पहाणारीं आंदोलनें याच विचाराच्या आधारावर उभीं राहूं शकतात. खरा प्रश्न याच्यापुढें आहे. आणि त्यांत मार्क्सवादाचा एकांगीपणा प्रकट होतो. समाजरचना बदलावयास उद्युक्त झालेल्या माणसांनीं एका विशिष्ट प्रकारेंच प्रयत्न केले पाहिजेत असा त्यांत आग्रह आहे. हा प्रकार सर्वांच्या आतां परिचयाचा असल्यामुळें त्याविषयीं अधिक स्पष्टीकरणाची जरूर नाहीं. या आग्रहामुळें मानवी इच्छाशक्तीचें सर्जनाचें कर्तृत्व मान्य करीत असतांनाच तिला पुनः बंधनांत टाकण्याचें कार्य मार्क्सवादानें केलें आहे. इतरांनीं हें बंधन मानलें नाहीं तर त्यांत गैर काय आहे ? त्या बंधनाची कल्पना जर शास्त्रीय दृष्टिकोणातून जन्मली आहे असें म्हणावयाचें असेल तर तें न मानणाऱ्यांच्या कार्याकडे एक प्रयोग म्हणून कां पहातां येऊं नये ? शास्त्रीय सत्याला अंतिम सत्याचें







स्थान देतां येईल काय ? तें द्यावयाचें नसल्यास भूदान-आंदोलनाचें "समाजरचना बदलण्याचा भिन्न मार्ग शोधून काढण्याचा एक प्रयोग" असें वर्णन तरी किमानपक्षीं केलें पाहिजे. "ती केवळ भावनांना आवाहन करणारी एक घोषणा आहे" असें म्हणतांना शास्त्रीय भूमिका सुटते असें वाटतें. या एकांगीपणामुळें मार्क्स-वादाच्या आदेशानुसार सामाजिक नवरचना निर्माण करण्यास उद्युक्त झालेलीं माणसेंच कालांतरानें बदल-तात आणि आपल्या प्रयोगांत नाना प्रकारच्या विकृती निर्माण करतात हा इतिहासाचा अनुभव आहे. तो ध्यानांत घेतल्यास भूदानासारख्या प्रयोगाकडे अधिकच काळजीपूर्वक व सहानुभूतीनें पहाणें आवश्यक ठरतें. त्यांत एकांगीपणा येऊं नये हें म्हणणें ठीक आहे, पण तो दाखवतांना भिन्न प्रकारची एकांगी भूमिका घेऊन कसें चालेल ?

भूदान-आंदोलनामुळें प्रस्थापित अर्थव्यवस्थेची चौकट आहे तशीच कायम राहते हेंहि विधान पटण्या-सारखें नाहीं. या प्रश्नाचा ऊहापोह करतांना भांडवल-शाही अर्थव्यवस्था आणि जमीनदारी यांची थोडीशी गल्लत झाली आहे असें वाटतें. जमिनदारी नष्ट करण्या-बद्दल आतां दुमत नाहीं. आणि भूदान-आंदोलनामुळें ती कायम राहील आणि अधिकच पिळणूक करूं लागेल, ही कल्पना अनाठायीच म्हटली पाहिजे. भूदान-अंदोलनामुळें दयेच्या आधारें प्रांतींतील विषमता कमी करण्याचा प्रयत्न होत नसून नैतिक आवाहनाच्या साहाय्यानें मालकी हक्कांचें स्वरूप बदलण्याचा उपक्रम सुरू आहे. या आंदोलनद्वारां होत असलेला बदल प्राध्यापकद्वयांना मान्य नसेल; किंबहुना, त्यांना तो अयोग्यहि वाटत असेल. पण तो रचनात्मक बदल नाहीं, त्याच्यामुळें जमीनीच्या प्रस्थापित मालकीच्या हितसंबंधांवर कोणताच परिणाम होणार नाहीं असें कसें म्हणतां येईल ?

भूदानवाद्यांच्या ग्रामोद्योगविषयक भूमिकेंत अड-चणी आहेत हें खरें. ही भूमिका एका दृष्टीनें अव्यव-हार्य आहे असेंहि म्हणतां येईल. मात्र असें करतांना ग्रामोद्योगावर आधारलेलीं स्वयंपूर्ण खेडीं आणि वि-केंद्रीकरणावर आधारलेली उत्पादनपद्धति यांत फरक करणें आवश्यक आहे. तंत्रविद्येच्या विकासाला बिन-शर्त मान्यता देण्याची भूदानाची तयारी नाहीं, असा ग्रामोद्योगाबाबतच्या आग्रहाचा अर्थ केल्यास मात्र भूदानाची भूमिका विचारार्ह आहे असेंच म्हणावें लागेल. तांत्रिक विकासाच्या पोटींच भांडवल-शाहींतील केंद्रीकरण जन्मास आलें आणि त्याच्या-ऐवजीं अधिक विस्तृत व व्यापक स्वरूपाचें साम्य-वादी केंद्रीकरण निर्माण होण्याची शक्यता उत्पन्न झाली. या विकासक्रमांत सांस्कृतिक मूल्यांना अत्यंत मोठा धोका निर्माण झाला आहे. यांतूनच तंत्रविद्या-विकास हा सर्वथा सर्वकालीं इष्टच असें समजण्याचें कारण नाहीं, हा विचार पुढें आला आहे. अर्थात्, केंद्रीकरणाला जबाबदार ठरलेली तंत्रविद्या सहकार्याला साहाय्यभूत होऊंच शकणार नाहीं अस नाहीं. यामुळें याबाबत नकारात्मक दृष्टिकोण घेण्याऐवजीं चिकित्सक वृत्ति स्वीकारणेंच अधिक योग्य होईल, असें वाटतें. मात्र नकारात्मक दृष्टिकोणाप्रमाणेंच आदर्शीकरणहि त्याज्यच म्हटलें पाहिजे.

माणसें भूमिदान करावयास कां उद्युक्त होत नाहींत या विषयींचें प्राध्यापकद्वयांचें विवेचन महत्त्वाचें आहे. तथापि, असें असूनहि ३५ लक्ष एकर जमीन देण्या-इतकीं माणसें पुढें आलीं ही खेदाची गोष्ट नसून आशा-दायक घटनाच म्हटली पाहिजे. अपेक्षेप्रमाणें जमीन न मिळत गेल्यास या आंदोलनाची अधिक काळजीपूर्वक समीक्षा करावी लागेल हें खरें ! पण नैतिक आवाहनानें ३५ लक्ष एकर जमीनीची मालकी सोडावयास माणसें तयार होतात–भोंवतालच्या परिस्थितीचा त्यांच्या विचारांवर परिणाम होत असूनहि तयार होतात. या घटनेंतून मिळणारा दिलासा व त्याचें महत्त्व त्यामुळें कमी होण्याचें कारण नाहीं.

लेखांतील मुद्दे अत्यंत महत्त्वाचे आहेत. स्थला-भावास्तव त्यांची अधिक विस्तारानें चर्चा करतां येत नाहीं. परंतु त्यांसंबंधीं विचार झाल्यानें आंदोलनाची दृष्टि साफ होण्यास मदतच होईल यांत शंका नाहीं.

---












श्री. ह्. कृ. मोह्नी

# भूदान-आंदोलनाचें तंत्र आणि शास्त्रीय दृष्टि

ह्या भूदान-विशेषांकांत दुसरीकडे प्रा. मावळंकर व प्रा. कानेटकर ह्यांचा लेख प्रसिद्ध झाला आहे. ह्या लेखावरून झालेली प्रस्तुत लेखकाची मानसिक प्रतिक्रिया थोडक्यांत येथें मांडावयाची आहे.

गेल्या कांहीं वर्षांत सर्वोदयसमाज व सर्वसेवा-संघ ह्या संघटनांतर्फें देशांत जें गांधीमतप्रचाराचें कार्य चालूं आहे, त्याचा वैचारिक परामर्श प्रसंगोपात्त प्रस्तुत लेखकाकडून घेण्यांत आलेला असल्यामुळें प्रा. मावळंकर व प्रा. कानेटकर यांच्या लेखावरून कांहीं विचार प्रस्तुत लेखकाच्या मनांत उद्भूत होणें क्रमप्राप्तहि आहे.

प्रथम ह्या दोन्ही प्राध्यापकांचें अभिनंदन करणें जरूर आहे; कारण त्यांनीं देशांत चालूं असलेल्या ह्या महान् घटनेचा नीतिशास्त्र, समाजशास्त्र व अर्थशास्त्र ह्यांच्या आधुनिक विचारा-( concepts ) नुसार शास्त्रीय दृष्टिकोनानें विचार केला आहे. व्यक्तीच्या महत्तेनें भारावून न जातां भूदान-यज्ञ-आंदोलनाची चिकित्सा व पृथक्करण आदरपूर्वक परंतु प्रामाणिकपणें ह्या प्राध्यापकांनीं करण्याचा आपल्या लेखांत प्रयत्न केला आहे. म्हणून ह्या आंदोलनाच्या संचालकांनीं, कार्यकर्त्यांनीं व आंदोलनाशीं सहानुभूति बाळगणाऱ्यांनीं हा निबंध काळजीपूर्वक वाचून ह्या चळवळीबाबतचें स्वतःचें मूल्यमापन तपासून ठेवणें जरूर आहे.

प्रस्तुत प्राध्यापकांचें म्हणणें थोडक्यांत माझ्या दृष्टीनें असें आहे : सामान्य मनुष्याच्या लायकीवरून, त्याच्या वैचारिक पातळीवरून आणि त्याच्याकडून सामान्यपणानें घडून येत असलेल्या सत्-कार्यावरून पाहतां भूदान-यज्ञाचें जें प्राप्तव्य किंवा अंतिम हेतु अपेक्षिला आहे तो साध्य होणें कठिण आहे. जें तंत्र ह्या चळवळीच्या संचालकांनीं अवलंबिलेलें आहे, त्यानें हा हेतु साध्य होणें दूरापास्त आहे. उलट, प्रतिक्रिया देखील ह्या चळवळीनें कालांतरानें होण्याची शक्यता आहे, किंवा निराळ्या शब्दांत सांगावयाचें तर भौतिक स्वामित्वाच्या भावनेचें निर्मूलन न होतां ती दृढमूल होण्याचा देखील संभव आहे. आणि शेवटीं ह्या चळवळीचा एकंदर विचार करितां सामान्य मनुष्याचें जीवनमान वाढण्याची शक्यता फार कमी आहे.

'भूदानयज्ञमूलक ग्रामोद्योगप्रधान अहिंसक क्रांति' हें ह्या चळवळीचें उद्दिष्ट मानण्यांत आलेलें आहे. विचारपरिवर्तन व हृदयपरिवर्तन ह्या साधनांनीं वैयक्तिक स्वामित्वाचें सामाजिक स्वामित्वांत विसर्जन घडवून आणून हें साध्य सिद्ध करावयाचें आहे. आर्थिक समानता निर्माण करून शोषणविहीन व शासनमुक्त समाज स्थापन करणें हें ह्या चळवळीचें अंतिम ध्येय आहे. हें साध्य अत्यंत इष्ट, मंगल, उदात्त, भव्य व निरपवाद आहे ह्याबद्दल कोणाचाहि मतभेद असूं शकणार नाहीं.

ह्या चळवळीस जें यश गेल्या साडेतीन वर्षांच्या काळांत मिळालेलें आहे तें अभूतपूर्व आहे ह्यांत कांहीं शंका नाहीं. पसतीस लक्ष एकरांपेक्षां अधिक जमीन ह्या काळांत संपादित झालेली असून साडेतीन लक्षांपेक्षां अधिक दात्यांनीं ही जमीन दिलेली आहे. व हा संदेश तीन कोटींपेक्षां अधिक लोकांनीं म्हणजे हिंदुस्थानांतील एकदशांशापेक्षां अधिक लोकांनीं तरी निदान ऐकलेला आहे, असें म्हणतां येण्यासारखें आहे. इतक्या विशाल संख्येनें व इतक्या विस्तृत प्रमाणांत जमीनीवरचें स्वामित्व जमीनमालकांनीं सोडून देणें ही अशक्यप्राय वाटणारी गोष्ट थोड्या मर्यादित काळांत घडून आलेली आहे. आणि म्हणून अपेक्षित पांच कोटीचा संकल्प ठरविलेल्या काळांत सिद्ध होण्याचा संभव ह्या चळवळींत सामील झालेल्या अनेक कार्यकर्त्यांस वाटणें साहजिकहि आहे.

हें कबूल केलें पाहिजे कीं ह्या चळवळीचा प्रारंभ, ज्यास प्रा. मावळंकर व प्रा. कानेटकर slogan किंवा उदात्त घोषवाक्य म्हणतात, तशाच पद्धतीनें झालेला आहे. महात्मा गांधीजींनीं १९२१ सालीं एका वर्षांत स्वराज्य मिळविण्याची ज्याप्रमाणें घोषणा केली होती, त्याचप्रमाणें ह्याहि चळवळीची नांदी गाण्यांत येत आहे कीं काय, आणि आंदोलनाचें तारूं त्याच सुरावर हाकारण्यांत येईल कीं काय असा विचार सेवापुरी-संमेलनांत अनेकांच्या अंतःकरणांत उद्भूत झालेला होता. ह्या संमेलनांत वीस लक्ष एकर जमिनीची प्राप्ति करावी असा ठराव मोठ्या धडाक्यानें करण्यांत आला होता. एवढेंच नाहीं तर ग्रामोद्योगाचा दृढ पाया








रचतां यावा म्हणून बहिष्कारांचें शस्त्र कांहीं प्रमाणांत परजण्यांत यावें असाहि प्रक्षोभक ( agitational ) ठराव संमत झाला. गांधीजींच्याच तंत्राचें अनुकरण करून क्रांतिकारक वातावरण उद्दीपित करण्यांत येत आहे कीं काय असा भास त्यावेळीं श्रोत्यांस झाला. गांधी-विचाराच्या लोकांच्या मनांत गांधीजींच्या निर्याणामुळें उत्पन्न झालेली विमनस्कता, निराशा, विफलता, ध्येया-भावदर्शक पोकळी अंशतः भरून येऊं शकेल व राजकीय आणि वैचारिक असमाधान कमी होईल अशी शक्यता वाटूं लागली.

हा सेवापुरीचा उद्घोष योग्य वेळीं एका योग्य मानसिक क्षणीं ( Psychological moment) करण्यांत आला हें त्या चळवळीचें वैशिष्ट्य होतें हें लक्षांत घेतलें पाहिजे. गेल्या वीस वर्षांत गांधीजीं-बरोबर खांद्याला खांदा लावून ज्यांनीं कामें केलीं, गांधीजींच्या रचनात्मक कार्यामध्यें जे अनेक वर्षें समरस झालेले होते आणि अहिंसात्मक स्वराज्यप्राप्ती-संबंधीं ज्यांचीं कांहीं स्वप्नें व भावना होत्या त्यांना केवळ राजकीय स्वातंत्र्य-सिद्धीनें, राजकीय अधि-कारस्थानामध्यें एतद्देशीय लोकांची स्थापना झाली, एवढ्या वरवरच्या घटनेनें समाधान मिळेल अशी परिस्थिति नव्हती. खुद्द गांधीजी स्वराज्यस्थापनेच्या ऐन महोत्सवप्रसंगीं, नौखाली, पाटणा व दिल्ली येथें निराळ्याच कार्यांत मग्न झालेले होते. आणि आपल्या खास कार्यकर्त्यांना त्यांच्या मृत्यूपूर्वी परिस्थितिप्राप्त निराळें मार्गदर्शन ते करतील असें वाटतहि होतें. त्यांच्या अचानक घडून आलेल्या मृत्यूनें रचनात्मक कार्याशीं अनेक वर्षें एकजीव झालेले कार्यकर्ते संभ्रमांत पडले. दारुण मानसिक अस्वस्थतेच्या मनोवृत्तींत त्यांनीं सेवाग्राम, राऊ, अनुगूळ, शिवरामपल्ली येथें संमेलनें भरवून वैचारिक खलबतें केलीं. शेवटीं चार वर्षांच्या आंतच आचार्य विनोबांच्या पुढारीपणानें भूदानयज्ञाच्या ह्या देशव्यापी कार्यक्रमांत रचनात्मक कार्यकर्त्यांस गांधीजींचा संदेश सांपडला. सेवापुरी येथें तो जाहीर करण्यांत आला. सार्वत्रिक समाधान वाटण्या-सारखा व आपलें ३० वर्षें मनांत बाळगलेलें ध्येय प्रतिबिंबित होईल असा हा कार्यक्रम आहे अशा भावनेनें गांधीजींच्या विधायक कार्यकर्त्यांनीं तो उचलून धरला. अल्पावधींतच ह्या आंदोलनास जें यश मिळा-लेलें आहे त्यानें रचनात्मक कार्यकर्त्यांच्या मनाचें मानसिक असमाधान बऱ्याच मोठ्या प्रमाणांत कमी झालें आहे असें म्हणतां येतें.

जेव्हां एखादें आंदोलन देशव्यापी स्वरूप धारण करण्यास समर्थ बनते, जेव्हां सार्वत्रिकता ( Universality ) त्यांत प्रतिबिंबित झालेली दिसून येते, त्या वेळीं एखाद्या विशाल घोषवाक्यानें सकृद्दर्शनीं अव्यवहार्य वाटणाऱ्या ध्येयानें जनमनाचा ठाव घेणा-ऱ्या प्रक्रियेस आरंभ झालेला असतो. भूदानयज्ञाचें आंदोलन ही केवळ नैतिक व धार्मिक चळवळ नाहीं. राजकीय, सामाजिक व आर्थिक उद्देश त्यांत सामावलेले आहेत. गांधीजींच्या विशिष्ट प्रकृती - ( personality ) चें देशकालपरिस्थित्यनुरूप बदललेलें हें रूप आहे. म्हणून ह्या आंदोलनाकडे केवळ पृथक्करणात्मक अशा समाजशास्त्रीय व अर्थशास्त्रीय दृष्टिकोनानें पाहून भागणार नाहीं. शेवटीं हें आंदोलन कसें स्वरूप धारण करणार हें आजच अजमावतां येईल कीं काय ह्याची शंका आहे. प्रस्तुत राजकीय परिस्थितींत ज्या गांधी-विचाराच्या कार्यकर्त्यांस व जनतेस असमाधान वाटत आहे त्यांच्या विशिष्ट मनोवृत्तीचा व क्रियाशक्तीचा हा प्रवाह सर्वोदयसमाज व सर्वसेवासंघ ह्या दोन तीरांमधून वहात आहे एवढेंच त्याचें आजचें स्वरुप आहे. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यप्राप्ती-नंतरच्या राजकीय परिस्थितीमुळें भ्रान्त झालेल्या जनतेच्या जीवनाला गांधीजींच्या मूल्यांची सत्य, अहिंसा, अपरिग्रहनिष्ठ अशी कसोटी लावून ह्या आंदोलनानें प्रकाश देण्याचा प्रयत्न चालविलेला आहे. ह्या प्रकाशानें जनतेच्या जीवनास विशिष्ट दृष्टि मिळालेली आहे. हा प्रकाश आकाशांत कांहीं काळ चमकणाऱ्या विजेप्रमाणें भासणार कीं विद्युद्दीपाप्रमाणें वाटेल तेव्हां निरनिराळ्या प्रसंगीं व्यावहारिक उपयोगास तो कारणीभूत ठरणार अथवा रोग्यास देण्यांत येणाऱ्या अल्ट्राव्हायोलेट किरणांप्रमाणें आरोग्यदायक अशा स्वरूपांत तो विकसित होणार हें निदान करणें आज कठीण आहे.

हें आंदोलन, सध्यांच्या राजकीय पक्षास व प्रदेश-प्रतिष्ठापित सरकारांस मदत मिळावी, त्या सरकारांस तें उपकारक ( Complimentary ) व्हावें अशा उद्देशानें सुरूं झालेलें नव्हतें. व त्याचें सरकारचेच काम आंदोलन करीत आहे असें सध्यांचें स्वरूपहि








नाहीं. तें प्रांतिक सरकारांना हळूंहळूं आर्थिक समानता निर्माण करण्यास खादी-ग्रामोद्योगादि साधनांच्याद्वारें बेकारीनिवारणाचा प्रश्न सोडविण्यास अप्रत्यक्षतः भाग पाडीत आहे 'नयी तालीम' ह्या संज्ञेनें दर्शित होणाऱ्या शिक्षणाच्या दृष्टिकोनाचें दडपण व तीव्रता सरकारवर ह्या आंदोलनानें अंशतः पडत आहे. विशेषतः जमिनीच्या वांटणीच्या मुख्य प्रश्नाच्या सोडवणुकीबाबत ह्या आंदोलनाची कामगिरी फार मोठी आहे. प्रदेशसरकारें जमीनदारी नष्ट करण्याचा स्वतः होऊन मनापासून प्रयत्न करीत आहेत ह्यांत शंका नाहीं. परंतु जमीनवांटप कसें करावें, व्यक्तीला जमीन जास्तींतजास्ती किती असावी ह्याबाबत तीव्रतेनें विचार करण्यास ह्या आंदोलनानें भाग पाडलें आहे. ह्या आंदोलनाच्या धार्मिक, सात्त्विक, परोपकारमय अशा शिकवणुकीचा फायदा मुख्यतः भूमिविहीनांस किंवा जमीनीच्या लहान तुकड्यांच्या मालकांस व समाइकीनें, सहकार्यानें शेती करणाऱ्यांस मिळाल्यावांचून राहणार नाहीं अशीं चिन्हें ह्या आंदोलनामुळेंच मुख्यतः दिसत आहेत. म्हणून असें म्हणतां येतें कीं, हें आंदोलन सरकारची सुधारणा (correction) करण्यास साहाय्यभूत झालेलें आहे. सरकारोपकारक (complimentary), सरकार-सुधारक (corrective) या दोन्हींहि प्रकारांनीं ह्या चळवळीचें मोजमाप करणें योग्य आहे. आतां चळवळीचें तिसरें पर्यवसान म्हणजे प्रस्तुत सरकारची जागा ह्या चळवळीच्या शक्ती-(sanction)च्या जोरावर सात्त्विक अशा नवसमाजपरिवर्तनानें शासन-मुक्त, शोषणविहीन, वर्गनिरपेक्ष परोपकाररत अशा संघटनेनें घ्यावयाची (substitution) हें आहे. हें ध्येय इतकें उदात्त, श्रेष्ठ व कल्पनामय आहे कीं, तें बहुतांशीं आकाशस्थच राहील अशी याबद्दल धारणा बाळगणें व्यवहार्यतेचें द्योतक आहे. जेथें सर्व जमीनीचें स्वामित्व सोडून देण्यांत आलेलें आहे, अशीं कांहीं सुमारें साठ खेडीं ह्या चळवळीनें मिळालीं आहेत. हाच ह्या चळवळीचा अत्यंत मोठा विजय आहे. त्या खेड्यांमध्यें हा ध्येयपर समाज निर्माण होऊं शकतो कीं काय, सहकार्यमय परोपकारप्रमुख असें जीवन कांहीं ठिकाणीं तरी तग धरूं शकतें कीं काय, ह्याचा प्रयोग देखील कोणत्याहि राज्यसंस्थेस उपकारकच ठरणार आहे, असें म्हणतां येण्यासारखें आहे. अद्याप अहिंसक समाजरचनेचीं तत्त्वें व बीजें आपली संस्कृति फार जुनी असली तरी अद्ययावत् संस्कृतीच्या दृष्टिकोनाच्या विचारवाऱ्यामध्यें कितपत स्थायी होऊं शकतात ह्याचा प्रयोग सिद्ध व्हावयाचा आहे म्हणून हें अंतिम ध्येय ह्या चळवळीनें साध्य होऊं शकेल किंवा दृष्टीच्या आटोक्यांतहि तें येऊं शकेल असें मानणें योग्य ठरणार नाहीं. एक सामाजिक उदात्त प्रयोग सुरू करण्याची सुसंधि या आंदोलनामुळें मिळणार आहे एवढें आज मानून चालणें व्यवस्थित विचारसरणीचें लक्षण आहे.

क्रांतिपर आंदोलन ह्या संकेतयुक्त शब्दास जो अर्थ सामान्यपणे अलीकडील समाजशास्त्रीय विचारांत आलेला आहे, तो ह्या चळवळींत आतांपर्यंत अंतर्भूत झालेला दिसत नाहीं. ह्या महत्त्वपूर्ण शब्दाच्या अर्थाबाबत, विचारी, चिकित्सक व शास्त्रज्ञ लोकांच्या मनांत ह्या चळवळीचा परामर्श घेतांना फार गल्लत किंवा गोंधळ निर्माण होतो. व तें अगदीं स्वाभाविकहि आहे. कारण चळवळीचें उद्दिष्ट दृष्टिपथांत आलेलें नाहीं. सामाजिक सुधारणांचा वेग अत्यंत जलद झाला, त्यानें अभीष्टसिद्धि अल्प काळांत घडून आली म्हणजे क्रांति हा शब्द योग्य अर्थानें उपयोगांत आणला जातो असें म्हणतां येतें. तसेंच आंदोलनाच्या ऐवजीं 'आरोहण' शब्दाचा उपयोग केल्यास विचारी मनावर निराळ्या प्रतिक्रिया घडून येतात. शास्त्रज्ञांच्या दृष्टीनें शब्दार्थाच्या संबंधींचा प्रश्न जरी बाजूस सारला, तरी ह्या चळवळीच्या मागचें वजन, शक्ति, जोर (sanction) काय आहे हें ह्या तीन वर्षांच्या काळांत स्पष्ट झालेलें नाहीं. आणि म्हणूनच त्याचें शास्त्रीय मोजमाप करतां येत नाहीं. ही शक्ति अमुक आहे, असें निश्चयानें सांगतां येत नाहीं. आणि म्हणूनच ह्या चळवळीबाबत वैचारिक संशय शास्त्रीय रीतीनें विचार करणाऱ्यांच्या मनांत निर्माण होतात. गांधीजींच्या व्यक्तित्वांत आफ्रिकेंच्या त्यांच्या अनुभवामुळें सत्याग्रहशक्तीचा आविष्कार वस्तुनिष्ठतेनें (objectively) अजमावतां येणें शक्य झालें होतें. जसजसा सत्याग्रहशक्तीचा हा आविष्कार हिंदुस्थानच्या विशिष्ट परिस्थितींत हळूंहळूं दृग्गोचर होऊं लागला तसतसें गांधीजींचें आंदोलन








विस्तृत होऊं लागलें व विचारी जनतेच्या संशयास्पदतेचें क्षेत्रहि कमी होऊं लागलें. गांधीजींचें व्यक्तित्व त्यांच्या सत्याग्रहांतील अंतर्भूत शक्तीमुळें सुस्पष्ट झालेलें होतें. रजोगुणात्मक सात्त्विकता हें गांधीजींच्या व्यक्तित्वाचें निदान होऊं शकत होतें. त्यांचें रचनात्मक कार्य ह्या त्यांच्या सत्याग्रही शक्तीमुळें शास्त्रीय विचारसरणीनें सुसंवादी ठरूं शकत होतें. आचार्य विनोबा गूढ व अनाकलनीय अशा ईश्वरी शक्तीवर, दैवी प्रेरणेवर मुख्यतः अवलंबून आहेत कीं काय असें त्यांच्या कांहीं उद्गारांवरून व प्रसंगोपात्त घडणाऱ्या त्यांच्या वैयक्तिक घटनांवरून अनुमान निघूं शकतें. म्हणून ह्या चळवळीच्या अंतिम साध्याबाबत प्रा. मावळंकर, कानेटकरांसारख्या चिकित्सक विचारी समाजशास्त्राभ्यासकांच्या मनांत अनेक शंका निर्माण होतात. ह्या आंदोलनांत जें तंत्र अवलंबिलेलें आहे तें शास्त्रीय विचारसरणीचा निकष लावल्यास समाधान करण्यास अद्याप असमर्थ आहे असें प्रस्तुत लेखकास देखील वाटत आहे.

प्रस्तुत लेखकाच्या मनांत सुद्धां ही चळवळ म्हणजे एक धार्मिक, सांस्कृतिक, नैतिक ('moral rearmament') अशी समजावयाची कीं काय? आणि संस्था, संघटन, क्रांतिकारक वातावरण, आंदोलन, शिस्त, दंडशक्ति, जनसामर्थ्य (social sanction), बहिष्कार, सत्याग्रह इत्यादि सामाजिक घटनांचा उपयोग हें आंदोलन केव्हां कसें व कोणत्या परिस्थितींत करणार असे प्रश्न उभे आहेत. हें आंदोलन — इतकें तें विस्तृत झालेलें असलें तरी — व्यक्तिनिष्ठच राहणार कीं काय हा संशय प्रस्तुत लेखकाच्याहि मनांत उद्भूत होत आहे. अंतिम साध्याचा विचार करतांना ह्या सर्व सामाजिक घटनांचा विचार करणें आवश्यक आहे, असें प्रस्तुत लेखकास वाटत आहे हें स्पष्ट करणें त्याचें कर्तव्यहि ठरतें. हें आंदोलन म्हणजे एक ह्या सर्व सामाजिक घटनांचें (Mechanical mixture) यांत्रिक एकीकरण होऊं शकत नाहीं. तें रासायनिक संमिश्रण (chemical compound) बनलें पाहिजे. हें तो गांधीजींच्या चळवळीशीं घनिष्ट पूर्वपरिचय असल्यामुळें चांगलें जाणतो. परंतु हें रासायनिक संमिश्रण (chemical compound) कसें घडून येणार हें त्याच्या मनापुढें स्पष्ट होऊं शकत नाहीं.

राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या किंवा साम्यवादाच्या चळवळीची ह्या ठिकाणीं तुलना करणें जरी — जरी ही तुलना मोठ्याशीं लहानाची तुलना अशा स्वरूपाची असली तरी — विचारांच्या स्पष्टतेसाठीं अनुचित ठरणार नाहीं असें वाटतें. ह्या दोन्ही चळवळींचा व्याप हिंदुस्थानव्यापी आहे. पण ह्या दोन्हीहि चळवळींचें तंत्र व उद्दिष्ट प्रस्तुत भूदान-आंदोलनाच्या तुलनेनें अधिक स्पष्ट आहे असें म्हणतां येतें. भूदान-यज्ञाचें हें आंदोलन जनतेच्या हिताच्या दृष्टीनें अधिक उपयुक्त व कालानुरूप आहे असें जरी म्हणतां येण्यासारखें असलें तरी तें अधिक प्रमाणांत व्यक्तिनिष्ठ आहे कीं काय व तसेंच तें असावें कीं काय याबद्दल दुमत होणें अपरिहार्य आहे. ह्या आंदोलनांत सामाजिक समुत्थानाची क्रिया जरी अंतर्भूत असली तरी त्याचे टप्पे त्यांतील विशिष्ट तंत्रामुळें आकलन होण्यास कठीण वाटत आहेत हें खरें.

शेवटीं प्रा. मावळंकर व प्रा. कानेटकर यांसारख्या शास्त्रीय विचारसरणींत मुरलेल्या प्राध्यापकांस विनंतिवजा अशी सूचना करावीशी वाटतें कीं, ज्या अर्थी हें आंदोलन अधिकाधिक कार्यक्षम करणें जनहिताच्या दृष्टीनें योग्य आहे; आणि ज्या अर्थीं निःपक्ष भूमिकेवर आर्थिक समानतेच्या इष्ट हेतूनें हें आंदोलन चालविण्याचें संचालकांच्या मनांत व कृतींत उतरलेलें आहे असें दिसत आहे त्या अर्थीं नुसती चिकित्सक दृष्टि न ठेवतां त्यास जर स्वोदाहरणानें व आपलें तरुणांवर असलेलें वजन खर्चीं खालून या आंदोलनाला हातभार लावावा. ह्या आंदोलनाकडून आर्थिक, सामाजिक उपयुक्तता कशी साध्य होऊं शकेल तें आंदोलनाशीं समरस होऊन अजमावतां आलें तर ह्या आंदोलनाचें व्यक्तिगत स्वरूप कमी करण्यास मदत होईल, एवढेंच नाहीं तर आंदोलनास इष्ट तें वळणहि लागेल असें वाटतें.

---








प्रा. ना. अ. मावळंकर व मा. दि. कानेटकर

# मानवाची इच्छाशक्ति स्वैर आहे काय ?

आचार्य जावडेकर, प्रा. पारीख यांच्यासारख्या देशाच्या वैचारिक व राजकीय जीवनांत मुरलेल्या मुरब्बींकडून आमच्या लेखासंबंधीं अशा तऱ्हेची प्रतिक्रिया अपेक्षितच होती. त्यांच्या सडेतोड टीके-बद्दल आम्हीं फार आभारी आहोंत. विशेषत: प्रा. पारीख यांनीं सत्यान्वेषणाच्या दृष्टीनें आमच्या विचारसरणीमागील मूलभूत कल्पना तपासून पाहिल्या, त्यामुळें त्यांच्या टीकेचा वाचकांना विशेषच उपयोग होईल. एखादी विचारसरणी नुसती तर्कशुद्ध असून भागत नाहीं. तिच्या मूलभूत प्रमेयांमध्यें जीवनाच्या अद्ययावत् सर्व विविध अनुभवांचा समावेश झालेला असला पाहिजे व त्या अनुभवांमध्यें सुसंगति दाख-विण्यास ती समर्थ असली पाहिजे.

आम्हीं मुद्दामच कोणत्याहि वादाचा उल्लेख केला नव्हता. मार्क्सवाद म्हणजे काय ह्याविषयीं मैतक्य नाहीं. त्यासभोंवतीं एक नापसंती व पूर्वग्रह यांचें वलय ( penumbra of disapproval and prejudice ) आहे हें प्रा. पारीख यांच्या लेखावरूनहि दिसून येतें. शिवाय आप-ल्याला पटलेली विचारसरणी मांडल्यावर ती मूलत: कोणाची आहे याला पोथीनिष्ठांव्यतिरिक्त कोणी फारसें महत्त्व देणार नाहीं असें आम्हांला वाटतें.

परंतु मार्क्सच्या नांवाचा उल्लेख करून प्रा. पारीख यांनीं आमची परिस्थिति बिकट केली आहे. त्यांनीं उपस्थित केलेल्या मुद्द्यांना सविस्तर उत्तर द्यावयाचें झाल्यास मार्क्सवादाविषयीं आतांपर्यंत जीं अनेक वैचारिक रणें माजलीं आहेत, त्यांच्या तप-शीलांत शिरावें लागेल. तसें करणें येथें इष्ट व शक्यहि नाहीं. साध्या भाषेमध्यें सूत्रबद्ध रीतीनें आमची भूमिका स्पष्ट करण्याचा आम्ही प्रयत्न करणार आहोंत.

खाजगी स्वामित्वाच्या आर्थिक जीवनावरील घोर परिणामांची जाणीव आतां सर्वसामान्य लोकांस झाली आहे, व नसल्यास ती करून देणें जरूर आहे हें आचार्य जावडेकरांचें म्हणणें आम्हांला मान्य आहे. पण मग हृदयपालटाची काय आवश्यकता ? खाजगी स्वामित्व नष्ट करण्याची निकड बहुसंख्य लोकांना पटली म्हणजे लोकशाही-मध्यें तें नष्ट करणें सहज शक्य आहे. तसें न करतां खाजगी स्वामित्वावर आधारलेल्या समाज-रचनेंत आपण सर्वसाधारण व्यक्तींना त्या स्वामि-त्वाचा थोडाफार त्याग करावयास लावण्यांत काय साधतों हें कळणें कठीण आहे.

' माणसेंच क्रांति घडवितात ' या प्रा. पारीख यांच्या विधानावरून आमच्या लेखामध्यें माणसाला तें कर्तृत्व आम्हीं नाकारलें आहे अशी टीका प्रा. पारीख यांना करावयाची आहे, अशी आमची प्रथम कल्पना झाली. परंतु समाजांत जें कांहीं घडतें तें सर्व माणसेंच करतात ही गोष्ट इतकी स्पष्ट आहे कीं त्याबद्दल वाद असण्याचें कारण नाहीं. ' बदल-लेलीं माणसें परिस्थिति बदलतील '; ' बदललेली परिस्थितीच माणसांत बदल घडवून आणील. " हीं एकमेकांना दिलेलीं उत्तरें एका प्रश्नाला दुसरा प्रश्न विचारून उत्तर देण्याच्या पद्धतीचीं आहेत. म्हणून आम्हीं आमच्या लेखांत त्याबाबत विशेष खोलांत गेलों नाहीं. बदल कसा होतो हें गूढच राहतें. समाजासंबंधीं एका साध्या पण भ्रामक कल्पनेवर तीं उत्तरें आधारलेलीं आहेत. " समाज म्हणजे अनेक स्वयंपूर्ण व्यक्तींचा मोठा समूह. अर्थातच व्यक्तींच्या गुणावगुणांवर समाजाचा ( quality ) कस, गुणावगुण अवलंबून राहणार. ' अधिका-धिक संख्येनें ' व्यक्ती सुधारल्या कीं सर्व प्रश्न








चुटकीसारखे सुटले, मग समाजरचना कशी कां असेना "; उलटपक्षीं, "परिस्थिति सुधारली कीं व्यक्तीच्या अवगुणांना अवकाश राहात नाहीं; समाज सुधारतो." "आपली शिक्षणपद्धतीच वाईट आहे; तेथें आदर्श शिक्षक व विद्यार्थी काय रडणार !" "शिक्षक व विद्यार्थी बाजारी झाले आहेत; तेथें आदर्श शिक्षणपद्धति काय करणार !" अशा दोन्हीहि विचारसरणी सारख्याच बोधप्रद. अशाच भूमिकेवरून दोन्हीहि विचारसरणींतील दोष काढून टाकून गुणांचा तेवढा समन्वय करणारी विचारसरणी तयार होते.

खरी भूमिका अशी आहे : मनुष्य व परिस्थिति ह्या अलग नसून एकमेकांशीं संलग्न आहेत. व्यक्ती-व्यक्तींमधील व व्यक्तिसमूहामधील जीवनाच्या निरनिराळ्या क्षेत्रांमधील रूढ संबंधांचें जाळें म्हणजे समाज. एका विशिष्ट समाजरचनेंत जगणारीं माणसें आपला जीवनक्रम चालवीत असतां त्या क्रियेनेंच भौतिक परिस्थितीमध्यें, परस्परांमधील संबंधांमध्यें व स्वतः-मध्यें तीं बदल घडवून आणीत असतात. श्रमविभागणीमुळें निरनिराळे वर्ग एकमेकांच्या सहकार्यावर अवलंबून असतात; त्याचप्रमाणें त्यांच्या हितसंबंधांत ( Contradiction ) विरोध निर्माण होतो. जोंपर्यंत कमीअधिक प्रमाणांत सर्वांचीच भौतिक प्रगति होत असते तोंपर्यंत प्रत्येक वर्ग आपल्या हितसंबंधांचें रक्षण करण्यास जागरूक राहून प्रचलित समाजरचनेला उचलून धरतो. परंतु जेव्हां एखादा विशिष्ट वर्ग स्वहितसंवर्धनाकरितां समाजाची उन्नति रोखून धरतो तेव्हां अशा परिस्थितींत दडपलेल्या वर्गांमध्यें क्रांतीची जाणीव होऊं लागते. प्रचलित समाजाच्या पोटामध्येंच नवसमाजनिर्मितीच्या निकडीची जाणीव कशी उत्पन्न होते हें यावरून स्पष्ट होईल.

यावरून 'माणसेंच क्रांति घडवितात. त्यांच्या इच्छाशक्तीचा तो परिपाक आहे. ती एक आत्म-निष्ठ घटना आहे' हा निष्कर्ष मात्र मान्य होण्यासारखा नाहीं. समाज हा कांहीं माझ्या खाजगी इच्छेचा व जाणीवेचा प्रश्न नाहीं. ( Society is not a mere expression of private will and consciousness ). त्याचप्रमाणें सामाजिक क्रांति व्यक्तींच्या नुसत्या इच्छेवर अवलंबून नाहीं. व्यक्तीच्या मनामध्यें उत्पन्न होणारे सर्वच विचार तिच्या सामाजिक आचरणावर परिणाम करूं शकत नाहींत. जे विचार प्रचलित समाजरचनेनें निर्माण केलेले प्रश्न सोडविण्यास समर्थ असतात तेच प्रभावी लोकमत बनवितात व लोकांच्या आचरणांत उतरतात.

एक विशिष्ट क्रांतितंत्र बनवून मार्क्सवादानें मानवी इच्छाशक्तीच्या सर्जनकर्तृत्वाला बंधनांत टाकलें आहे, असा त्यावर आक्षेप आहे. मानवाची इच्छाशक्ति स्वैर आहे काय ? तिचें सर्जनसामर्थ्य अमर्याद आहे असें धरून चालूं या. परंतु सात रस्ते फुटणाऱ्या चौकांत जोंपर्यंत आपण कोणत्या मार्गानें जावयाचें तें नक्की करीत नाहीं तोंपर्यंत पूर्ण स्वतंत्र असूनहि जागच्या जागींच राहतों हें तितकेंच खरें आहे. जोंपर्यंत कोणती विशिष्ट मूर्ति घडवावयाची हें ठरलें नाहीं, तोंपर्यंत ती सर्जनशक्ति निरुपयोगी राहणार हें उघड आहे. त्याचप्रमाणें एकदां विशिष्ट कार्य ठरल्यावर त्या व्यतिरिक्त कांहीं करण्यास त्याची इच्छाशक्ति स्वतंत्र राहणार नाहीं. तेव्हां मानवी इच्छाशक्तीच्या सर्जनकर्तृत्वाचा प्रभाव तिजवरील बंधनामुळेंच पडतो हें सहज समजून येईल.

यावर असें म्हणतां येईल कीं निरनिराळीं ध्येयें व मार्ग दिसत असतां अमुकच एका ध्येयाप्रत अमुकच एका मार्गानें जाणें योग्य आहे असें कसें सांगतां येईल ? कोरड्या तत्त्वज्ञानाच्या जंजाळांत सांपडलेल्यांची स्थिति नेहमीं अशीच होते. मूल्यांचा व मार्गांचा विशिष्ट कालपरिस्थितिनिरपेक्ष विचार

कला म्हणजे त्यांच्या निरनिराळया बाजू एकसमयावच्छेदेंकरून दिसूं लागतात व मग मन गांगरून जातें. म्हणजेच कोणतेंहि एक मूल्य वा मार्ग निरपेक्षपणें श्रेयस्कर (absolutey valuable) आहे असें सांगतां येत नाहीं. पण विशिष्ट कालपरिस्थितींच्या मर्यादेंत कोणतें मूल्य व मार्ग योग्य आहेत हें सांगतां आलें नाहीं तर कांहींहि निश्चित शक्य होणार नाहीं. अपुरें ज्ञान असूनहि जीवनामध्यें आपण जे निर्णय घेतों ते याच भूमिकेवरून. मार्क्सवाद म्हणजे दुसरें तिसरें कांहीं नसून सामाजिक बदलांचा अभ्यास करून त्यांच्या साहाय्यानेंच सामाजिक परिवर्तनाचे नियम शोधून काढण्याचें शास्त्र आहे. साध्य-साधनांची शास्त्रशुद्ध चिकित्सा करून अमुक एक निश्चिति करणें ही भूमिका ऐकान्तिक असल्यास आमची तशी आहे. पण कांहीं महत्त्वाच्या गोष्टी (factors) विचारांत न घेतल्यामुळें जी भूमिका ऐकान्तिक होते त्याहून ही वेगळी आहे. आंतला आवाज, साक्षात्कार, अशा तऱ्हेच्या अनेक अज्ञात गोष्टी ( leaps in the dark ) शास्त्रापलीकडील सत्यें असूं शकतील; परंतु जोंपर्यंत तीं सामाजिक व्यवहारांतून निर्माण झालेल्या प्रश्नांचा उकल करूं शकत नाहींत, तोंपर्यंत समाजाला त्यांचा काय उपयोग ? व्यक्तिगत गुणांच्या प्रभावानें सामान्य माणसें आकर्षिलीं जाऊन ३५ लाख एकर जमीन देतात ही गोष्टहि सत्य आहे. पण म्हणूनच नुसत्या उदात्त हेतूंनीं भारावून जाण्यांत काय धोका आहे, हेंहि स्पष्ट करणें अवश्य ठरतें.

भूदानानें जमीनीची मालकी हक्काबद्दल जास्त आसक्ति निर्माण होईल अशा तऱ्हेचे विचार प्रा. ध. रा. गाडगीळांनीं नुकतेच मांडले आहेत. आम्ही भूदान, संपत्तिदान ह्या सर्व अंगांचा विचार करून खाजगी स्वामित्वावर आधारलेली समाजरचना बदलण्यांत त्यांचा फारसा उपयोग होणार नाहीं असें म्हटलें होतें.

सहकारीपद्धतीवर तंत्रविकासाचा उपयोग करून घेण्याची योजना आम्हांस मान्य आहे. आमच्या टीकेचा रोख खेडीं स्वयंपूर्ण करण्याच्या कल्पनेविरुद्ध होता. राजकीय विकेन्द्रीकरणाशीं सुसंगत म्हणून आर्थिक विकेन्द्रीकरण आवश्यक आहे हा मागील एका लेखांत प्रा. पारीख यांनीं मांडलेला मुद्दा आम्हांला मान्य नाहीं, परंतु त्याचा येथें विचार करण्यास अवकाश नाहीं.

सामाजिक प्रश्नांसंबंधीं खोलवर विचार व्हावा या उद्देशानें आम्हीं आमचा टीकात्मक लेख लिहिला. या चर्चेमुळें तो बऱ्याच अंशीं सफल झाला आहे व आणखी होईल असें म्हणण्यास हरकत नाहीं.

---










आरंभापासून १० जानेवारी १९५५ पर्यंत मिळालेलें

## भूदान, दानपत्र, वितरण, जीवनदान, संपत्तिदान, ग्रामदान

| | प्राप्तभूमि (एकर) | दानपत्र | वांटलेली भूमि | कुटुंबसंख्या | जीवनदानी | संपत्तिदाते | ग्रामदान |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १. आसाम | १६९२ | ० | ० | ० | ७ | ० | ० |
| २. आंध्र | २०३६१ | ६७२ | ० | ० | ८ | ३ | ० |
| ३. उत्तर प्रदेश | ५,१६८१९ | १५,५२२ | ६६,९९० | २२,३८१ | ९३ | ३३ | १ |
| ४. उत्कल | १,१७५०८ | ४०,१६८ | ७०८ | २१४ | १०६ | ३ | ९३ |
| ५. कर्नाटक | २,१८० | २३९ | २३९ | ० | ८ | ० | ० |
| ६. केरळ | २८,०३२ | १,२०० | ० | ० | २३ | १ | ० |
| ७. गुजरात | ३६,१७० | ७,७६० | ९४२ | २५१ | १६ | २६ | ० |
| ८. तामिळनाड | २९,३३४ | ५,३३७ | ३१६ | ११५ | २१ | ११ | ० |
| ९. दिल्ली | ९,२४५ | २४९ | ८५ | २२ | ७ | १७ | ० |
| १०. पंजाब | १०,४८३ | ३,००८ | ० | ० | १७ | १९६ | ० |
| ११. बंगाल | ६,८८९ | २,६३१ | २५४ | १७१ | २४ | १४८ | ० |
| १२. बिहार | २२,३२,४७५ | २,८६,४२० | १,९०९ | १,३८८ | १,०८५ | १९३ | १७ |
| १३. मध्यप्रदेश | ८४,३५१ | १३,६३९ | ७,७६८ | १,७५१ | ५३ | ३०८ | ० |
| १४. महाराष्ट्र | २३,०९५ | ७६९ | ६३ | ० | १३ | ८ | ० |
| १५. मध्यभारत | ६२,४१२ | ५,३७७ | ० | ० | २५ | ३ | ० |
| १६. म्हैसूर | ५,१६९ | २,१०७ | ० | ० | ७ | ४ | ० |
| १७. राजस्थान | ३,२५,३७४ | २,१९२ | ५,८४२ | १,३६४ | ४४ | ९४ | ० |
| १८. विंध्यप्रदेश | ५,६५६ | १,०५० | ३३१ | १५० | ९ | ५ | ० |
| १९. सौराष्ट्र | ४१,००० | १५,००० | ० | ० | ६ | ० | ० |
| २०. हिमाचल | १,९०० | ६६ | ० | ० | ३ | ० | ० |
| २१. हैदराबाद | १,०३,७०६ | ३,८१५ | २१,०२७ | ४,५५९ | १२ | ५ | २ |
| २२. मुंबई (नगर) | १२३ | ६ | ० | ० | ४ | ३३ | ० |
| २३. मलाया (परदेश) | ० | ० | ० | ० | ० | १ | ० |
| एकंदर | ३६,६३,९७४ | ४,०७,२२७ | १०६४७४ | ३२,३६६ | १,५९१ | १,०९२ | ११३ |

( वरील आंकडे 'सर्वोदया'च्या जानेवारी १५ च्या अंकावरून घेतले आहेत. )








# सारसंकलन

## आचार्य विनोबा

सुप्रसिद्ध आंग्ल कवि **लॉर्ड टेनीसन्** यांचे नातू **हॅलाम टेनीसन्** यांनीं लंडनहून 'काँग्रेस फॉर कल्चरल् फ्रीडम्' तर्फे प्रसिद्ध होणाऱ्या 'एन्काउंटर' नांवाच्या इंग्रजी मासिकाच्या डिसेंबर १९५४ च्या अंकांत भूदानयज्ञाचे प्रवर्तक **आचार्य विनोबा भावे** यांच्यावर एक लेख लिहिला आहे. हॅलाम टेनीसन् हे पूर्वी १९४६ सालीं गांधीजींना येऊन भेटले होते. व अलीकडे विनोबांजवळहि जाऊन कांहीं दिवस राहिले. विनोबांचें चरित्र लिहिण्याचें त्यांनीं योजिलें आहे. 'एन्काउंटर'मधील त्यांच्या लेखांतील कांहीं भागाचा अनुवाद सारांशरूपानें पुढें दिला आहे :

" 'गांधी निधन पावले आणि विनोबा त्यांच्या इतक्याच वात्सल्यानें पुढें आले.' असें एका अलीकडेच रचल्या गेलेल्या लोकगीतांत म्हटलें आहे. गांधीजींनींच जणूं विनोबांच्या प्रेमाच्या रूपानें जन्म घेतला हा अर्थ या लोकगीतांतून काव्यमय रीत्या सूचित झाला आहे. विनोबांनीं एकदां म्हटलें : 'गांधीजी जर निधन पावले नसते, तर मी पुढें यायला कशाला धजलों असतों ?'

" १९५१ मध्यें हैदराबादमधील तेलंगणांत विनोबांनीं जेव्हां पदयात्रा केली, तेव्हां तेलंगणांत कम्युनिस्टांनीं जमीनदारांना गांजून, छळून, त्यांचे खून करून त्यांच्या जमीनी गरीबांना वाटल्या होत्या. तेलंगण हें स्वतंत्र भारताचें 'येनान' समजलें जात होतें. सशस्त्र पोलिसहि जेथें जायला भीत होते अशा तेलंगणांत विनोबांनीं प्रवेश केला. धिम्मेपणानें, स्नेहानें कम्युनिस्टांना भेटून ते म्हणाले : 'तुम्ही फाजील प्रेम करणाऱ्या प्रेमांध आयांसारखे आहांत. तुमचे जनतेवर प्रेम आहे आणि त्यांच्याकरितां तुम्ही प्रत्येकाचा नाश करूं पहात आहांत. पण लक्षांत ठेवा कीं प्रेमांध आया शेवटीं आपल्या मुलांच्याच नाशाला कारण होतात. या पदयात्रेंत ज्या ज्या वेळीं व प्रसंगीं विनोबा बोलूं लागले, त्या त्या वेळीं व प्रसंगीं त्यांच्या प्रत्येक शब्दागणिक त्या त्या प्रसंगाशीं अधिकाधिक निकट येऊं लागले. शेवटीं तर पोचमपल्ली गांवीं ते आलेल्या प्रसंगाशीं तद्रूपच होऊन गेले. या पोचमपल्लीलाच ४० 'अस्पृश्य' कुटुंबांनीं जमीन मागितली. 'मला आपला सहावा मुलगा मानून जमीनीचा सहावा हिस्सा दरिद्रनारायणाला म्हणून द्या' असें विनोबांनीं आवाहन करतांच एका जमीनदारानें १०० एकर जमीन देऊं केली. ४० 'अस्पृश्य' कुटुंबांनीं 'आमचें ८० एकरांत भागेल' असें सांगून शिल्लक राहिलेली २० एकर परत केली. या दाता व दान घेणारा अशा दोघांच्या दुहेरी औदार्यामधून भूदानयज्ञाचा जन्म झाला. स्वतंत्र भारतांतील पहिल्या जनता-आंदोलनाचा उगम हा असा अकल्पित योगायोगानें, अवचितपणें झाला. आज साडेतीन वर्षांनन्तर विनोबा एक सर्वश्रेष्ठ 'भू-पति' बनेल आहेत. ११००० मैल पदयात्रा केलेल्या या यात्रिकानें ४० लक्ष एकर जमीन दान मिळविली आहे. १९५७ वर्ष संपायच्या आंत ५ कोट एकर मिळविण्याचा संकल्प त्यांनीं केला आहे. ज्या माणसानें कधीं आरशांतहि स्वतःकडे डुंकूनहि पाहिलें नसेल, तो आज राष्ट्राच्या वर्तमानपत्रांच्या पाना-पानांतून झळकतांना स्वतःला पहात आहे.

" एक अत्यंत बुद्धिमान् आणि बुद्धिवादी तपस्वी संन्यासी अकस्मात् जनतेचा पुढारी झाला आहे. या तपस्वी संन्याश्याच्या ठिकाणीं एक असामान्य गुण आढळून येतो. तो गुण त्यांच्या डोळ्यांतून स्पष्ट चमकतांना दिसून येतो. त्यांच्या घाऱ्या, तरुण, लुकलुकणाऱ्या डोळ्यांतून कांहीं एक और हास्याची, विनोदाची गूढ लकेर चमकत असते. जणूं अगदीं आंतून उसळणारा कसला तरी आनंद बाहेर यायला धडपडत आहे. पण संन्याश्याच्या गांभीर्याच्या आवरणाखालीं तो आनंद आंतल्याआंत दडपला जाऊन अस्फुट स्मिताच्या झरोक्यांतून कसाबसा दिसत आहे ! अत्यंत धार्मिक माणसें आपले चेहरे गंभीर करून बसलेलीं दिसतात. त्यामुळें विनोबांचें हें हास्य पाहून विलक्षण नवल वाटतें. खरा धर्म म्हणजे काय हें विनोबांकडे पाहून समजतें. या साधुपुरुषाच्या ठिकाणीं अगदीं अंतरंगांत कोठेंहि बदसूर लवमात्र नाहीं, सुरेल माधुर्य आहे, ह्याची खूण त्यांच्याकडे पहातांच पटते.

" आमचें हैड्रोजन-बॉंबविषयीं बोलणें चाललें होतें. विनोबा म्हणाले : 'माणूस हा बुद्धिवादी समजूतदार प्राणी आहे. तो स्वतःच स्वतःचा विनाश घडवून आणील हें संभवत नाहीं. तथापि तसें करायला जर तो उद्युक्त झाला तर आपणांपेक्षां अधिक यशस्वी प्राणी जन्माला यावा याकरितांच तो तसें करूं शकेल !'








विनोबांना विनोद सुचतो, याचें नवल वाटतें. याचें कारण १९५४ सालींहि ते निश्चित आहेत. – एकदां आधुनिक काळांतील भौतिक सुखाच्या प्रगतीविषयीं बोलत असतांना ते म्हणाले : 'आपल्या या युगांत सुख टनावारी उत्पन्न होत आहे. पण या टनांच्या ओझ्याखालीं आपण चिरडून जात आहोंत. बैलाच्या पाठीवरून वाहिल्या जात असलेल्या साखरेच्या गोणी शेवटीं जिव्हालोलुपाच्या उदरांत घर करतात. इकडे बैलाची मोडून येते पाठ, आणि तिकडे जिव्हालोलुप माणसाचें बिघडून जातें पोट. साखर इतकी गोड पण तिचा परिणाम किती अकल्पित कटु!'– एकदां मी विनोबांना त्यांचा फोटो घेण्याबद्दल परवानगी विचारली. विनोबांनीं उत्तर दिलें : 'घर फोडायच्या आधीं चोर कांहीं दार ठोठावीत बसत नाहींत!' आणि ते हंसत माझ्या कॅमेऱ्याच्या कक्षेपलीकडे लांब जाऊन उभे राहिले. तेथून ते म्हणतात : 'पुढच्या वेळेला ध्यानांत ठेवा कीं तुम्ही चोर आहांत आणि ही गोष्ट बाहेर प्रकट करूं नका.'– एकदां त्यांचे समाजरचनेचें विचार ऐकून मी त्यांना म्हणालों : 'आपले विचार मला साम्यवादीच वाटतात. फक्त त्यांत हिंसा नाहीं एवढाच फरक.' त्यावर ते मिस्किलपणें हंसून म्हणाले : 'होय. तुम्ही असें देखील म्हणाल कीं दोन माणसें अगदीं एकच आहेत. फरक एवढाच कीं एक जिवंत आहे आणि दुसरा मेलेला!'

"विनोबा सगळयांनाच ईश्वराचीं लेंकरें समजतात. ते सभेंत बोलत असतांना जर एखादी लहान मुलगी व्यासपीठावर रांगत आली तर ते इकडे बोलत असतांना तिकडे मुलीच्या अंगावरून हात फिरवितील, तिला थोंपटतील. त्यांच्याकडे पाहून असें वाटतें कीं ते मानवी मुलगीच काय, एखादी खार आली तरी ते असेंच वागतील!

"विनोबा यंत्राचे दोन प्रकार पाडतात : एक प्रकार म्हणजे श्रम वांचविणारी यंत्रें जशी जीपगाडी, ध्वनिक्षेपक यंत्र, विजेचे दिवे. हीं यंत्रें त्यांना हवीं आहेत, स्वतःकरितां नसलीं तरी दुसऱ्यांकरितां. दुसरा यंत्रांचा प्रकार म्हणजे काम काढून घेऊन बेकारी निर्माण करणारीं यंत्रें. तसेंच औषधाबद्दलहि त्यांचा कोणताहि कट्टर आग्रह नाहीं. मृत्यू केव्हांहि आला तरी त्याला त्यांची तयारी आहेच. पण इतकें काम करायचें असतांना आपण जगलें पाहिजे असें त्यांना वाटतें. म्हणून आपल्या अलीकडे मागें लागलेल्या मलेरियावर ते पॅल्युड्रिनचा मारा करीत असतात.

"चांगुलपणावर विनोबांचा जो निर्भय, निष्कपट, अपरंपार विश्वास दिसून येतो त्याचें पाश्चात्यांना विशेष नवल वाटल्याशिवाय रहात नाहीं. पण या विश्वासामागें भोळसट भाबडा भाव नाहीं. माणसाच्या स्वभावाच्या सर्व बाजू ते पाहूं शकतात. पण त्या स्वभावांतील फक्त चांगलीच बाजू निवडून ते तिलाच आवाहन करतात. ही त्यांची निवड ते बुद्धिपूर्वक करतात. ख्रिस्ती धर्मानें माणसाच्या स्वभावाची पतित किंवा वाईट बाजू निवडून तीवर जो भर दिला आहे, तो त्यांना मान्य नाहीं. पाखंडी फॅरिसींवर ख्रिस्तानें जे ताशेरे झाडले आहेत त्यासंबंधीं विनोबा विचारतात, 'असे ताशेरे झाडून का हृदयपरिवर्तन होत असतें? उलट, अशानें लोक हट्टी व दुष्ट बनतात!' – मी त्यांना विचारलें : 'पांच कोट एकर जमीन अगदीं गुण्यागोविन्दानें, हृदयपरिवर्तनानें मिळेल असें तुम्हांला खरोखरींच वाटतें का?' त्यावर त्यांनीं उत्तर दिलें : 'या पद्धतींतला राम निघून जाईपर्यंत मी वाट पाहीन. पुढें काय करायचें तें त्यानंतर बघतां येईल!' – बिहारमधील एका खेडेगांवीं तीनदां जाऊनहि त्यांना म्हणण्यासारखें दान मिळालें नाहीं. तेव्हां तेथील भूमिहीन शतकऱ्यांना आश्वासन देऊन ते म्हणाले : 'जमीनदारांकडे जाऊन मी पुन्हां एकदां विनंति करीन.' एवढें बोलूनच ते थांबले नाहींत. त्यांनीं भूमिहीनांना विचारलें : 'इतकेंहि करून जमीनदारांनीं कांहीं दिलें नाहीं, तर तुम्ही त्यांची शेती कसायचें नाकाराल का?' त्यावरून मी ताडलें कीं, विनोबांना पुढील सर्व उपायांची पुरेपूर जाणीव असावी. केवळ सध्यां जमीनदारवर्गाशीं असलेले स्नेहसंबंध त्यांना पुढील असहकाराची भाषा बोलून बिघडवावयाचे नाहींत, एवढेंच. अशा प्रकारच्या धिम्म्या आणि बुद्धिपूर्वक संयमावरून त्यांचा धीरोदात्तपणा सूचित होतो.

"अधिकाराची हांव ही यशाबरोबर व वयोमानाबरोबर वाढत जाते असा नेहमींचा अनुभव आहे. पण विनोबांना अधिकाराचा मोह नाहीं. इतके दिवस तर ते प्रसिद्धीपासून दूरच होते. त्यांना त्यांच्या सहकाऱ्यांनीं बाहेर खेंचून प्रसिद्धीच्या प्रकाशांत आणलें. त्यांच्यापुढें अधिकाराचीं आमिषें आलीं नाहींत असें







नाहीं. दोन वर्षांपूर्वी सरकारनें त्यांना आपल्या जवळची एक कोट एकर पडीत जमीन देऊं केली व तिची वाटेल तशी वांटणी करून लागवडीखालीं आणण्याचा अधिकार त्यांना देऊं केला. विनोबांचें उत्तर तयार होतें : 'सरकारच्या जमीनीची सर्व जबाबदारी सरकारवर आहे. सरकारनें ती पहावी' असें त्यांनीं सांगितलें. शिवाय त्यांनीं स्वतःविषयीं असेंहि सांगितलें कीं 'माझें काम संस्था किंवा संघटना काढायचें नाहीं. प्रचार किंवा प्रसार हें माझें काम होय. संस्था काढण्यावर माझा विश्वास नाहीं. लोक संस्था काढतात, आणि त्या संस्थाच संस्थापकांना खाऊन टाकतात ! संस्थापकांनाहि आपला भ्रमनिरास झाला हें कबूल करण्याचें धैर्य रहात नाहीं.' म्हणून भूदान-यज्ञ ही संस्था नाहीं, तिचे सभासद नाहींत, तिचे कांटेकोर नियम नाहींत. भूदानयज्ञांत सामील होणारांनीं केवळ व्रत घ्यायचें आहे."

---

## 'श्री. जयप्रकाशजींबरोबर भूदानयात्रेंत'

मुंबईचे श्री. मिनु मसानी यांचा 'Bhoodan in Action' या शीर्षकाखालीं एक लेख डिसेंबर १९५४ च्या 'एन्काउंटर' या इंग्रजी मासिकांत प्रसिद्ध झाला आहे. गेल्या १९५४च्या मार्च ६ पासून जयप्रकाशजींबरोबर बिहारमधील भूदानपदयात्रेंत ते स्वतः कांहीं दिवस हिंडले. या भूदानार्थ पदयात्रेंत जयप्रकाशजींचें, खेडेगांवांतील जीवनाचें, भूदान-आंदोलनांतील निरनिराळ्या प्रश्नांचें जें त्यांना ओझरतें दर्शन झालें त्याचें त्यांनीं उपरिनिर्दिष्ट 'एन्काउंटर' मधील लेखांत वर्णन केलें आहे. त्यामधून कांहीं भाग अनुवादून पुढें दिला आहे. " मी जाऊन पोहोंचलों तों गयेपासून थोड्या अंतरावर असलेल्या कल्प नांवाच्या खेड्यांत. त्या खेड्यांत एक वाचनालयाची इमारत होती. तिच्या बाहेरच्या व्हरांड्यांत जयप्रकाश खेडुतांबरोबर बोलत बसले होते. मी गेल्यावर लवकरच ती बैठक संपून सभेची तयारी सुरू झाली. उघड्यावर सभेची योजना होती. सभेंत पुढच्या रांगांतून मुलें बसलीं होतीं. पुढें मी इतर गांवांतून ज्या सभा पाहिल्या त्यांतून पुढच्या रांगांत मुलेंच बसत. सभेला भूदानयज्ञाच्या गाण्यानें सुरुवात झाली. गाणें म्हणणाऱ्या बाई मद्रास विद्यापीठाच्या कायद्याच्या पदवीधर होत्या. नंतर एक तरुण उठला आणि त्यानें जयप्रकाशजींच्या स्वागतार्थ कांहीं वाचून दाखविलें. जयप्रकाशबाबूंनीं स्वागताचा स्वीकार करतांना सांगितलें कीं, 'मला मानपत्रें नकोत, दानपत्रें पाहिजे आहेत.' मग जयप्रकाशजींनीं आपल्यासमोर बसलेल्या लोकांशीं बोलावयास सुरुवात केली. कांहीं मिनिटें होत नाहीं तोंच त्यांना दिसलें कीं सभेच्या जवळच एका बाजूला पलीकडच्या झाडाखालीं दोन म्हातारे बसून दुरूनच गंमत पहात आहेत. आपलें बोलणें त्यांना ऐकूं जात नसावें असें वाटून जयप्रकाश उठून त्या म्हाताऱ्यांकडे गेले आणि म्हणाले 'बाबा, असे सभेमध्यें येऊन बसा ना ! तुम्हीं सभेंत येऊन बसल्यानें जमीन द्यायचें तुमच्यावर बंधन नाहीं. वाटलें तर तुम्हीं कांहींहि देऊं नका.' हें ऐकून ते म्हातारे सभेंत येऊन बसले. पुन्हां जयप्रकाश भाषणाला सुरुवात करतात तों समोरच्या रांगेंतील एक मुलगा रडत उठला. कारण शेजारच्या दुसऱ्या मुलानें त्याची खोडी काढली होती. या व्यत्ययामुळें थोडा वेळ जयप्रकाशजींना आपलें भाषण थांबवावें लागलें. नंतर भाषण सुरू करून कांहीं मिनिटें जातात तोंच एक नवीन श्रोते सभेला आले. ते घोड्यावर बसून आले होते. झालें, सभेच्या पुढच्या रांगेंतील बालगोपालमंडळी एकदम उठली व घोड्याभोंवतीं जमली. एकदोन मुलें तर घोड्यावर चढूं लागलीं. जयप्रकाशांनीं बिलकुल न चिडतां हंसत मुलांना 'हें काय चाललें आहे ?' म्हणून विचारलें. 'हा घोडा आहे'–मुलांनीं उत्तर दिलें. 'हो, घोडा मला दिसतोच आहे. पण मग एवढी गडबड-गोंधळ कशाकरितां ?' असें जयप्रकाशजींनीं विचारतांच एका

मुलानें सरळ सांगितलें 'अहो, किती दिवसांत आम्ही घोडा बघितला नाहीं !' साहजिकच घोड्याची ही सभा बरखास्त होईपर्यंत जयप्रकाशांची सभा तहकूब करावी लागली !

"जयप्रकाशांचीं खेडेगांवांतील भाषणें या दौऱ्यांत मी बरीच ऐकलीं. कांहीं लोक प्रश्न विचारीत असत, स्थानिक प्रश्नांबाबत त्यांचा सल्ला विचारीत. जयप्रकाश सोप्या भाषेंत सोपीं उदाहरणें देऊन नैतिक आवाहन करीत. त्यांच्या भाषणाचें सार असें : 'आज जगांत खूप बदल होत आहेत. ब्रिटिश राज्य गेलें. राजे–महाराजे गेले. आतां जमीनदार जात आहेत. भूमिहीन लोक आतां स्वस्थ बसणार नाहींत. जमीनीची न्याय्य वांटणी झाली पाहिजे व ती होणारच.' नंतर ते रशियाचें उदाहरण देऊन सांगत – 'रशियामध्यें बदल होतांना हिंसा, अत्याचार, खून झाले. आपल्या इकडे तेलंगणांत तीन हजार लोकांना असेंच प्राणास मुकावें लागलें; शिवाय लक्षावधि रुपयांची मालमत्ता खाक झाली ती वेगळीच. – म्हणून बदल घडवून आणायची उत्तम क्रांतीची पद्धत म्हणजे प्रेमाची व शांतीची. ज्यांच्याजवळ जादा जमीन आहे त्या जमीनदारांनीं ती जादा जमीन दान म्हणून द्यावी. मध्यम शेतकऱ्यांनीं आपल्या जमीनीचा सहावा भाग द्यावा. गरीबांनींसुद्धां थोडा भाग या यज्ञांत दिला पाहिजे.' यावर कोणी असें विचारी कीं 'तसा कायदा पास कां करून घेत नाहीं'? त्यावर जयप्रकाश उत्तर देत : 'तें खरें. पण कायद्याच्या भीतीनें जमीन हिसकून घेण्यांत स्वारस्य काय ? चोरीपासून परावृत्त करावयाला चोरीविरुद्ध कायदा करायची आवश्यकताच असावी काय ? –सुधारणा कोणी बाहेरून लादण्यापेक्षां, ती आंतून स्वयंस्फूर्तीनें आली पाहिजे. कायदा आणि तरवार यांत तसा फरक नाहीं. दोन्हींहि दडपशाहीचींच साधनें होत.' नंतर जयप्रकाशजी भूदानाचा महिमा व वैशिष्ट्य वर्णन करून सांगत : 'भूदान हें एक जनतेचें महान् आंदोलन आहे. त्यानें हृदयपरिवर्तन व जीवनविषयक मूल्यांत परिवर्तन घडवून आणण्याकरितां योग्य तें वातावरण निर्माण होत आहे. हल्लीं जी पिळवणूक करणारी, विषमतेवर अधिष्ठित अशी समाजरचना प्रचलित आहे, ती ताबडतोब बदलून घेण्याचा हा प्रयत्न आहे. भूदानाच्या ह्या क्रान्तिकारक उपक्रमाला जमीनीच्या क्षेत्रांत प्रथम सुरुवात झाली. याचें कारण कृषिप्रधान हिंदुस्थानांत जमीन हें उत्पादनसाधनांत आद्य व प्रमुख आहे हें एक आहेच. त्याशिवाय दुसरें कारण असें कीं नवीन सामाजिक नीति व त्यावर अधिष्ठित अशी नवीन अर्थरचना अमलांत आणायला इतर मालमत्तेपेक्षां अत्यंत सुकर असें साधन जमीन हेंच आहे. भूदानामागील विचारप्रक्रिया इतर सर्व मालमत्ता व संपत्ति यांना लागूंच आहे. सर्व संपत्ति ही सामाजिक सहकार्याचें फळ म्हणून सामाजिकच धन होय. म्हणून आपल्याजवळचें सर्व कांहीं शेवटीं समाजाचेंच आहे. आपण त्याचे केवळ निधिधारक विश्वस्त आहोंत. संपत्ति व मालमत्ता ही एक निर्जीव वस्तु आहे. तिला भूदानाच्या विचारानेंच एक नवा चैतन्यशाली अर्थ येतो. उपमाच द्यावयाची झाल्यास, भूदान म्हणजे एक वहाती नदी आहे. संपत्ति निर्माण करणाऱ्या आपल्या विविध क्रिया या होड्या होत. वहात्या पाण्याशिवाय होड्या जागच्या जागींच निश्चल राहून शेवटीं चिखलांत रुतून फसणार. वहाती नदीच होड्यांना गति व जीवन देऊन त्यांना व त्यांतील उतारूंना अभीष्ट स्थळीं पोहोंचविते.– तसेंच, भूदान-आंदोलनाच्या पुरस्कर्त्यांचें ध्येय एक राजकीय पक्ष स्थापून राज्ययंत्र ताब्यांत घ्यावें असें नाहीं. लोकांच्या जीवनांत क्रांति करून, सामाजिक जीवनांत क्रांति घडवून आणणें व अशा








रीतीनें पक्ष किंवा पार्लमेंट यांच्या मध्यस्थीशिवायच आपला स्वतःचा कारभार आपण स्वतःच करावयास समर्थ होणें हें भूदानवाद्यांचें उद्दिष्ट आहे.'

" खेड्याखेड्यांतून भूदानाचा हा संदेश पोहोंचवीत जयप्रकाशजींची पदयात्रा चालू होती. एकदां संध्याकाळीं अमुक नांवाच्या गांवीं सभा झाल्यावर जयप्रकाश व त्यांच्याबरोबर आम्ही रात्रींच्या मुक्कामाकरितां तेथील एका बड्या शेतकऱ्याकडे गेलों. दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून बाहेर प्रातःकाळच्या सुंदर ताज्या हवेंत मी हिंडत असतांना, त्या बड्या वृद्ध शेतकऱ्यानें आपली कहाणी सांगायाला सुरुवात केली. ते म्हणाले ' बघा, कालपर्यंत मी ५० एकर जमीनीचा राजा होतो. आज मी रंक बनलों आहे. आमचे चिरंजीव जदुनंदन 'आझाद' याच्या आग्रहामुळें मी भूदानयज्ञांत काल माझी सगळी जमीन देऊन टाकली. या जदुनंदनला मी पाटणा येथील कॉलेजमध्यें शिक्षण दिलें. तो बी. ए. झाला आहे. या भागांत तोच एक बी. ए. आहे. दुसरीकडे मुलें शिक्षण पुरें करून पैसे मिळवावयास सुरुवात करतात. आमच्या जदुनंदननें आतांपर्यंत एक पैहि मिळविलेली नाहीं. कॉलेजमध्येंच असतांना तो समाजवादी झाला आणि हल्लीं लोकसेवेच्या मागें लागला आहे. आतां त्यानें आम्हांला भूदानांत आमची जमीनहि द्यायला लावलें आहे. आतां आमचें पुढें काय होणार ? हा माझ्यापुढें प्रश्न आहे. आमच्यापैकीं कोणी आजारी पडलें, किंवा उद्यांच माझ्या मुलींचीं लग्नें करायचीं आहेत तर आम्ही आतां करायचें कसें ' ? म्हाताऱ्याच्या बोलण्यांत मुलाविषयींच्या कौतुकाबरोबर हळहळ व भावी स्थितीविषयीं चिंता दिसून येत होती. मी तरी त्याला काय उत्तर देणार होतों ? नंतर आम्ही घरांत गेलों. माझी व जयप्रकाशबाबूंची गांठ पडल्याबरोबर मी त्यांच्याजवळ म्हाताऱ्यानें व्यक्त केलेल्या चिंतेसंबंधीं बोलणें काढलें व ' यावर तुमचें काय उत्तर आहे ? ' असें त्यांना विचारलें. त्यांनीं जदुनंदनला बोलावणें पाठविलें. त्याच्याकडून कळलें कीं त्या खेडेगांवांतील २९ कुटुंबांनीं आपली सर्व जमीन भूदानयज्ञांत दान देऊन टाकली होती. भूमिहीन शेतमजूरांचीं पांच-सहा कुटुंबें या जमीनीवर खपत होतीं. समाजवादी जदुनंदननें वडिलांच्या चिंतेवर पुढील उपाय सुचविला: " हीं सर्व ३५–३६ कुटुंबें–भूमिवान् व भूमिहीन–यांनीं सर्वांनीं मिळून सहकारी शेती करावी व प्रत्येकानें उत्पन्नाचा १/३५ भाग घ्यावा."– हा उपाय पुढें किती अमलांत आला, तें मला ठाऊक नाहीं. पण जदुनंदनच्या या निःस्वार्थी त्यागाच्या उदाहरणानें मी मात्र चकित झालों.

---

मनुष्याची मनुष्य म्हणून प्रतिष्ठापना करायची या कल्पनेनें माझें अंतरंग व्यापून टाकलें आहे. या प्रतिष्ठापनेनें महाराष्ट्राचें जीवन आपण पालटून टाकूं शकूं असा मला विश्वास वाटतो. माझ्या आयुष्याच्या ऐन उमेदीचीं तीस वर्षें महाराष्ट्रांत गांधींच्या कांग्रेसची प्रतिष्ठापना करण्यांत मी खर्च केलीं. तें एक उत्तम काम होतें व तें उत्तम रीतीनें सिद्ध झालें. ... १९५२ नंतर पुनः महाराष्ट्रांतल्या कामाला मी सुरुवात केली आहे. हें काम म्हणजे महाराष्ट्राला सर्वोदयाची दीक्षा द्यायची हें आहे. सर्वोदयाची दीक्षा म्हणजे वृत्ति स्नेहमय करण्याची दीक्षा. महाराष्ट्राचा स्वभाव स्नेहमय झाला पाहिजे असा प्रयत्न मी करणार आहे.

— शंकरराव देव

२७।१२।१९५४

बोर्डी येथील भाषणांतून ('भूदानयज्ञ' ३०।१२।५४)








# पूज्य विनोबांचा संदेश

श्री. शंकररावांच्या साठाव्या वाढदिवसाच्या निमित्तानें भूदान-विशेषांक काढीत आहां ही आनंदाची गोष्ट आहे. शंकररावांच्या परिणत प्रज्ञेचा लाभ महाराष्ट्रास दीर्घ काळ मिळत राहो आणि भूदानयज्ञमूलक ग्रामोद्योगप्रधान अहिंसक क्रान्तीचीं पाळेंमुळें महाराष्ट्राच्या मनोभूमींत खोल रुजोत अशी कामना.

विष्णुपुर ( प. बंगाल )
१० । १ । १९५५

विनोबा
चे
[illegible]






